# पदरत्नमहोदधि



अनेक प्राचीन अर्वाचीन कविनीं केलेला पदसंग्रह
पदसंख्या एक हजारावर.

हा संग्रह.

## दिनकर महादेव भागवत इनामदार संस्थान
## घावडशी जिल्हा सातारा.

याणीं लोकहितार्थ



—

मुंबईत

श्रीकल्पतरु प्रेसांत छापून प्रसिद्ध केला असे.



सन १८८९ शके १८१०





किंमत रुपये दोन.

# प्रस्तावना



## आर्या

मोठा कलिचा गुण हा ॥ कीं केशवकीर्तनेंचि सर्व तरे ॥ राया हरिचरिताचें गाणें हें वज्र पाप पर्वतरें ॥ १ ॥ मोरोपंत

जनामध्यें परमेश्वरप्राप्तिचें साधन करून घेण्यास हरि-कीर्तनाखेरीज कलियुगांत दुसरें सोपें साधन नाहीं, असें वरील कवितेवरून स्पष्ट होत आहे. या करितां आपल्या देशबांधवाची आपल्या हातून कांहीं सेवा घडावी, एतदर्थ बराच मोठा पदरूपी कवितासंग्रह केला आहे. या संग्रहांत कोठें नीतिपर उपदेश केला आहे, कोठें परमेश्वरप्राप्तिचीं साधनें सांगितलीं आहेत. आज पहातां प्राचीन कवी यांनीं केलेलीं पदें (अलिकडील विद्वान लोकांपाशीं मुळींच मिळण्याचा संभव नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल अशीं) आपल्यापैकीं ज्याना विद्या मुळींच येत नाहीं असे चोखमेळे, वारकरी वगैरें यांच्यापाशीं बराच संग्रह आहे. तो जमवितांना पुष्कळ अशुद्ध व शब्द भेद झालेले आढळतात. मी आज दोन तीन वर्षें वरील लोकापासून जशीं पदें मिळतील तशीं श्रम घेऊन माझ्या अल्पमतिनें शुद्ध करून घातलीं आहेत. व प्रत्येक देवतेंची पदें निरनिराळीं ठेविलीं आहेत. याचें कारण ज्यास ज्या देवतेची भक्ति असेल त्यास आपल्या प्रिय देवतेची उपासना करितानां त्यांस तीं एके ठिकाणीं मिळावीं

# प्रस्तावना.

हा मुख्य उद्देश आहे. व प्रत्येक पदाच्या मथाळ्याव र राग, ताल व चाल हीं जितका देववलीं तितकीं दिलीं आहेत. प्रस्तुतकालीं लोकप्रिय कैलासवासी अण्णासाहेब किरलोसकर हे संगीत नाटकाचे गुरू ह्मटलें असतां चा- लेल याणीं संगीत नाटकाचा पाया रचल्यावर अलिकडील विद्वानांपैकीं बऱ्याच लोकांनीं संगीत नाटकें करण्याची झोड लाविली आहे. याजकरितां त्यांच्या कवितेची सर- णी किति उत्तम आहे,ही माझ्या देशबांधवाला कळा- वी एतदर्थ या पुस्तकाच्या शेवटीं स्फुट पदें घातली आहे- त, त्यांत वरील नवीन कवींच्या पदांचा मासला थोडासा दिला आहे, व मी स्वतः थोडीशीं पदें केलीं आहेत त्यां चे मथाळ्यावर * अशी खूण केली आहे. आतां हा व रील पदसंग्रह किती चांगला साधला आहे याबद्दल विचार करणें तो माझे प्रिय बांधवावरच संपवितों. हें पुस्तक छापण्यास माझे परममित्र नारायण जनार्दन छत्रे यांणीं बरेच साह्य केलें त्याबद्दल त्यांचे आभार मानून हा लेख येथें संपवितों.

मुंबई-कांदेवाडी
तारामाची चाळ.

दिनकर महादेव भागवत
ग्रंथप्रकाशक.

# अनुक्रमणिका.



श्रीदत्ताचीं व गुरूचीं पदें.

देवीचीं पदें



रामचरितसंबंधीं पदें

## पदें मारुतिचीं.

स्फुट पदें.

# पदरत्नमहोदधि.



## पदें गणपतीचीं.

### पद. ॥ १ ॥

(राग–झिंझोटी. ताल–धुमाळी.)

तो गणराज गजानन मंगल ॥ देवो सकल जनालारे ॥ ध्रु० ॥ गौरी शंकर चौहातानीं॥ज्याच्या चौंहातांलारे ॥ धरुनी हळुहळू चालायाला ॥ प्रेमें शिकविति ज्यालारे ॥१॥ कानिं कुंडलें लुटुलुटु हलती ॥ खुळुखुळु वाजती वाळेरे ॥ माथा जावळ भुरुभुरु उडते॥ पाहुनि मुख दोघालारे ॥ २ ॥ रांगत रांगत येऊनि गौरी॥ अंकावरी जो चढलारे ॥ धरुनि कंचुकी फुंदत फुंदत ॥ मागे स्तनपानालारे ॥ ३ ॥ जग ताराया जगदंबेचा ॥ श्रीहरि बाळक झालारे ॥ ऋद्धी सिद्धी दासि जयाच्या ॥ विघ्नें कांपति ज्यालारे ॥ ४ ॥ कार्यारंभीं विघ्न टळाया ॥ स्मरती सुर नर ज्यालारे ॥ वंदुनि भावें नारायणसुत ॥ दास जयाचा झालारे ॥ ५ ॥

### पद ॥ २ ॥ x

(राग–जिल्हा. ताल–दादरा. लक्ष्योनि हिंडताचि० या चा०)

मंगलकर शुंडसरळ शंभुबालका ॥ सुरनरपदकमलीं रत लंबनाशिका ॥ ध्रु० ॥ चरण दाव त्वरित पाव बुद्धिदायका ॥ मंदमती छंद अती कीर्तनी भुका ॥ लीन दास मी उदास हृदयचालका ॥चाल॥स्तवनी, भजनी, हरुनि भया, करुनि दया, स्मरुनि ब्रिदा, पाव गजमुखा ॥ मंग० ॥१॥ संचयास उणा ज्यास भक्तिहारका ॥ ह्मणुनि तार एकवार दीनबालका ॥ शरण तुला अभय मला दे

सदा सुखा॥चाल॥मावें, ध्यावें, गावें, वक्रतुंड स्थूलगंड दिव्यशुंड विघ्ननाशका ॥ मंगल० ॥ २ ॥ कृपावंत काय अंत पाहसी फुका ॥ धाव त्वरें विघ्नहरा भक्ततारका ॥ तुझ्यावीण होय क्षीण व्यर्थ बाळका ॥ चाल ॥ दमलों, श्रमलों, भ्रमलों, करुनि नमन, धरुनि चरण, दुरित हरण, करि विनायका ॥ मं० ३ ॥

पद ॥ ३ ॥

(राग—भूपकल्याण. ताल—धुमाळी.)

सरळ शुंडधर सरस्वतीशा सुरनर किंन्नर ज्या नमिती ॥ गीष्प तिसमता करील होतां प्रसाद ज्याचा हीनमतीं ॥ धृ० ॥ नारद तुंबर भुजगेंद्राहि ते ॥ तंव गुण प्रेमानें गाती॥ गजवदना तुज नमितां भावें॥सर्वहि विघ्नें तीं हरतीं ॥१॥ ब्रीद्र तुझें तें सांभाळुनिया॥निज-भृत्यीं मम करि गणपती॥सत्यदेवकीर्तन हें होवों ॥सफलद माझी ही विनती ॥ २ ॥

पद ॥ ४ ॥

[राग—कालंगडा. ताल—त्रिवट.)

गणराज गजानन गावाहो ॥ गणराज० ॥ ध्रु० ॥ शेंदुरचर्चित शुंडविराजित॥मोदकहस्ति पाहावा हो॥गणराज०॥१॥ विघ्नविनाशक बुद्धिप्रकाशक॥ तो वरदायक ध्यावा हो ॥ गणराज०॥२॥ आनंदात्मज चिंतितसे तुज॥हा भवसिंधु तरावा हो॥गणराज०॥३॥

पद ॥ ५ ॥

(राग—कल्याण.ताल—धुमाळी. संतपदाची जोड या चालीवर.)

दे पायाची जोड ॥ मोरया दे पायाची जोड ॥ध्रु०॥ नानादुःखें भोगुनि सारीं॥विषयवासना सोड॥मोरयादे०॥१॥तुजविण कवणा शरण मी जाऊं ॥ नाम तुझें बहु गोड ॥ मोरयादे० ॥ २ ॥धरणिवरा येवढेंचि जाणुनि ॥ काढिं कृपेची तोड ॥ मोरया० ॥३ ॥

पद ॥ ६ ॥

( राग—देस. ताल—त्रिवट. )

येरे नमितों मी तुज गजवदना. ॥ देरे दर्शन मज सुखसदना ॥ येरे० ॥ ध्रु० ॥ देहइंद्रियप्राणमनादि पंचकासि॥ तूंचि प्रकाशकू एकरदना ॥ येरे० ॥ १ ॥ सनातन ब्रह्मानंद, ध्याती योगीजनवृंद ॥ तोचि तूं सिंधुरगण, धूमनिधना ॥ येरे० ॥२॥ देहात्मभावना विघ्न हरुनि स्वरूपिं मग्न॥करि देवा कृष्ण जग—न्नाथनंदना॥येरे०॥३॥

पद. ॥ ७ ॥

( राग—कालंगडा. ताल—एका. चाल—चरंजीवकल्याण० )

जय जय विघ्नेश्वर मोरेश्वर गजानना देवा ॥ हेंचि मागणें जन्मोजन्मीं घडो तुझी सेवा ॥ ध्रु० ॥ नलगे मजला तुजविण गज रथ राज्यादिक हेवा ॥ उठो जिव्हेला रात्रंदिस हा कीर्तनगुण मेवा ॥ जय० ॥ १ ॥ प्रपंचांत हे मुख्य तसा तूं परमार्थिक हेवा ॥ युक्त असे तरि दे शिवरामा पदयुग हे सेवा ॥ जय० ॥ २ ॥

पद. ८.

( राग—कल्याण. ताल—त्रिवट. चाल—लावणीची. )

मंगलमुर्ति तुज स्मरतां विघ्नें हरती ॥ तुज पाहतां विघ्नें हरती ॥ माझ्या कृष्णाला बुद्धि देई पुरती ॥ तुझ्या करीन संकट चौथी मंगलमू० ॥ ध्रु० ॥ तुजला घालिन मंगलस्नान ॥ पिंवळा पिंताबर नेसवीन ॥ रत्नजडित मुगुट चढवीन॥ शालुवरती ॥ तुजस्मरतां० ॥ १ ॥ मोदक लाडू हीं पक्कान्नें ॥ पंचामृत तुज अर्पिनि ॥ चंपक पुष्पें आणि सुवर्ण ॥ दुर्वा मस्तकावरती ॥ तुजस्मरतां ॥ २॥ केशरिगणपती प्रसन्न झाला ॥ सत्वर येशोदेसि पावला ॥ तिचा कृष्ण सुबुद्धी जहाला ॥ शिवदिन लोळे चरणावरती ॥ करुनि आरति ॥ तुज स्मरतां विघ्नें हरती ॥ मंगलमूर्ति० ॥ ३ ॥

पद. ९

( राग—झिंजोटी. ताल—धुमाळी )

विघ्नहरा मम विघ्न हराया लवकर येई गजवदना ॥ ध्रु० ॥ एकदंत लंबोदर सुंदर रक्तमाल्यरंजितवसना ॥ शूर्पकर्ण शुभशुंडामंडित अंबासुत कृतरिपुकदना ॥ १ ॥ चतुर्बाहु चतुराननवंदित चंद्रभाल चंचलकर्णा ॥ चिदानंद चिद्रूप चिदंबर चित्तचोर चित्सुखसदना ॥ २ ॥ भक्तकामकल्पद्रुमभासुर भानुकोटिभास्वद्वर्णा ॥ पाशांकुशधर वरदाभयकर खंडितदानव शुभरदना ॥ ३ ॥ विघ्नविनाशन विद्यामयवपु विकटा मूषकपतिवहना ॥ रंगा येऊनि रंग भरावा आश्रय द्यावा या कवना ॥ ४ ॥

## पद ॥ १० ॥

(राग–शुद्धकल्याण. ताल–त्रिवट)

गजवदना नमन तुला ॥ मज आत्मभजनीं देयिं प्रेम निरंतर ॥ ध्रु० ॥ चतुर्मुखादिक सुरमुनिवर निज महिमा नित्य गातीरे ॥ प्रगट झाला भक्तांच्या संकटीं जाणुनियां शुद्ध हेतुला ॥ माथां मुकुट कुंडलें कांनिं शोभति सुंदर ॥ गज० ॥ १ ॥ गणसिंधुरकमलादिक दैत्या वधुनीं दुष्टजातीरे ॥ प्रबळ विघ्नासूर शमविला बाळपणी धरुनि आखुला॥ वरी आरूढ होऊनि केला मूषकउद्धार॥ गज० ॥ २ ॥ समर्थ तूं निजनाममंत्रजपकाचा पक्षपातीरे ॥ नवल मोठें केलें त्रिभुवनिं निवटुनिया धूमकेतुला ॥ विष्णुकृष्णजगन्नाथ तुंचि निर्विकार ॥ गज० ॥ ३ ॥

## पद ॥ ११ ॥

(राग–झिंजोटी. ताल–धुमाळी.)

पूर्णब्रह्म प्रभु दीनदयाघन ॥ भवभयभंजन विश्वपती ॥ इच्छितकार्यारंभीं स्तवितां ॥ विघ्नें सर्व लया जाती ॥ ध्रु० ॥ संत योगि मुनि विनटुनि निशिदिनि ॥ ध्यानि मग्न ज्याच्या असती ॥ भक्तमनोरथ कल्पद्रुम जो ॥ मंगलमय मंगलमूर्ती ॥ पू० ॥ १ ॥ अगमअगोचर करुणासागर ॥ सच्चिद्घन ज्याला ह्मणती॥ तो जगदीश्वर दीन

जनोद्धर ॥ देवों सकलां सुखशांती ॥ पूर्णब्रह्म प्रभु दी० ॥ २ ॥

॥ पद १२ ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. )

मनमुषकासनि बैसोनि यावें॥क्षेमालिंगन मजला द्यावें॥ध्रु० ॥आणिक कांहिं न मागें तुजला ॥ मीपण माझें विलया न्यावें ॥ मन० ॥ १ ॥ एकाक्षरी बीज स्मरतां स्मरणीं ॥ व्यापकदर्शन डोळां व्हावें ॥ मन० ॥ २ ॥ केशरिनाथ गुरु-गण-राजा ॥ शिवदिन दूर्वादळ शिरीं द्यावें ॥ मनमुषकासनिं बैसुनि यावें ॥ क्षेम०॥३॥

पद ॥ १३ ॥

( राग–बिभास. ताल–दादरा. चाल "प्रियेपहाराव्रीचासमयसरुन.")

गड्या प्रभातीं हिमगिरिजातनय शुभद एकदंत गावा ॥ ध्रु० ॥ विघ्नहरण शुंडदंड ॥ खलदमनीं बल उदंड ॥ विश्वपालवक्रतुंड ॥ हृदयांत ठरावा ॥ गड्या० ॥ १ ॥ तुंदिलतनु मंदहास्य ॥ भूषित बहु सुंदरास्य ॥ शूर्पकर्ण गा अवश्य ॥ विनतास विसावा ॥ गड्या० ॥ २ ॥ भक्तावन पारायण ॥ तोच शंभु नारायण ॥ ब्रह्मदेव तोच जाण ॥ ध्यावें गण-रावा ॥ गड्याप्र भातीं० ॥३ ॥

पद ॥ १४ ॥

(राग–भूपकल्याण. ताल–धुमाळी.पंचतुंड नररुंडमालधर या चा०)

वक्रतुंड गणनाथ परेश्वर शुंडा-मंडन पावन तो ॥ सुरनरवृंदीं आदिपूज्य शिव-गिरज्या-सुत हृदयांत रतो ॥ ध्रु० ॥ तच्चरणांबुज युग्म सोडुनी मनोमधुप न च भटका तो॥ नरतनु जाइल व्यर्थ काळ हा फसवुन नकळे कैं जातो ॥ १ ॥ मायबाप मम मित्र सोयरा स्वामी हा गणनायक तो ॥ असार सारें त्या साराला नारायण ही नत होतो ॥ वक्रतुंड० ॥ २ ॥

पद ॥ १५ ॥

( राग–पिलू. ताल–त्रिवट. अष्टमूर्ति परमेश सदाशिव–या चा० )

एकदंत श्रीमूषकवाहन विश्वावन गावा ॥ तारक बा समजूनी दुसरा

कुमार्ग सोडावा ॥ ध्रु० ॥ व्रत तप जप उपवास करूनि देह न जाळावा ॥ नामघोष "श्रीगजानना", हा नित्यची चाळावा॥१॥ देहबुद्धिचा विटाळ फेडुनि आत्माजाणावा ॥ श्रीनारायण विधि हर गणपति एकच मानावा ॥ एकदंत श्रीमूषकवाहन विश्वावन गावा ॥ २ ॥

पद ॥ १६ ॥

(राग—कालंगडा.ताल—दादरा. सुंदरमुखतुंदिलतनु या चालीवर.)

श्रीगिरिजो—त्संग—भुषण श्रीगजानना ॥ सरळशुंड वक्रतुंड असुरम र्दना ॥ ध्रु० ॥ तनुकराल तूं मराल नीनिविश्वपा ॥ शरण तुला मरण गमे साधणें तपा ॥ त्राहि त्राहि धृतिच नाहीं ऊरली ज- पा ॥ त्राता, आतां, ताता, मजशिं न्से, बुडत असे, हृदयिं वसे, भरंवसा तुझा ॥ श्रीगिरि०॥१॥ आधि रोग विरह सेवनांत चा- लले ॥ आयु सर्व सरुनि चित्त भ्रांत जाहलें ॥ क्षणभंगुर तनु कळतां धैर्य लोपले ॥ त्राही, त्राही, त्राही,गजवदनां, विनतजना सुखसदना, धांव धांवरे ॥ श्री० ॥ २ ॥ सत्संगति नित्य घडो मार्ग दे बरा ॥ नामरसीं आवड हो नित्य लेंकरा॥ नारायण—वि- धि—शंकर—पूजितांमरा ॥ राया, वायां, माया, तुटुन पडो, ज्ञान घडो, चित्त रडो, विषय पाहतां ॥ श्रीगिरिजोत्सं ॥३॥

पद ॥ १७ ॥

(राग—बिभास. ताल—दादरा. चाल—कितितरिपहाटे०)

सुमंगल गणराज स्तवूं॥नमुनी प्रभूला ॥ ध्रु० ॥ वक्रतुंड एकदंत ॥ चतुर्भुज मूर्ति शांत ॥ नाम घेतां सर्व दुरित ॥ जाई लयाला ॥ सुमं० ॥ १ ॥ ऋद्धिसिद्धि दासि दोन॥ करिति सदां नृत्य गान ॥ सुर नर मुनि ध्याति चरण॥ मोक्ष साधण्याला ॥ सुमं० ॥ २ ॥ विघ्नेशा दुःख हरी॥ मत्कवनीं रंग भरी॥ कृष्णसुता धन्य करीं ॥ करुन कृपेला.॥ सुमं० ॥ ३ ॥

पद ॥ १८ ॥

(राग–परज. ताल–धुमाळी. तोंवरितळमळरे• या चा० वर.)

वंदू गणराजा गुणसिंधू ॥ करुणाकर दिनबंधू ॥ ध्रु० ॥ अखंड स्वानंदाचा ॥ मोदक मिरवे हातीं साचा ॥ वंदू० ॥ १ ॥ अंकुश तो समतेचा ॥ झळके परशु करीं बोधाचा ॥ २ ॥ पोटीं सर्व जगाचा ॥ होतो स्थिति उद्भव लय साचा ॥ वं० ॥ ३ ॥ नायक जो विद्येचा ॥ दायक सकळहि तो सिद्धीचा ॥ वं० ॥ ४ भासक जड दृश्याचा ॥ नाशक मायिक भव विघ्नाचा ॥ वं० ॥५ प्रणवरूप अविकारी ॥ जीवन्मुक्त गुरूसहकारी ॥ वं ॥ ६ ॥

पद ॥ १९ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

वंदू देव गजाननरे ॥ वंदू० ॥ ध्रु० सकळारंभी आधि ज्याला ॥ करिती पूजनरे ॥ वंदू० ॥२ ॥ ज्याचे स्मरणें हरतिल विघ्नें ॥ पूर्ण दयाघनरे ॥ वंदू० ॥ २ ॥ देव गजानन गौरीनंदन ॥ विघ्न विनाशनरे ॥ वंदू० ॥ ३ ॥ मोदकभक्षण पिवळें वसन ॥ मूषकवाहनरे ॥ वंदू० ॥ ४ ॥ ज्याला ध्यातां सुखरुप जहालों ॥ गोसावीनंदनरे ॥ वंदू० ॥ दे० ॥ ५ ॥

पद ॥ २० ॥

( राग–सूधकल्याण. ताल–एका. )

मोरयाचे पाय चला पाहुं यारे ॥ ध्रु० ॥ जगत हें सर्व मृषा व्यर्थचि ममता ॥ सोडुनि शरण त्याला जाऊंयारे ॥ १ ॥ मोर० ॥ आनन्य शरण होउनी शुद्ध भावें ॥ मस्तकी चरण त्याचे वंदुयारे ॥ मोर० ॥ २ ॥ करुनी अर्पण सर्वही हेतू ॥ स्वानंदे सुखरुप राहुंयारे ॥ मोर० ॥ ३ ॥

पद ॥ २१ ॥

( राग–भूपकल्याण. ताल–धुमाळी. पंचतुंड नररुंडमालधर या चा०)

शूर्पकर्ण द्विपशुंडा मंडित पार्वति तनया तुज नमितों ॥ संकष्टांतें नष्ट कराया प्रभुपदकमलां वंदीतो ॥ ध्रु० ॥ विद्याहिन मी दीन ह्मणुनि त्वत्कृपाधनांतें इच्छीतों ॥ दास मनोरथ पूर्ण करिशि ही आस मनीं मीं बाळगितों ॥ शू० ॥ १ ॥ कनकसुवसना राजिवनयना मूषकवहना तुज ध्यातों ॥ मत्कवना या रंग भराया वर द्याया कर जोडितों ॥ शू० ॥ २ ॥

पद ॥ २२ ॥ ✓

( राग—भूपकल्याण. चाल वताल—सदर. )

वक्रतुंड गणराज गजानन ॥ शंकरतनया भवहरणा ॥ कार्यारंभीं स्तवितों तुजला ॥ नमुनी आधीं प्रभुचरणा ध्रु० ॥ पाशांकुश धर शेंदुरभूषित ॥ मूषकवाहन सुखसदना ॥ भक्तमनोरथ पूर्ण कराया ॥ अवतरलासी गजवदना ॥ वक्र० ॥ १ ॥ विघ्नेशा मम विघ्न हराया ॥ लौकर येई अघशमना ॥ मत्कवनी ह्मा रंग भरोनी ॥ सुमती देई ह्या दीना ॥ वक्रतुंड ग० ॥ २ ॥

पद. ॥ २३ ॥

( राग—सोहनी. ताल—एका. )

मोरया तुला कशी माझि दया नाहिंरे ॥ माझि दया नाहिंरे मोरया० ॥ ध्रु ॥ या भवतापें बहुत मी तपलों ॥ चरणिं ठेवियली डोईरे ॥ मोरया० ॥ १ ॥ भार्यासुतादि मोहिं गुंतलों ॥ मुक्त करीं लवलाहींरे ॥ मोरया० ॥२॥ कृष्णदास हा गुरुकृपेनें ॥ आवडिनें नाम तुझें गाईरे ॥ मोरया तुला कशी माझी दया नाहींरे ॥३॥

पद ॥ २४ ॥

( राग—खमाज. ताल—दादरा. )

श्रीगणेशपादपद्म ध्याय तू मनारे ॥ भवदुःख सांडुनियां सर्व कामनारे ॥ ध्रु० ॥ श्रीगणेशचरणविमुख नरकमार्गी तो ॥ सतत भजनशील भक्त मुक्ति साधितो ॥ १ ॥ यत्नाविण दुःख जसें

मुखहि त्यापरी ॥ प्राप्त होय दैववशें चरण दृढ धरिरे ॥ २ ॥ नानात्वी त्रास बहुत जन्ममृत्युचा ॥ सांडुनि श्रीगणेशपदिं हो अमृत्युचा ॥ ३ ॥

पद ॥ २५ ॥

( राग-कालंगडा ताल एका. )

मायातीत शुद्ध निरंजन गणपति परमात्मा ॥ सोहंभावें काकड-आरति कैचा निरात्मा ॥ ध्रु० ॥ त्रिगुणात्मक पंचवीसा पदरी नि-जाहंकृतिचा काकडा ॥ धृताविद्यातिमिर नासुनी ज्ञानप्रकाश फुडा ॥ १ ॥ ज्ञानाज्ञान दिवस रात्री येथेंच नसती ॥ केवल बोध प्रभाती केली काकडआरती ॥ २ ॥ नानात्व एकत्व सहित केवळ गणपति ॥ ऐशा भावें सहज चरणीं काकडआरती ॥ ३ ॥

पद ॥ २६ ॥

( राग कल्याण-ताल त्रिवट. )

वंदे श्रीगजमुख नगजाबालं विधुसुललितभालं ॥ वंदे ॥ ध्रु० ॥ चंडीस्तनमंडितशुंडादंडं मदमंडितगडं ॥ सांद्रं मंगलविभवकरंडं कृतदितिकुलदंडं ॥ दूरीकृतजनपदभयभवजालं विधुसल० ॥ ॥ १ ॥ गौरीपरमेश्वरकुतुकारामं कृतविघ्नविरामं ॥ कामं त्रिभुवनैक पूरितकामं सुवरदैभिरामं शरणागतभक्तजनकरुणालवालं ॥ विधुसुल० ॥ २ ॥ आद्याविद्यामृतपारावारं विधिजगदाधारं ॥ कंठे लंबितमणिमुक्ताहारं श्रुतिसंपदगारं ॥ धीरं कविरायपिकै करसालं ॥ विधुसुललित भालं ॥ ३ ॥

पद ॥ २७ ॥

( राग-कालंगडा ताल एका, )

गौरी हरतनया हरतनया ॥ गजवदना गणराया ॥ ध्रु० ॥ स्वामी मज तारी सुखसद्मा ॥ नमन तुझ्या पदपद्मा ॥ गौरी हरत० ॥ १ ॥ विद्यादायक तूं विघ्नहरा ॥ विनायका श्रुतिसारा ॥ गौरी० ॥ २ ॥

आनंदतनय ह्मणे हेरंबा ॥ नित्य तुं पाळिशि विश्वकदंबा ॥ ३ ॥

पद. ॥ २८ ॥

( राग–कल्याणशुद्ध. ताल–त्रिवट. )

नमितो गणराया तुजला॥अघनिरास हरिविलास रचितो बुद्धि देई मजला ॥ नमि० ध्रु० ॥ लंबोदर गजवदन चतुर्भुज चंद्रविराजित भाला॥ सर्वावरणे मंडित दिसती धरुनी रदांकुश जहाला नमि०॥ ॥ १ ॥ सकळारंभी सुरनर जे तुज पूजिती गिरिजाबाळा ॥ सर्व मनोरथ पुरवुनि करिसी विघ्नरहित तूं त्याला ॥ नमि० ॥ २ ॥ मी बाळक न सके अगणित तव महिमा वर्णायाला ॥ मागतसे तव कर जोडुनि भावे दें हारी यश पायाला ॥ नमि० ॥ ३ ॥

पद. ॥ २९ ॥

( राग–खमाज. ताल–रुपक. चाल–हरी तुजविण मज कोण. )

नमो एकदंत भक्तवरदवंत खरारे ॥ ध्रु० ॥ चतुर्भूज हास्तिवदन॥ शोभतसे मुषकवहन॥ पाशांकुश धरुनि करे ॥ येई त्वरे विघ्नहरारे ॥ नमो० ॥ १ ॥ सेंदूरें चर्चितांग ॥ पीतांबर कटि सुरंग ॥ कुंडलयुग दिव्य दिसे ॥ दुर्वांकुर मुगुटिं तुरारे ॥ नमो० ॥ २ ॥ चरणी नूपुरादि नाद ॥ करित येई दावि पाद ॥ नारायण प्रार्थितसे ॥ ठेवि शिरी अक्षया करारे ॥ नमो० ॥ ३ ॥

पद. ॥ ३० ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. )

गज वदन सखा म्या नमिलाहो ॥ ध्रु० ॥ प्रथमारंभी मूळारंभी नाचत रंगणी आणिलाहो ॥ १ ॥ शेषफणीवर मेरूउभारी ॥ वाल्मिके कीर्तनि आणिलाहो ॥ २ ॥ तुका ह्मणे ध्यातो त्याला ॥ वाल्मिकसंदेह फिटला हो ॥ ३ ॥

पद. ॥ ३१ ॥

( राग–बहिरवी. ताल–एका. )

धांवरे धांव आतां ॥ मयुरेश्वरा समर्था ॥ तुजवीण कोण माझी ॥ लाज राखील आतां ॥ धांवरे० ॥ ध्रु० ॥ प्रबळ हा दैत्य झाला ॥ विधात्याच्या वरानें ॥ मजला दुष्ट जातो ॥ बळें घेऊनि रानीं ॥ आधार नाहीं मज ॥ आतां तुजवांचूनी ॥ म्हणऊनि तुज ध्यात्ये कीं बा नाइकसी कानीं ॥ धांव० ॥ १ ॥ दैत्य हा मज नेतो ॥ ब्रीद बुडतें तूझें ॥ नाथअनाथजी गा ॥ घालूं कोणास मी ओझें ॥ संकट फार माझें ॥ कोण हरवील बा हें ॥ यास्तव चित्तीं ध्यातो ध्यान जोगीरे तुझें ॥ धांवरे धांव आतां० ॥ २ ॥

## पदें शंकराचीं प्रारंभ.

### पद ॥ १ ॥

( राग—भैरवकालंगडा. ताल—धुमाळी. रतरेरत स० या चालीवर. )

स्मररे स्मर हृदया शंकरभोळा, धर वदनीचाळा ॥ गोड गोड वद मृत्युंजय हर ध्याइ निरंतर शिव जपमाळा ॥ ध्रु० ॥ तो हा विश्वरूप जगि अवतरला ॥ मायेनें वरिला ॥ ज्यानें शिवसगुण-रूप हृदि धरिला ॥ तो तर नर तरला ॥ धांव धांव मज पाव त्वरित जरि भाव असे गिरजावेल्हाळा ॥ स्मररे० ॥ १ ॥

### पद ॥ २ ॥

(राग—भुपकल्याण. ताल—त्रिवट.)

चंद्रचूड गजचर्मांबरधर । त्रिपुरहरातें अधिं स्तवितों ॥ सकल विघ्नतम दूर कराया । ज्ञानसूर्य शिवशंकर तो ॥ ध्रु० ॥ त्रिपुंड्र भाळीं हिमनगबाळी ॥ अर्धांगी जो शोभवितो ॥ भुजंगीं वेष्टित जानु जयाचें ॥ ध्यानमग्न मंगलमय तो ॥ चंद्र० ॥ १ ॥ निरसुनि साऱ्या बाह्य उपाधी। सदां हि निजरूपीं रमतो ॥ तो शिव रक्षुनि निजभक्तांला । अंतीं सुखशांती देतों ॥ चंद्र०॥ १ ॥

## पद ॥ ३ ॥

(राग—बिभास. ताल—दादरा.)

प्रियकरो हेंचि आतां । श्रीउमापती ॥ ध्रु० ॥ द्वेष त्यजुनि प्रीति भरुनी । अखिल स्नेह चिर्ति वसुनीं ॥ देति सौख्य विबुधजनीं । श्रीसरस्वती ॥ प्रिय० ॥ १ ॥ सकलजनी दुःख नुरो । मेघ-समइं वृष्टि करो ॥ परोपकृति करुनि तरो ॥ अंति भूपती ॥ प्रिय० ॥ २ ॥ योगयाग करुनि मुनी । गाती ध्याती ज्यास मनीं ॥ मंगलप्रद होउ जनीं ॥ तो जगत्पतीं ॥ प्रियक० ॥३॥

## पद ॥ ४ ॥

(राग—मुलतानि. ताल—त्रिवट. दावाशिशुहोनंद०)

किती मी वानू दुर्गुण याचे ॥ध्रु०॥ सुधा त्यागुनि विषचि प्याला ॥ सदां जातसे हा भिक्षेला ॥ मृदंगादिक वाद्यें याला॥नावडुनिकरी स्फुरणदराचें ॥ किति० ॥ १ ॥ बाई माझा भोळा शंकर ॥ भावें अभावें ध्याती जे नर ॥ त्यांसीं देतो इच्छित गे वर ॥ निरसितसे गे दुःख भवाचें ॥ किति०॥ २ ॥ अघटितघटना लोकीं करितो॥ सूत्रधारची त्यांचा होतो ॥ प्रेमानंदें खेळ खेळतो ॥ सुख कसलें त्या गृह युवतीचें ॥ कितीमी० ॥३ ॥

## * पद ॥ ५ ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. अष्टमूर्ति परमेश स० या चालीवर.)

भीतोमाऽलिंगनें तुष्ट शिव रक्षो आह्माला ॥ दशमुख कैलासा उचलिता ॥ क्रुद्धचिजो झाला ॥ ध्रु० ॥ कैलासाच्या चलनें नाचति शिवगण मौजेनें ॥ गुह मातेच्या अंकी धांवे ॥ बसण्याला नेणें ॥ १ ॥ त्यासमयीं अहिवरही होता क्रुद्ध बहू चलने ॥ पाताली जाता जो होता ॥ स्तंभचि चरणाला ॥ २ ॥

## पद ॥ ६ ॥

(राग—झिंजोटी. ताल—धुमाळी.)

शंकरजी मै बाल तुह्मारो ॥ दया करो महाराजरे ॥ पतितके तुम करुनासागर ॥ आज रखो प्रभुराजरे ॥ ध्रु० ॥ खाना पिना सुखसे सोना ॥ धामधुमको राजेरे ॥ इस दुनियांमे पैदा होकर॥ येहि किया सब काजरे ॥ शंकर० ॥ १ ॥ अपना अपना कर-कर आखर ॥ जनम गमाया साररे ॥ भजन पूजनकी बात नहि कछु ॥ गया जनमका फेररे ॥ शंकरजी० ॥ २ ॥ चरनकमलपर सरन आया जो ॥ दगा न देते फेररे ॥ श्रवन सुनी वह बात बडोकी ॥ घेरलियो प्रभुद्वाररे ॥ शंकरजी० ॥ ३ ॥ व्याघ्रचर्मपर जटा बटाला ॥ नंदीपर अस्वाररे॥आनंदात्मज धून लगीहै ॥ शिव शिव मूलाधाररे ॥ शंकरजी० ॥ ४ ॥

पद ॥ ७ ॥

( राग—यमनकल्याण. ताल—धुमाळी. चाल—न्हाणि न्हाणी )

ऐसा शंभो साजणीग हृदयीं ध्यावागे ॥ प्रेमानंदे आनंदे सुस्वर गावा ॥ ऐ० ॥ ध्रु ॥ आदी पाहातां साजणी दिगंबरू ॥ परी प्रेमें पांघुरला व्याघ्रांबरू ॥ गजचर्म तें दुसरें अतिसुंदरू ॥ क्रोधें जाळिला तेणें तो रतिवरू ॥ऐसा०॥१॥ गंगा वाहे झुळझुळां ज-टाजुटीं ॥ आंगीं शोभे विभूति जाला उटी ॥ पन्नगहार रुळतो नीळकंठीं ॥ ज्यातें ध्याती निर्जर तेतिसकोटी ॥ ऐसा०॥ २ ॥ ज्याचे अंकी चिच्छक्ती शैलबाळा ॥ त्रिशूळ हातीं भ्यासुर रुंढ-माळा ॥ ज्याचे नेत्रीं धगधगिती अग्निज्वाळा ॥ नंदीवाहन कर्पु-रगौर भोळा ॥ ऐसा० ३ ॥ ज्याचे भाळीं शोभेहो निशीरमण ॥ चारि मुक्ती वंदिती ज्याचे चरण ॥ ज्यातें ध्यातां चुकेल जन्मम-रण ॥ ह्मणोनि गेला श्रीधर त्यासि शरण ॥ ऐसा० ४ ॥

पद ॥ ८ ॥

( राग—खमाज. ताल—त्रिवट. )

सज्जनहो मृदुकुसुमांजलि तो मंगल देवो सकलाला ॥ हिमनगजेनें

प्रेमातिशयें ॥ शंभुशिरीं जो अर्पियला ॥ ध्रु० ॥ पादाग्री जी उभी राहिली ॥ प्रथम सती शिवपूजेला ॥ पीनकुचभरें वांकतसे परि ॥ पुनः पुन्हा ती सूमृदुला ॥ १ ॥ त्रिलोचनें तंव सस्पृह होउनि ॥ पाहियली ही नतशीला ॥ सलज्ज पुलकस्वेदकंपयुत ॥ झाली बघुनी स्वपतीला ॥ २ ॥ पुष्पांजली मग अधोमुखीनें ॥ लक्षुनी यद्यपि तद्भाला ॥ फेकियला परि मधेंचि पडला ॥ परिमल ज्याचा बहु सुटला ॥ ३ ॥

## पद ॥ ९ ॥

(राग—यमनकल्याण. ताल—त्रिवट. चाल—ये हरि धावत लौकरि गोविंदा.)

सुखद असो तो तुझा शंकर ॥ दुष्टजनां जो फार भयंकर ॥ ध्रु०॥ मखमथनाची कथा प्रियेला ॥ कथी .ह्मूनिया सविस्तर ॥ सुख० ॥ १ ॥ तई क्रोधानें ज्वलितलोचनी ॥ अग्नि विजविले म्या सत्वर ॥ २ ॥ मग गण वसनें हरुनि पाडिती ॥ भीत ऋत्विजां भूमिवर॥३॥ दक्ष तुझा मज सविनय वदला ॥ पाहि पाहि मां भो भवहर ॥ ४ ॥ सुदीनवदना रडली माता ॥ शीघ्र पळाले गे सर्व सुर ॥ ९ ॥

## पद ॥ १० ॥ ✓

( राग—पिलू. ताल—दादरा. )

भज भज भवजलधिमाजि मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥ धरिशिल दृढ चरणकमल घडि भरि तरि करुनि विमल ॥ तरिच सकल पाप शमल त्यजरे भवाला ॥ भज० ॥ १ सांडुनियां विषयवमन, झडकरिं करिं षडरिदमन ॥ पुजिं मन हे करुनि सुमन ॥ गिरिजाधवाला ॥ भज०॥ २ ॥ सावध हो करिशि काय ॥ शंकरगुरु बापमाय ॥ चिंतुनि कवि रामपाय ॥ हृदयीं निवाला ॥ भज ३

## पद ॥ ११ ॥

[ राग—कालंगडा. ताल—झुमाळी. अष्टमूर्ति परमेश० या चा० ]

भालचंद्र त्रिपुरारी शंकर तुह्मांस सुख देवो ॥ आदिपुरुष जो सर्व जगाला ताप सकल निरसो ॥ ध्रु० ॥ ॐस्वरूपी सद्‌गुरुराणा निश्चल हा ठेला ॥ चैतन्यरुपी· मायास्फूर्ती उद्भवली त्याला ॥ तिणें निर्मिलें हरि हर ब्रह्मा त्यानें जगताला ॥ ऐसा जो स्वामी सकलांला ॥ भवाब्धिपार करो ॥१ ॥

## पद ॥ १२ ॥

[रागिणी–भैरवी· ताल–दादरा·]

वीष कंठनीलग्रिव भालनेत्र देवा ॥ संसारी त्रास बहू दीननाथ धांवा ॥ ध्रु० ॥ क्रोध लोभ दंभ रिपू परम गांजिती ॥ विषयतमीं मग्न असे नित्य मन्मती ॥ अन्य कांहीं प्रीय नसे कनक यूवती॥ क्षणिक सुखा लुब्ध चित्त शांति नाहीं पावा ॥ १ ॥ स्त्रिया पुत्र आप्त सर्व वित्त मित्र होती ॥ अंतीं नाहीं कोणि कुणा एकटे च जाती ॥ धर्म मात्र अनुसरतो एक त्यांप्रती ॥ मोहपाश दुर्धर हा सुमती मार्ग दांवा ॥ २ ॥ विषय वित्त मदें मत्त तुला विसरती ॥ परी काळपाश भया ते न जाणती ॥ ईह वस्तु संगतिनें त्रासलों अती ॥ शरण दास वामन हा मुक्तिपदा न्यावा ॥ ३ ॥

## पद ॥ १३ ॥

(राग–कालंगडा· ताल–धुमाळी·)

रथ गज वारू त्यागुनि सारे वृषभावरि बसतो ॥ सुंदरवस्त्रें सोडु- नि पांघरी गजचर्मांबर तो ॥ ध्रु० ॥ कैलासासम सुस्थळ टाकुनी स्मशानी वसतो॥पिशाच्यांच्यासंगेंअनुदिनी नृत्य सखे करितो॥१॥

## पद ॥ १४ ॥

[ राग–झिंझोटी· ताल–धुमाळी· ]

शिवचंद्रेश्वर पूर्ण कृपाकर ॥ देयी परमानंद मला ॥ शिव० ॥ ध्रु० ॥ मुनिवर तुज गाती पाळिसि तूं ॥ जगा परि जिव बहु श्रमला ॥ शि० ॥ १ ॥ स्वात्म रज्जुवरी कल्पुनि जगभुजगा

तुज चुकला भ्रमला ॥ शि० ॥ २ ॥ करी नमन निजजगन्नाथसुत ॥ कृष्ण तुझ्या पदीं बहु रमला ॥ शिव० ॥ ३ ॥

पद ॥ १५ ॥

[राग—कल्याण. ताल—एका. क्षणभंगुर संसार०या चालीवर.]

नमन पदीं ॥ चंद्रेश्वर महाराज ॥ ध्रु० ॥ पूर्णकृपेनें दर्शन घडलें ॥ धन्य दिवस मज आज ॥ न० ॥ १ ॥ पर्वतशिखरीं साच न जाचती ॥ चढतां सज्जन पाज ॥ न० ॥ २ ॥ जगन्नाथसुत कृष्ण ह्मणे कीं ॥ साधि मदिच्छित काज ॥ न० ॥ ३ ॥

पद ॥ १६ ॥

[ राग—कल्याण. ताल—एका. ]

वद वद वद रसने हर सांब सांब सांब वद० ॥ ध्रु० ॥ विश्वेशा बद्रिनाथ महंकाळ सोमनाथ ॥ ॐकारा घुस्मेश्वर त्र्यंबकेश मृडशूली ॥ जग दंब दंब दंब दंब ॥ १ ॥ भीमाशंकर महेश ॥ वैजनाथ नागेश ॥ रामेश्वर मल्लेश ॥ द्वादशलिंगादि स्मरुनि अंब अंब अंब अंब ॥ वद० ॥ २ ॥ अनुदिनि सत्संग धरुनि ॥ रंगि रंगला भुजंग ॥ नाथ नमुनि हर हर हर सांब ३ ० ॥ वद० ॥ ३ ॥

पद ॥ १७ ॥

(राग—बिभास. ताल—दीपचंदी. नमामीमहिषासुरमर्दिनि याचा०)

तुझा तो शंकर सुखकर हो ॥ हिमधरस्थित विकट काननिं तप करी प्रियकरी शुभकरी सुंदरी तिजवरी भुलत निज कैलासनगिं तों ॥ शंकर सुखकर हो ॥ ध्रु० ॥ पद्मजा मुररिपुस ही अवमानुनी इंद्रा चंद्रा सकलां सोडुनी पर्णुनीं कुंदरदनी सुकुंतला वेणी जाहली शिव वरानुसारिणी पर्वताग्रशिरोमणी अर्पि कन्या सद्गुणी हर्ष निर्भर करग्रहणीं झाला महादेवास ॥ तुझातो० ॥ १ ॥

पद ॥ १८ ॥

(राग—कालंगडा. ताल—दादरा. सुंदरमुखबुंदिकतनु याचालीवर.)

त्रिभुवनपति गिरिशसुमति पार्वतीवरा ॥ वृषभवहन असुरहनन भजक भव हरा ॥ ध्रु० ॥ क्षितिधर-कुलभूषणनवपद्मसुंदरा ॥ क्षितिजनधनदुरितभंगसिंधुवरधरा ॥ क्षितिजाधवसदनहृदयकांतिदिनकरा ॥ क्षितिपति–पुरकांति-नृपतिसत्वशुभकरा ॥ सुमना, सघना, माना, भजकजना, पदिं नमना, अघ शमना, हे उमावरा ॥ त्रिभु० ॥ १ ॥ त्रिपुरसुमदशमन मदन दहन ईश्वरा ॥ त्रिगुणविवश मंत्रविनुतमूर्ति परिकरा ॥ त्रिनयन कलितापशमन तीव्रविषधरा ॥ त्रिशिरवदन रुद्र सुरुद्राक्षकंधरा ॥ निखिला, विमला, सुबला, भजअबला पदकमला धरिं चपला भुवनसुंदरा ॥ त्रिभुवन० ॥ २ ॥ चंद्रानन भालचंद्र भस्म तनुधरा ॥ चंद्र स्मित वदन प्रिय मृगवरांबरा ॥ चंद्रकिरण रुचिर वर्ण शूल दक्करा ॥ चंड रुंड कुसुममालधरसुरामरा ॥ देवा, दावा, प्रभवा, कलि विभवा, करिं अभवा, मम विनवा पाव ईश्वरा ॥ त्रिभुवन० ॥ ३ ॥

पद ॥ १९ ॥

( राग–बिभास. ताल–त्रिवट. )

रणधीरा श्रीवर वरद गणपकुमरा ॥ निखिल सुराभरण ॥ ॥ रण० ॥ ध्रु० ॥ मार हरा विबुध वरा मोदकरा बहुगुणगंभीरा ॥ भस्मधरा विनतपरा कलितगरा सुख निकरा ॥ सुगिरा सुस्वरा हृत कालकृतदरा श्रुतिशिखर सुविहारा ॥ ने बा तूं हा पतित निज वरा तुजचि शरण ॥ रण० ॥ १ ॥ दिग्वसना पुरमथना शिखिनयना पदनतसंस्थाना ॥ वृषवहना मुदितमना भवशमना कलिदमना ॥ स्वजनाकलना श्वशुराध्वरलवना स्थितिलयजन्यवसाना ॥ भो ताता तूं चुकवि शिवहरा जनन मरण ॥ रण० ॥ २ ॥ वेदनुता भ्रमरहिता बोधरता हिमनगजामाता ॥ योगजिता बहुविनता रजतसिता सुखभरिता ॥ वनितासहिता तव किंकरलवता करिं मकळी

बलवंता ॥ श्री कीं भूतीं प्रिय न मज जरा तवचि शरण ॥३॥

## पद ॥ २० ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. तोंवरीतळमळरे०)

हर हर शंकरजी २॥ कां केली इतराजी ॥ धृ० ॥ रक्षाया सत्वातें ॥ वधिलें वृथाचि म्या पुत्रातें ॥ हर हर० ॥ १ ॥ यश हे मुद्दल गेलें ॥ व्याजा ऐवजिं बाळहि दिधलें ॥ हर हर० ॥ २ ॥ निपुत्रिकचि मी चिलया ॥ झालों लावुनि तुज यमनिलया ॥ हर हर०॥३॥ धांवा गिरिजानाथा तारा आतां अह्मां अनाथा ॥४॥

## पद ॥ २१ ॥

(राग—खमाज—ताल—धुमाळी. पंचतुंडनररुंडमाळधर याचालीवर०)

सुंदरवदना भवभयहरणा इंदुशेखरा त्रिपुरहरा ॥ भस्मचर्चिता नंदीवहना नागभूषणा महेश्वरा ॥ धृ० ॥ त्रिलोचना हे दीनदयाब्धे दैत्यमर्दना विश्वपते ॥ भक्तरक्षका• त्रिभुवनवंद्या गौरीरमणा डमरुधरा ॥ सुंदर० ॥ १ ॥ ज्ञानदीप हा लावुनि आजी अज्ञानतमा दूर करीं ॥ भक्तकामना पूर्ण करोनी तोषवि सकलां दुरित हरा ॥ सुंदर० ॥ २ ॥

## पद ॥ २२ ॥

(राग—खमाज. ताल—त्रिवट. चाल—जयश्रीरमणा भवभयहरणा याचालीवर)

पंचतुंड नररुंड मालधर पार्वतीश आधीं नमितों ॥ विघ्नवर्गनग भग्नकराया विघ्नेश्वर गणपति मग तो ॥ पं०॥ धृ० ॥ कालिदास कविराज रचित हें गानीं शाकुंतल रचितों ॥ जाणुनियां अवसान नसें हें महत्कृत्यभर शिरिं घेतों ॥ ईशवराचा लेश मिळे तरि मूढ यत्न शेवटिं जातों ॥ या न्यायें बलवत्कवि निजवाक्पुष्पीं रसिकार्चन करितो ॥ पंचतुंड० ॥ १ ॥

## पद ॥ २३ ॥

(राग—असावरि. ताल—आदि. स्मरहरीशिवशंकर—याचा०)

भो हर जलत्रिशुलधारी शंकर काशीशा ॥ध्रु० ॥ मदनदहन त्रिपुरहनन पाव नंदिकेशा ॥ पार्वति सति करित नुति अंकीं सर्वेशा ॥ १ ॥ प्राशुनि विष जलधिमथनिं रक्षिलें सुरेशा ॥ सुरवर शिव भवभयहर मणिकर्णिकेशा ॥ २ ॥ अघ मल बल हरिल सकल ह्मणुनि आनंदें ॥ गातों तुज बालकृष्ण रक्षि जगदीशा॥३॥

## पद ॥ २४ ॥

(राग—भूपकल्याण. ताल—त्रिवट. चाल—कोरहगीतूंयर्थरुसमी)

भावें स्तवूं तो शिव भोळा ॥ देऊनियां भक्तां मुक्ति मति मंदां देई॥ दूर करी तो त्या काळा ॥ ध्रु० ॥ जाणितां पद सदां तयाचे तोडुनि हा भवबंध करी अघभंग तो दयावंत हरुनि सकल ह्या दुःखाला ॥ देउ० ॥ १ ॥

## पद ॥ २५ ॥

(राग—जिल्हारवमाज. ताल—त्रिवट.)

संकर शिव भंभं भोळा ॥ कैलासपत महाराज राज संकर०॥ ध्रु० ॥ अर्धांगीरूप मनछायरूप ॥ सोभा अनूप भये चकित भूप ॥ ज्याके धिमिकी धिमिकी गत डमरु बाजे संक०॥ १ ॥ ओढे मिरिगछाल॥ गले रुंडमाल ॥ लोचनबिसाल है लाल ॥ ज्याके चंद्रभाल अन अत बिराजे सं० ॥ २ ॥ कहे दास निजमिकर जोरजोर ॥ देह भक्तिदान राखो मान मान ॥ ज्याके चरन बिन सरन कहां जाउं ॥ संकर० ॥ ३ ॥

## पद ॥ २६ ॥

(राग—कल्याण. ताल—त्रिवट.)

शिवहरशंकर सांभ भजावा शि० ॥ ध्रु० ॥ अर्धांगीं गिरितनुजा विलसे ॥ जटाजूटी गंगांभ ॥ भ० शिवहर० ॥१॥ यद्रूपा ब्रह्मादिक नेणती ॥ मानव ते भांब ॥ भजावा शि० ॥ २ ॥ सुरभूसुरपीडक

दुर्दैत्या ॥ सर्वांगी भय बांव ॥ ३ ॥ नानादेवी एकचि शोभे ॥ शंकर परापरांव भजावा ॥ शि० ॥४॥

## पद ॥ २७ ॥

(राग–मालकौंस. ताल–त्रिवट.)

शिवशिवशंभोगा हरऽऽ॥ शि०॥ ध्रु० ॥ त्रिपुरमथन कैलासभुवनपति अंकिं अपर्णा शिरि गंगा ॥ संगें विराजित बाल गजानन ऐसा शंभो आलिंगाऽऽ ॥ १ ॥ कामादिक हे षड्रिपु जलचर॥ मार्गी बहु करिती दंगा॥ त्यासि निवारण गुरुचरणीं शिर ठेविसि तरि पावति भंगा शिव० ॥ २ ॥ अन्यदेवता फल इच्छाया ॥ धुंडुनि बहु घालिति पिंगा ॥ कां वाया हे श्रमविसि काया ॥ दास ह्मणे शिवलिंगा ॥ शिवशि० ॥ ३ ॥

## पद ॥ २८ ॥

(राग–पिलु. ताल–झुमाळी.)

सदाशिवधुंदी॥ भूतळी त्रिविधजन निंदिति पाहुनि संधी ॥ सदा० ध्रु० ॥ बाइलवेडा पाई चालतो ॥ योग्य न हे आनंदी ॥ सदा० ॥ १ ॥ वृद्ध गौरिला पाई चालवी ॥ धट्टाकट्टा स्कंधी ॥ सदा० ॥ २ ॥ हासत दोघे चालति तेव्हां ॥ फुकट पोशिला नंदी ॥सदा० ॥३॥ दोघे एकचि वाहन करिती ॥ मरेल हा नंदी सं० ॥ ४ ॥

## पद ॥ २९ ॥

(राग–सारंग. ताल–त्रिवट.)

नतावना पावना ॥ शंभो दीनावरि करिं करुणा ॥ ॥ ध्रु० ॥ पर शुभ्रगवरा ॥ भीतीकलना ॥ हस्तचतुष्कीं नंदीवहना ॥ तुंबर नारद करिती गाना ॥ सनकसनंदन धरिती ध्याना ॥ नतावना० ॥ १ ॥ वर्णिति मुनि तव लीला नाना ॥ वेदासी तो पार कळे ना ॥ त्या तूं ह्मणसी भक्ताधीना ॥ त्वदन्य किमपी तत्व असे ना ॥ नताव०॥ २ ॥ कैलासाचलप्रतिनिधिभुवना ॥अर्धांगीकृत

गिरिजाललना ॥ मूढहर शंकर पंचसुवदना ॥ अमरगणस्तुत प आसीना ॥ ननाव० ॥ ३ ॥ तातमाय तूं संकटशमना ॥ प्रेमपूर्ण इंद्रीयदमना ॥ जे करिती तुव नामस्मरणा ॥ त्या प्राण्याप्रति किंचित् भय ना ॥ ननाव० ॥ ४ ॥ दे दे मजसी शीघ्र दर्शना ॥ वारिं वारिं अज्ञानबंधना ॥ सांब सदाशिव त्रीपदललना ॥ वासुदेव करि वंदुनि कवना ॥ नतावना० ॥ ५ ॥

## पद ॥ ३० ॥

( राग–झिंजोटी. ताल–एका. )

गिरिजारमणा तूं पाहि मां ॥ पाहि मां पाहि मां पाहि मां पाहि मां ॥ जयरतिपतिदहना गिरिजारमणा तूं पाहि मां ॥ ध्रु० ॥ त्रैलोचन पिनाकपाणी ॥ विलसताति पन्नग श्रवणीं ॥ विपदहरण भवतरणचरण करिं ॥ स्मरण करि त्या उद्धरिं वृषवहना ॥ गिरिजारमणा० ॥ १ ॥ जय मृत्युंजय अघनाशा ॥ सुरगण मुनि स्तविति सुरेशा ॥ गांग सांग अर्धांगि विलसती ॥ कैलासाधिपने गुणगहना ॥ गिरिजार० ॥ २ ॥ देवरायहृदयविहारा ॥ मां पालय जगदोद्धारा ॥ साररहितसंसार हरुनि ॥ भवपार करिसी उद्धरिं वृषभवना ॥ गिरिजा० ॥ ३ ॥

## पद ॥ ३१ ॥

(राग–खमाज. ताल–दादरा.)

हरा तुजविण मज कोण दुजा सांग तरीरे ॥ ध्रु० ॥ निगमागम वदती सर्व ॥ प्राप्त मनुजवंशपर्व ॥ त्यांत नव्हे प्राप्त शर्व ॥ गर्व असा कोण धरीरे ॥ हरतु० ॥ १ ॥ न धरुनियां मनीं हट्ट ॥ शांत करी दुःख गट्ट ॥ नाणि मनीं हाचि भट्ट ॥ दीन ह्मणुनि धरीं करींरे ॥ हरा० ॥ २ ॥ तुजपासुनि नहो त्राण ॥ न भजे कोणी सुजाण ॥ स्पष्ट वाहुनिया आण ॥ जाण तरी खरी वैखरीरे ॥ हरातु० ॥ ३ ॥

## ॥ पद ॥ ३२

(राग—काफी. ताल—त्रिवट.)

कर्पुरगौरा शंकरा ॥ देईं त्वत्पादांवुजीं थारा ॥ कर्पुर ॥ध्रु०॥ पंचमुख दशभुजां जटा शीरी ॥ व्याघ्रचर्म फणी हरा ॥ कर्पुर ॥ १ ॥ वृषभवहन निळकंठ भाळि शशी ॥ हृदईं ध्यासी रघुवीरा ॥ कर्पुर ॥ २ ॥ पुर्ण ब्रह्म रघुनाथभक्त तूं ॥ गणपतिदुरीतनिवारा ॥३॥

## ॥ पद ॥ ३३

(राग—काळंगडा. ताल—धुमाळी. चाल—वारी संकट हरी दामा०)

वद जिव्हे मृडहर शंकर भोळा ॥ सहहिमगिरी बाळा ॥ वृषभारूढ संगें भैरवपाळा ॥ करि नाग नव्हाळा ॥ धिमिकी धिमिकी धिमि डमरु वाजति ॥ जटेमाजि श्रीगंग जिव्हाळा ॥ वदजि० ॥ १ ॥ चर्चिली विभुती सर्वांगाला ॥ वरी चंदनधवला ॥ हृदयावरी शोभे नरशीरमाळा ॥ भज कंठनीळा ॥ तृतिय नेत्र त्रैताप निवारण ॥ दिव्य दिसति वैश्वान्नर ज्वाळा ॥ वदजि० ॥ २ ॥ घे हातीं त्रिशूळ शृंगि मृगाला ॥ खट्वांग कपाळा ॥ शर कार्मुक मिरवी फिरवी भाळा ॥ दे वर भक्ताला ॥ पंचवक्त्र श्रीसत्यनाथ शिव ॥ पूजुनि सुमनें मनीं निवाला ॥ वद जिव्हे मृडहर०॥ ३ ॥

## पद ॥ ३४ ॥

(राग—कल्याण.ताल—दीपचंदी. चाल—हा नर जन्म कीति मनुजा.)

रत शिव सांबपदीं॥क्षमराज सदोदित॥तुजरे तुज मनुजा॥ रतशि ॥ ध्रु० ॥ दुर्धर भव जो तारक पाही॥ लक्षुनी या हृदईं॥तोचि दयार्णव रक्षक या जगीं॥तुजरे तुज मनुजा ॥ रतशि० ॥ १ ॥ अपार ज्याची सत्ता उद्भवली आवनी कोणगती ॥ निगमासी अगोचर रूपरे रूप मनुजा ॥ रतशि० ॥ २ ॥ नित्य सदाशिव देखे नयनी॥अभ्व महे करणी केवि वंदो ॥शेषादिक मूकले॥गुजरे गुज मनुजा ॥ रतशिव० ॥ ३ ॥

## पद ॥ ३५ ॥

(राग–झिंजोटि. ताल–धुमाळी. चाल–नरदेहाच्या जन्मा येऊनि.)

या भवनदितुनि पार करीं मज ॥ दयानिधे गिरिजारमणारे ॥ याभव० ॥ ध्रु० ॥ व्याघ्रकडांसन मृगचर्मांबर वासुकि कंठी भुषणारे॥जटा पिंगटा भस्मांकितधरणें योग दिसे बहु मोठारे ॥ याभव० ॥ १ ॥ त्रिशूळडमरू अवघे शोभति अंकीं गिरिजा गणपतिरे ॥ जटाजुटेतुनी गंगा वाहे भाळी चंद्र ही अर्धा ॥ याभव०.॥ २ ॥ लंकानाथें साम गाइलें प्रसन्न तुजला केलारे ॥ आत्मलिंग हें काढुनि देसी असा तु शंकर भोळारे ॥ याभव०॥३॥

## पद ॥ ३६ ॥

( राग–गौडी. ताल–भजनी. चाल–कसें ग बाई मारुं माझें न० )

सबदुनिया पालनवाला ॥ हजरत अल्ला ॥ सबदु० ॥ ध्रु० ॥ शिरपर जटाजुटकेढाला॥उस्मे छपी येकहै बाला ॥ अखियन चंदर सुरज ऊजाला ॥ तीजानयन अग्निके ज्वाला॥रखने वाला ॥ सबदु० ॥१॥ विससे कंठ भयोहै नीला॥सोबत गला रुंडके माला॥ हिर्दे गिर्दे कुसाबाला ॥ गनेसनंदन जो गुलाला ॥ रखने वाला ॥ सबदु० ॥ २ ॥हात्मे डमरू त्रिशूल भाला ॥ मुद्रा अगाध पूर्ण कृपाला ॥ तात सब दुनियाके प्रतिपाला ॥ अंतरध्यान धरित मनमोहन लछयुमन बाला ॥ रखनेवाला ॥ सबदु ०॥३॥ आसन बनारसीमो डारा ॥ चर्चितबभुत राजमृगछाला ॥ बरदेनेको बहूत भोला॥ अमृतरायका बारंबार करत उपराला ॥ रखने वाला ॥ सब०॥४॥

## पद ॥ ३७ ॥

[ राग–गौडी. ताल–भजनी. चाल–हरिचें नाम कदा काळीं.]

नमुनियां पाय भावें पार्वति शिवाचें॥ जपताती नाम सांगा कोणाचें ते वाचे ॥ध्रु०॥ तुझाविण कोण श्रेष्ठ सांग देव देवा ॥ ब्रह्माविष्णु ईशानही करितावि सेवा ॥ नमु० ॥ १ ॥ सनकादिक ऋषि

सर्व चरणी लागती ॥ ब्रह्मऋषि तुंबर सिद्ध गित गण गाती ॥ न-मु० ॥ २ ॥ सूर्य चंद्र इंद्रादिक भावें पूजिताती ॥ सुरासुरकिंन्नर तेही नामें विश्वासती ॥ नमु० ॥ ३.॥ काय तुह्मा ऐसे वेड लावियलें कोणी ॥ सत्य सांगा मज तुह्मी नमी पाय भावें ॥ न-मु० ॥ ४ ॥ ऐकोनियां सांब हांसे बोलतां उत्तर ॥ ऐक भाणे हितगुज पूर्ण परात्पर ॥ नमु० ॥ ५ ॥

## पद ॥ ३८ ॥

( राग–ताल–चाल–सदर प्रमाणें. )

शिव वदे पार्वतिसी ऐक प्रिये कांते ॥ साराचे सार तूतें सांगतो येकांते० ॥ ध्रु० ॥ अहंतत्व मुळिचा शब्द मुळमाया झाली ॥ शुद्धसत्विं साह्यभूतां निखिलची व्याली ॥ शिव० ॥ १ ॥ जिव शिव मृगजळ शोधोनिया पाही ॥ सोहं अहं जाणोनिया अंतरीच व्याली ॥ शिव ॥ २ ॥ मध्यरामपदीं लीन अखंड रमावे॥नमःशिव ह्मणउनि जप प्रेमभावें ॥ शिव व० ॥ ३ ॥ जिवजंतु वाराणसी त्यांसि अंतकाळीं ॥ तारक मि उपदेशी वाचा सुकाळी शिव० ॥ ४ ॥ गुह्याचें गुह्य तूतें सांगितलें आजी ॥ पूर्ण भक्ति पूर्ण कृपा तुजवरी माझी ॥ शिव० ॥ ५ ॥

## पद ॥ ३९ ॥

(राग–कालंगडा. ताल–दादरा. चाल–भज भज भव जलधिमा०)

शंकर महादेव देव ॥ सेवक सब जाके ॥ ध्रु० ॥ भस्म आंग शेष गंग ॥ वाहनबल अति प्रचंड ॥ गिरिजा अर्धांगसंग ॥ रंग भंग छाके ॥ शंक० ॥ १ ॥ लपट लपट चलत व्याल ॥ वोढे तन मृगशाल ॥ मुंडमाल चंद्रभाल ॥ दृगबिशाल जाके ॥ शंकर॥२॥ भक्ती जन तुलसिदास ॥ गौरीपत चरन आस ॥ ऐसा बहु भेख धरे ॥ भक्ती हित थाके ॥ शंक० ॥ ३ ॥

# श्रीदत्ताचीं व गुरुचीं पदें.



(राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—बहु धीर शरनदीतीर.)

श्रीदत्तराज महाराज करितसे काज भक्तकैंवारी २ ॥ वसतसे कपित्थाक्षेत्रीं बहु सुखकारी ॥ गुरुवारीं सकळ मुनी हारी कपिल व्यासादि हेमगिरिवासी २॥ आदिमाधव बाळकृष्णविराडसी धरीवासी ॥ अवतार त्रैमूर्तिचा, वश्य भक्तिचा, धणी मुक्तिचा, दाविमोक्षासी २॥असि अगाध महिमा ज्याची दुसरी कासी॥बहु अर्चा सहवानरी, किदाटनभारी, तिष्ठती द्वारि, भरतिपरसी२॥ कर्णार खेट बहु जमतीं अठवे दिवसी॥अक्षई समाधी स्थीर, बहू गंभीर कृष्णातीर, पंचकोसी२॥ बिल्लाटक्षेत्र बहु पवित्र नित्य स्नानासी ॥ चाल ॥ किति खुळे कितेक जन भोळे धांवती॥ किति भुते समंदसबाळे आरंडती ॥ किति शमिवृक्षावर सरळे वळगती ॥ किति कंटाळुनि दिपमाळा बैसती ॥ दर्शनि, हरतपीडा, उपरती मुदा, वाजे चौघडा, किं नौबद गहरी, तासेमरफे झडती नित्य बहू दरबारी ॥ श्रीदत्त०॥१॥ दीन अनाथाचा कनवाळ, ठेवितां भाळ, न बाधे काळ, धासत प्रभूची॥ धमार्थकाममोक्षादी दौलत ज्याची॥ येती दर्शनि मुनिजनवृंद, सदां आनंद, सच्चिदानंद,पूर्णब्रह्माची २॥ असा फार महिमा उपमा कैलासाची॥ यति शरणांगत किति दुष्ट, अंगावरी कुष्ट,होतसे पुष्ट, दृष्टि पडतांची॥ धडधडा पातकें जळतीं जन्मांतरिची ॥ पहातांच तनमन जडे प्रदक्षिण घडे बहु अवघडे सोमसूत्राची॥ येति भेटिस सुरवर तळि घेउनि स्वर्गांची ॥चाल॥ त्रिकाळ पूजा उपचार अर्पिती॥ कोणी अभिषेकपात्रीं धार लाविती॥ कोणि अनुष्ठानि निराहार बैसती॥ सेवेसी सांडुनि घरदार राहती

॥ चाल ॥ किति जडुन, राहिले पडुन, दोष गेले उडुन, स्वस्थ नि-
र्धारी ॥ रिद्धिसिद्धी अष्टमानिधि रहाती द्वारीं ॥ श्रीदत्त० ॥२॥
देवालय मकराकार, दिसे मनोहार, स्वयंत्राकार, रचना केली २ ॥
सांसे वतुन विषुले चिरे जडानि जडली ॥ महाद्वारी वक्रतुंड, आं-
गणीं चंड, नंदी प्रचंड, त्याचे रखवाली २ ॥ प्रसन्न विडसी पा-
हतां पातकें झडलीं ॥ सव्यांगीं उभा मारुती, लहान आकृती,
श्रीविठ्ठलमूर्ती, मनीं भरली ॥ क्षेत्रस्वामीची समाधी सन्निध ठ-
रली ॥ दोहीं बाजू धर्मशाळ, खांब वीशाळ, वरी दिपमाळ, गगना
गेली २ ॥ परिघामदी बांधीव आडसुखा मसखोली ॥ चाल ॥
आंगणीं तीर्थ पुष्करणि कोणी पहा॥ दुपारीं येत भागीरथि कोणी
नहा ॥ कोणी त्रिकाल दर्शन करूनी घरीं रहा॥ एकपत्र पळीभर
पाणी कोणी वहा ॥ असा महिमा वर्णू किती॥शिणला फणिपति॥
पुत्र प्रसवती कीं वंध्यानारी ॥ करी अघटित उद्भव पिंपळशमी-
चेपारी ॥ श्रीदत्त० ॥ ३ ॥ प्रतिवर्षिं चार उछाह, किं दुरवर
नांव, घेति बहु धांव, मिळती द्विजवर ॥ होतसे समाराधनाचि
मुक्तद्वार ॥ शिवरात्र, रामनवमी, मंगलधामी, आषाढींदशमी,
छबीनाभार ॥ चमकतो पुढें कोतवाल थैथैकार ॥ परिघामदी
जागा खासी सभेंवती फरसी दिसे जसी आरसी शोभा-
फार ॥ मंडपसभोंवता मेंदु सुंदरशिखर ॥ चिरेबंदिसभोंवतातट दुरि
गुदरनिट कोमहापटमज्बुतफार दिसतसे कीं जैसा गडकिल्ला मुल-
ज्यार ॥ चाल ॥ फडकती कतीची ढाल भुमिवरी ॥ चोघडा माल-
वणी मोल कोण करी ॥ वाजति दुंदूभी ढोल एकसरी ॥ उडताती
चौंरी मरूचेल प्रमुवरी ॥ जगडताळ करताल झ्यल्लरी ॥ प्रदोष-
काळीं, महापुजन, करिति द्विज सजन, होत मग भजन, वेदघोष-
भारी२ ॥ होतसे मंगलस्नान दर्शनवरी ॥ श्रीद० ॥ ४ ॥ मुखि

घेतां जाचें नाम, यम करी सलाम, होतसे गुलाम न करि बळजोरी ॥ वर नेति श्रुतीचौमुक्तीचा अधिकारी ॥ सेवेसी धावती तमाम, करितसे काम, घेतसे धाम, न्विाढा भारी ॥ इच्छिले मनोरथ पूर्ण करी मदनारी ॥ नाहीं नाहीं कोणाची अटक, धेनुचि कटक, पांढरीफटक, येकरंग सारी ॥भुजवितां तोडणकरितां मरजी कारि॥स्वामिची बरोबर सीस्त, असे ग्रामस्त, बहु नेमस्त, नित्य दरबारी, हरिकिर्तन पुराण गुणीजन मणीपांतरीं ॥ नांदतो असा जगदीश, जगाचा ईश, विजयदशमीस निघत्ये स्वारी ॥ असी सीमाउलंघन नसे दुजे क्षितिवरी ॥ चाल ॥ देवघरा स्वारी स्वामींची जातसे ॥ बहुप्रकार ध्वनि वाद्यांची उठतसे ॥ नरनारी वाट स्वामीची पाहतसे ॥ सुप्रभा चंद्रजोतिंची पडतसे,॥ दोंहीं बाजूं दार्टी आरत्याची होतसे॥ बहु मना लागला ध्यास, फार हव्यास, ह्मणे देविदास, प्रभु मला तारी ॥ गुंतले चरणकमलास हेत जसा भ्रमरी ॥ श्रीदत्तराज० ॥ ५ ॥

॥ पद ॥ २ ॥

( राग—कल्याण. ताल—त्रिवट. चाल—जल भरन जात जमुना. )

भज मनुजा नरसिंव्हसरस्वति ॥ यतिवरजी गुरुराज महामुनी ॥ ध्रु० ॥ भस्मविलेपीत कांति विराजे ॥ वास औदुंबरीं गाणगभुवनी ॥ भज० ॥ १ ॥ जडितपादुका पाई मिरवती ॥ विचरतसे स्वछंदें अवनी भज० ॥ २ ॥ स्मरतां सत्वर पावे निरंतर ॥ तत्पर निजदासाच्या अवनी ॥ भज० ३ ॥ दास नारायण चरणीं तनुमन ॥ अर्पुनि सादर तद्भजनिं मनीं ॥ भज० ॥ ४ ॥

पद ॥ ३ ॥

( राग—देस. ताल—त्रिवट. )

स्मरा गुरूराया ॥ दुस्तरभवनदीमाजी असे जो ॥ नौका पार कराया ॥ स्मरा गुरु० ॥ ध्रु० ॥ कौशेयांबर कटी वेष्टुनिया, दंड-

कमंडलुहातीं॥खेचरमुद्रांकित सद्गुरु तो, स्मरतां करिल दया॥स्मरा० ॥१॥ अवदुंबरतळी नामसदोदित, गातां हरिल भया तो ॥ ज्याच्या नामस्मरणें पावती, त्रिविध तापहि लया ॥स्मरागुरू०॥२॥ अनसूयात्मज दत्त दिगांबर हाचि ध्यास मनांत या ॥ ह्मणे गणपति नित्य असों दे, प्रार्थी नमुनि तया ॥ स्मरा०॥ ३ ॥

## पद ॥ ४ ॥

( राग–झिंझोटी. ताल–दादरा. चाल–नकोनकोस्त्रीसंग. )

तारि ३ मला ॥ श्रीगुरूयती हो ॥ध्रु०॥ पंचनदी कृष्णातिर ॥ संगम तो अतिसुंदर॥कल्पतरू अवदुंबर॥वृक्ष शोभती हो ॥ ता० ३ मला० ॥१॥ त्रिगुणात्मक मूर्त्ति दत्त ॥ भक्तजना वरदहस्त ॥ दंडकमंडलु पद्म ॥ हस्तिं झळकती हो ॥ ता० ३ ॥ २॥त्रिविधताप जाळिती मज॥कामादिक पीडिति बहु॥ पंचविषय अतिदुर्धर ॥ बहुत श्रमविती हो ॥ ता० ॥३॥ तुजवांचुनी चिंतामणी ॥ प्रार्थी नाणिका कोणी ॥ धांव सख्या पाव नर–सिंहसरस्वती हो ॥ ता०॥ ४ ॥

## पद ॥ ५ ॥

( ताल–घुमाळी. चाल–बा किती घालिशी संसृतिचा पिंगा. )

आजी दिवस भासे मजला सोन्याचा ॥ पाहिला सद्गुरुराज त्रिभुवनिचा ॥ यतिवेष घेउनिया कृष्णातीर ठाई ॥ बैसले दयाघन औदुंबर छाई ॥ कनवाळु गुरूवर दीनाची आई ॥ रक्षी सुसंकटीं स्मरतां लवलाई ॥ परिणामीं सद्गुरुविण तारक नाहीं ॥ ह्मणुनियां गर्जती श्रुतिशास्त्रें साही ॥ त्यातेंही न कळे महिमा चरणाचा ॥ पाहिला०॥ १ ॥ मासांत मास उत्तम मार्गशीर ॥ पौर्णिमेसि धरिला गुरूनीं अवतार ॥ त्रिगुणात्मक विधि हरि शिवकर्पुरगौर ॥ चाल ॥ भस्मांकित गात्रे दत्तदिगांबर ॥ झाले अनसूया अत्रिचे कुमर ॥ या युगीं तारिता गुरु दीनोद्धार ॥ जगदांतरवासीं जीवन जीवाचा ॥ पाहिला० ॥ २ ॥ शनवारी

शिबिकारुढ खासे स्वारी ॥ सप्रेमानंदें पाहती नर नारी ॥ पोषाग कुसुंबी शोभे जरतारी ॥ श्रवणांत कुंडलें रविइंदूपरी ॥ नवरत्नें झळकती शिरपेंचावरी ॥ मोतियाचा तुरा खोवियला शीरीं ॥ तुळसीवनमाला सुवास पुष्पाचा ॥ पाहिला० ॥३॥ असे सगुणरूप पाहतांचि प्रेमभरी ॥ अनुभवें जाणती निज हृदयांतरी ॥ कितियेक विषयसुख मागती संसारीं ॥ पुरवितो जसी ज्या भक्ती त्यापरी ॥ नाराणसुत कर जोडोनिया द्वारीं ॥ प्रार्थितो होउद्या कृपाजी मजवरी ॥ मग तुटला फांसा भवभय भ्रांतीचा ॥ पा० ॥ ४ ॥

## पद ॥ ६ ॥

( राग—देस. ताल—त्रिवट. )

भज मना त्रैमूर्ति अवतार ॥ अत्रेय श्रीपादश्रीगुरू पदस्मरणें भवपार ॥ ध्रु० ॥ अनसूयाजठरीं प्रगटुनिया प्रियकर वर कांतार ॥ नगसह्याद्रीं वास करी जो ॥ अमितवेष धरणार ॥ भज० ॥१॥ सिद्धेश्वरस्वरूपि नटला जो ॥ जाणुनी सर्वअसार ॥ भ्रमत मही दिनरजनी सांडुनि ॥ मायामय संसार ॥ भज० ॥ २ ॥ वेदश्रुति वदती कीं नेति ॥ नेति नलगे पार ॥ गुण निर्गुण सगुणाचे गाउं ॥ आन नको व्यापार ॥ भज० ॥ ३ ॥ परब्रह्म अविनाश दिगंबर ॥ स्वरूप अजित अनिवार ॥ वंदी गुरुपदरजकण शीर्षें ॥ वामन वारंवार ॥ भज० ॥ ४ ॥

## पद ॥ ७ ॥

( राग—पिलु. ताल—दादरा. )

श्रीगुरुचें चरणकंज हृदईं स्मरावें ॥ ध्रु० ॥ नरतनु दृढ नावेसि येउनि अति मूढपणें ॥ नष्ट दुष्ट कुकर सुकर फुकट कां फिरावें ॥ श्रीगुरु० ॥ ॥ १ ॥ निगमनिखिल साधारण सुलभाहुनि सुलभ बहु ॥ इतर योगयागविषयपंथ कां फिरावें ॥ श्रीगुरु० ॥ २ ॥ रामदास विनवितसे ॥ अजुनी तरी समज उमज ॥ विषयविष पिउनी अंतीं ॥ व्यर्थ कां मरावें ॥ श्रीगु० ॥ ३ ॥

## पद ॥ ८ ॥

( राग–देस. ताल–त्रिवट. )

माझा श्रीगुरु कैवारी ॥ माझा सद्गुरु कैवारी ॥ देही असोनी दहातीत मज ॥ केलें या संसारीं ॥ ध्रु० ॥ ब्रह्मभाव हा प्रगट जाहला ॥ येती आनंदलहरी ॥ दुसरें कांहीं न दिसे डोळां ॥ यकपणामाजारीं माझा० ॥ १ ॥ सर्वाभूतीं वासुदेव हा ॥ दिसतो निज निर्धारी ॥ अंतरबाहिर स्वरूप अवघें ॥ तेज दाटलें भारी ॥ माझा० ॥ २ ॥ यशवंत गुरुकृपाकटाक्षें ॥ मी माझें हें वारी ॥ भीमसेवेरहीत त्याला ॥ कसें घेतलें पदरीं ॥ माझा० ॥ ३ ॥

## पद ॥ ९ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–कवणेतुझिकव. )

औंदुबराच्या तळीं पाहिला पुण्यपुंज जो अत्रीचा ॥ यत्पदकमलीं रत होताची निरास भवभ्रांतीचा ॥ औंदुं० ॥ ध्रु० ॥ जननमरण-विरहीत परंतु पतिव्रताप्रिय पुरवाया ॥ अवनीवरतां दृश्यगोचर होय दर्शनि नरकाया ॥ दंडकुमंडलु करिं घेउनिया पाई पादुका हेममया ॥ काशायांबर अक्षभूषणें निबिड भोंवतीं तरुछाया ॥ भस्मोद्धूलित गात्रें सर्वही मुखांबुजीं जप प्रणवाचा ॥ औदुं० ॥ १ ॥ प्रभातकाळीं सुरनरमुनिगण दर्शनार्थ द्वारीं टपती ॥ मोठे मोठे यती बैसती हृत्कमळीं चिंतिति जी मूर्ती ॥ अबळा येउनी बाळ मागती माळ धरुनी सेवा करिती ॥ अंध पांगळे बधिर पाणिहि न हर्षे नाचत यश गाती ॥ शमीपत्र किति बिल्व तुळसीदळ हार अर्पिती सुमनाचा ॥ औदुंब० ॥ २ ॥ रामकृष्णपरी असुर मारुनी अमरद्विजासी बहु सुखवी ॥ चर्मयुगीं चर्माश्रम घेउनी समंदादि खळ ग्रह खपवी ॥ अज्ञानी जन पाहुनिया चरित रचुनि निजहित शिकवी ॥ वारूनी इह सुख देउनी शेवटीं मोक्षपदीं बसवी ॥ गंगाधरसुत म्हणुनि राहिला आश्रय करुनी चरणाचा ॥ अवदुं-

पद ॥ १० ॥

(राग—देस. ताल—त्रिवट)

देखिला श्रीगुरु औदुंबरी ॥ देखिला नरहरी औदुंबरी ॥ ध्रु ॥
दंड कमंडलु हातीं शोभे ॥ कक्षे झोळी बरी ॥ देखिला० ॥१॥
कौशेयांबर पाई पादुका ॥ सोहं स्मरणी खरी ॥ देखिला० ॥२॥
येति दर्शना भाविक भक्त ॥ धरणा ब्रिद धरी ॥ देखिला० ॥३॥
दास चातका घनामृतानें ॥ त्रिविध ताप हारी ॥ देखिला० ॥४॥

पद ॥ १० ॥

(ताळ धुमाळी अज दिवस भासे मज—या चालिवर. बा किर्तघा०)

कलयुगीं दया नच अन्यदेवतांला ॥ श्रीदत्त रक्षितो दीन अनाथाला ॥ध्रु०॥ कलिदोषें पातक जन करिती भारी ॥ सत्कर्म घडेना तिळही संसारी ॥ वर्णाश्रमधर्म बुडाला अविचारी ॥ आवडती सर्वां गृह सुत धन नारी ॥ हे पाहुनि देव गुप्त जाहाले ॥ तैं सज्जनजन हे फारचि गडबडले ॥ तें संकट जगदीशासि पुन्हा पडले ॥ मग यतिवेशें त्रैमूर्ती अवतरला ॥ श्रीदत्त० ॥ १ ॥ श्रीकारंजपुरीं द्विजउदरीं जन्मुनिया ॥ काशींत चतुर्थाश्रम तो घेउनिया ॥ करिं दंड कमंडलु धरुनी यतिकाया ॥ शोभती खडावा रत्नजडित पायां ॥ चाल० ॥ सर्वांगीं चर्चुनि भस्म असे बसला ॥ अति दिव्य सुकाषायांबर पांघुरला ॥ रुद्राक्ष-भूषणें तनुवरि बहु ल्याला ॥ मग तीर्थें हिंडत भिलवडीस आला ॥ श्रीदत्त० ॥ २ ॥ भुवनश्वेर कृष्णातटीं पश्चिम ठाया ॥ अतिरम्य पाहुनी अवदुंबर छाया ॥ राहिला प्रभू निजभक्तां उद्धराया ॥ जा मनुजा वेगीं तच्चरण धराया ॥चाल०॥ अभिमान टाकुनी सर्वही देहाचा ॥ गुरुमूर्ति पुजोनी गुरुचरित्र वांचा ॥ गुरुसन्निध अनुदिनीं प्रेमभरें नाचा ॥ मग गुरुवर निरसिल सर्वहि दुःखाला ॥ श्रीदत्त रक्षितो दीन अनाथाला ॥ ३ ॥

## पद ॥ ११ ॥

(राग—खमाज. ताल—त्रिवट.)

दंड कमडलुं भस्मांगचर्चित ॥ तो .अत्रिनदंन गोरे ॥ ध्रु०॥ व्याघ्रांबरधर तनू दिगंबर॥मस्तकी धरिला जटाभार ॥ रक्त गौर शाम सुंदर ॥ शोभतो पहोर ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु रुद्र मिळोनी ॥ अतिनवेषें अत्रीसदनीं ॥ अनुसुयासती छळिती जननी ॥ चोजे दंभ हारे ॥ दंडक० ॥ २ ॥ ह्मणती माते भोजन पानी ॥ तृप्त करी नग्न होउनी ॥ ऋषिपत्नी त्या लावि स्तनी ॥ करुनी बालकारे दंड० ॥ ३ ॥ पाहुनि पतिव्रता सत्य ॥ धरिति आवतार दत्त ॥ गणपति त्याच्या चरणीं चित्त॥ ठेउनि गातसेरे॥दंड कमडंलु॥४॥

## पद ॥ १३ ॥

(राग—कालंगडा.ताल—त्रिवट.चाल—येते थांब आल्ये मी जलदी.)

तुजला मी शरण श्रीपादराज॥ बुडतो भवसिंधु माजि तारि तारि राख लाज ॥ तुजला ॥ ध्रु० ॥ भोगियेले सुख दुःख पाप पुण्यें करोनियां॥नाना योनी फिरोनिया नरदेहीं आलों आज॥ तुज०॥ ॥ १ ॥ दीपपतंगाचेपरी संसाराची प्रिति भारी॥ तव भक्ति सोडोनिया विषयाची करि काज ॥ तुज० ॥ २ ॥ तापत्रय वडवाग्निनें ॥ पोळलों मी नरहारी॥कृष्णदास दीनावरी ॥ कृपा करी महाराज ॥ तुजला ॥ ३ ॥

## पद ॥ १४ ॥

(राम—खमाज ताळ तिवट.)

धांव पाव दीनबंधु श्रीदत्त देवा ॥ ध्रु०॥ कमडलुं माल करीं॥डमरु त्रिशूळासि धरी ॥ शंख चक्र भवहरी ॥ द्यावि पायसेवा ॥धांव०॥ ॥ १ ॥ त्रैमूर्ति विराजितां॥रासिकभाव भक्तहितां ॥ अहंमग जावी धारीता वारीता जन्म भेवा ॥ धाव पा० ॥ २ ॥ कलयुगीं भक्त

प्रिति॥होउनी श्रीपाद॥रक्षी नरसिंह सरस्वती॥अर्पि प्रेम मेवा ॥ ३॥ भुसुर कांती दिव्यराज॥विभूती अंगीं भव्यसाज॥ भक्तजना पुर्णकाज॥तुचिगुप्तठेवा ॥ धांव०॥ ४ ॥

पद ॥ १५ ॥

( राग—परज. ताल—धमाळी. चाल—मुळींच तें नाहीं तें नाहीं )

त्रैलोक्याचा राजा ॥ नरहरि तो माझा तो माझा ॥ ध्रु० ॥ नांदे अमरापुर ग्रामीं ॥ कृष्णातीरीं यतिवर स्वामी ॥ नरह०॥ १ ॥ नृसिंहसरस्वती करुणामूर्ती ॥ त्रिभुवन गाती ज्याची किर्ती॥ २॥ श्रीधर विभू निज कैवारी॥भावें भजतां भवभय वारी॥नरहारी०॥३॥

पद ॥ १६ ॥

( राग—पिलुजोगिया—ताल—धुमाळी—चाल—सगुणचरित्रेपर )

श्रीपाद श्रीवल्लभ नमिजे भावें नरहरी॥ औदुंबर तरुनिकट वसतसे स्वभक्तकैवारी॥अर्चन करुनी नमिति पदातें गाति परोपरी॥ सन्निध येउनि अनुदिनि विलसति वरी मुक्ती चारी ॥ श्रीपाद० ॥ ॥ ध्रु ॥ श्रीपदकमलीं दंडकमंडलु ब्रह्मविराजित श्री ॥ श्रीगणनाथ उमाधव माधव अर्पिति अवघे श्री ॥ श्रीकृष्णातटीं निकट निवासिनि अंकीं ज्याचे श्री ॥ श्रीगुरुपद प्रसादां फळ मग देईल सुरपतीची श्री ॥ श्रीपाद ॥ १ ॥ पदयुगतीर्थी सेवनमात्रें होती निःपाप ॥ पद्मजजनकें गुरुचें नामस्मरणें अनुतापा ॥ पुष्कर आदिकरोनी तीर्थें स्नाना आला पां॥ तापत्रयनिर्मोचन करुनी पावति अनुकंपा ॥श्री०॥ २ ॥ दक्षिणदिग्मंडल परिक्रमूनी आले श्रीपाद ॥ दारा नरवर अर्चिति सुमनें दुर्लभ हे पाद ॥ दीनदयाघन सद्गुरु ह्मणवुनि फांकतसे नाद ॥ दरिद्र दावानलिं गुरु सेउनि झाला आनंद ॥ श्री०॥ ३ ॥ श्रीस्वामींच्या भजनीं टळली जे आपुली अश्री ॥ श्रीकरकंजतलें करवाळुमि जे सौजन्यश्री ॥ श्रीसंगमसम तीर्थ नसे जे श्रीशैल्याची श्री ॥

श्रीगुरुप्रसाद फळ मग देइल धनधान्यादि श्री ॥ श्री० ॥ ४ ॥ वदनसरोजीं स्तुति बहु करितां प्रगटे गुरुदेव ॥ वंदन करिती सुरवर नेहां अर्चिति निजभावें ॥ वाद्यध्वनि बहु तूर्य निनादें उठति अतिराव ॥ वनीं रोग्याच्या ह्या वसतीचाही जाणा ठाव ॥ श्रीपाद श्री० ॥ ५ ॥ लक्ष्मीपतिचा निवास अनुदिनिं भूलोका आला ॥ लंकापतिचा समूळनाश तैंपासुनीं झाला ॥ लिंगस्थापन पूजा करुनी गुरू तेथें आला ॥ लक्ष्मीपतिपदीं लागुनी तो नर नवचे कळिकाळा ॥ श्री०॥ ६ ॥ भावें भजतां नरहरि गुरुवर कायउणें लाभा ॥ भवशौरी अजमुनिविण मिळली जाहाली अति शोभा ॥ भांडारी मग कुबेर घेउनि रत्नाचा गाभा ॥ भूपति समग्र येउनि अर्चा करिति निज लाभा ॥ ७ ॥ सत्पर्णविमनु संत्पर्णाच्या भवबंधा वारी ॥ श्रीपाद श्रीवल्लभ ऐसे वदती नरनारी ॥ गुणमंडितां निजभक्तांचा झाला साहाकारी ॥ राजांगणि मग नाचत हर्षे नेइल परिवारी ॥ श्रीपाद श्रीवल्लभ नमिजे भावे नरहरी ॥ ८ ॥

## पद ॥ १७ ॥

( राग—कल्याण—ताल—दादरा चाल—पवनतनयपरमवि० )

सद्गुरुजी कोठवरी वाट तुझी पाहुं ॥ नरहरिजी कोठवरी वाट तुझी पाहुं ॥ जिवलगा किति तुझा वियोग मी साहु—स० ध्रु० ॥ पतित म्हणोनी काय मला न भेटसी देवा ॥ पतितपावन नामकारे वागविशी हेवा ॥ स० ॥ १ ॥ व्यापक तूं जनीं वनीं नोळखसी मातें ॥ ऐक्यपदीं जिवां शिवां नसे भेदनातें ॥ २ ॥ सैंधवाचा खडा पडे जरी सागरांत ॥ अल्प म्हणुनी त्यामितसे काय जलधी त्यातें ॥ ३ ॥ श्रीनृसिंहसरस्वति जगद्गुरू राया ॥ श्रीधरविभो पाव आतां ने मज तुझ्या पाया ॥ स० ॥ ४ ॥

## पद. ॥ १८ ॥

( राग—सोरट.ताल—एका. चाल—मजवरि दयाकरा रघुराया. )

मजवरि दया करा गुरुराया ॥ ध्रु० ॥ तुजविण आतां कोणी नाहीं त्राता ॥ भ्राता माता पिता सुत जाया ॥ मज० ॥ १ ॥ अशा मी केलि नका करूं वायां ॥ वारंवार पडतों तुमच्या पांया ॥ २ ॥ गरिबअनाथ ह्मणोनि करावी ॥ रामदासावरि बहु माया मज० ॥ ३ ॥

पद ॥ १८ ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—कवण तुह्मि कवणाचे)

श्रीविधिहरिहर मूर्ति सांवळी कृष्णातिरीं राहे ॥ दत्त दिगांबर ह्मणति जयाला औदुंबरछाये ॥ श्री० ॥ ध्रु० ॥ कृष्णातिरिचा अगाध महिमा दुर्लभ देवासी ॥ जिचिये तिरी वास जयाचा अखंड हा कासी ॥ प्रातःकाळी सुरगण मुनिजन येती स्नानासी ॥ क्षुल्लक पापें गणती नाहीं जाती विलयासी ॥ करा तयारी चला जाउया सत्वर लवलाही ॥ दत्त० ॥ १ ॥ ध्यान पाहतां भगवीं वस्त्रें प्रियकर लंगोटी ॥ सर्वांगीं चर्चून बैसले भस्माची उटी ॥ दंडकमंडलु करि घेउनिया उपवस्त्रें छाटी ॥ रुद्राक्षाचे हार प्रफुल्लित शोभति बहु कंठीं ॥ शमीपत्र किती बिल्व तुळसीदल सुमनाची दाटी ॥ प्रेमानंदें भक्त वाहाती आवड बहु मोठी ॥ हास्यमुखानें कृपाकटाक्षें भक्तांकडे पाहे ॥ दत्त० ॥ २ ॥ औदुंबराची पूजा करितां कोटी पापाची ॥ राखरांगोळी होउनि जाय साक्षी अंबेची ॥ अशा वृक्षातळीं बैसली स्वारी दत्ताची ॥ तीन त्रिकाळीं पुजा होतसे श्रीगुरुरायाची ॥ सायंकाळीं असें वाटतें शोभा स्वर्गाची ॥ मंत्रपुष्प किती घोषगर्जना चर्चा वेदाची ॥ सितारामा पाहुनि प्रेमा आनंद न समाये दत्त० ॥ ३ ॥

पद ॥ २० ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—चरंजीवकल्याण.)

गुरुरायाचा हस्त धरुनिया परभुवना गेलों ॥ देहिंच असतां विदेहस्थितिनें जिताची मी मेलों ॥ ध्रु० ॥ प्रपंच अजिवरी

सत्य भासला रतलों मी तेथें ॥ दारा धन सुत मंदिर माडी संपादुनि अर्थ ॥ अनुतापाचा उदय पावला मग सर्व व्यर्थ ॥ जाणुनि मग मी शीघ्र परतलों धरिला गुणपंथ (चाल) सद्गुरु कृपें वरदान मला फळलें ॥ निजगुज माजें मजला आकळलें ॥ अज्ञान सकळ हें पुर्वीचें जळलें ॥ आनंदामृत प्राशन करुनी आत्मांतरी धालों॥देहिअस० ॥ १ ॥ गुरुमार्गाचा विचार कथितां तरले या योगें ॥ जाग्रति स्वप्न सुषुप्ति तेही उलंघोनी योगी॥ तुझ्या नामें त्रिपुरसुंदरी तिच्या संयोगें ॥ साक्षी होउनि कौतुक डोळा विलोकिलें त्यागे ॥ (चाल) त्यापक्ष सुंदरा नारी तयावरती ॥ उन्मनीनाम विख्यात पाहुं युवति ॥ त्या ठाया गेल्यां येईना पुढति ॥ जेथें योगी रमती तेथें तन्मय मी झालों॥ देहिच० ॥ २ ॥ पहातो देतो घेतो येतो गातो निजलीला ॥ पंचही असतां आत्मा तयाचा आश्रय म्यां केला ॥ परंतु ज्याच्या सत्तेवांचुनि नचले जड गोळा ॥ बोलता मौन्य भजेना कैसा ऐकुनिया धाला ॥ चाल ॥ ऐके अनुभव हा ऐसा ॥ तक्षकावरी फटिंग मी जैसा॥जाणुन नेणें मी मैसा॥मी माझे हें वर्म जाणुनी तत्स्वरुपीं रतलों ॥दे०॥ ३ ॥ लिंगस्थिति जरि खरि ह्मणो तरि उपाय मज नाहीं ॥ अरण्य गर्भस्थिती तीज ह्मणती उपाधीक तेही ॥ जैसा मी परीपूर्ण समाधान न भेदत्रय नाही ॥ घटमठ महदाकाश व्यापुनि अभेदता पाही (चाल) गुरुकृपा मी केवळ आत्माराम ॥ अहा वाक्यापती हो उलंगुनि उन्मनी निष्कल निजसुखधाम ॥ चरमअवस्थेमाजीं हेचि ग्राम ॥ मी माझें हें वर्म जाणुनी प्रेमसुखीं धालों ॥ देहिचअ० ॥ ४ ॥

पद ॥ २० ॥

(राग ताल धुमाळी—कवण तुझि या चालीवर)

दत्तात्रय महाराज बैसले औदुंबर तळवटी । हाती कमंडलु दंड

कडासन बैसले कृष्णातटीं ॥ ध्रु० ॥ साधुची महिमा नेणवे ब्रह्मादिका ॥ किती संन्यासी येउनी वंदिती स्वामीच्या पादुका ॥ दत्ता० ॥ १ ॥ अनसुयेचे उदरीं जन्मले दत्त दिगांबर देखा ॥ त्रैमूर्ति अवतार दत्त हा आहे जना ठाउका ॥ दत्ता० ॥ २ ॥ भोळ्या भाविकासी वळला हरि भक्तजनाचा सखा ॥ भक्ती करितां मुक्ती देतो वैकुंठीच्या सुखा ॥ दत्ता० ॥ ३ ॥

पद ॥ २२ ॥

( राग कालंगडा—ताल—त्रिवट साधीचाल सगुण माया आलि )

गुरु करायाचा नव्हता मनीं ॥ घर घेतलें गुरुबहिणी ॥ ध्रु० ॥ गुरु मंत्र पडतां कांनीं ॥ माझ्या पेंवांत शिरलें पाणी ॥ १ ॥ माझ्या चुकल्या दुमत्या झैसी ॥ गुरु मंत्र फळ आह्मासी ॥ गुरु० ॥ २ ॥ गुरु मंत्र नव्हे हा खरा ॥ माझा बैल चुकला ह्मोरा ॥ ३ ॥ गुरुजी बुडबुड आपुलि घ्यावी ॥ माझी चवली फेकुनी द्यावी ॥ गुरु० ॥ ४ ॥

पद ॥ २३ ॥

( राग—यमन कल्याण. ताल—त्रिवट. चाल—लंगर तोरे कछु. )

कर जोडुनि शरण तुह्मां मी ॥ रामदास स्वामी सद्गुरु ॥ क० ॥ ॥ ध्रु० ॥ अनंत जन्मार्जीत सुकृतें ॥ उदय पावलीं ह्मणुनि निश्चितें ॥ प्राप्त होसी क्षीरसागरु ॥ १ ॥ मत्काया ही पातकी अतिशय ॥ ह्मणुनि पीडिती प्रपंचि स्वजनिय ॥ तुजविण नसे आधारु ॥ क० ॥ २ ॥ गंगा लोळोनी तव पदकमळीं ॥ प्रार्थुनि मागे निसिदिनि जवळी ॥ राहुनी करि उद्धारु ॥ ३ ॥

पद ॥ २४ ॥

( राग—देस. ताल—त्रिवट. )

गुरु पदीं प्रित लागु दे ॥ भव तरुणोपाया ॥ ध्रु० ॥ उंच नीच योनींत ॥ फिरलासी नगणीत ॥ आतां तरि विवेकू जागु दे ॥ भव १ ॥ स्वयं अहं भ्रम पूर्ण ॥ मायामोहीं जीवसिवपण ॥ तत्वमसी लक्ष

सांगो दे ॥ भ० ॥ २ ॥ अक्षगणमयचित्तं ॥ शरीर मी माझें ह्मणत॥अविद्या निर्सुनी भांगो दे ॥ भव ॥ ३ ॥ देहभाव हारपला ॥ दास आत्माराम झाला॥ह्याची अनुभव वागु दे भ०॥४॥

## पद ॥ २५ ॥

( राग–जिल्हा. ताल–एका. चाल–गुंग मला केलें. )

नवल वर्तलें नवल वर्तलें॥नवल गुरुचे पाईं॥कापुर जळुनी गेला तेथें ॥ काजळी उरली नाहीं॥ध्रु० ॥ साकर पेरुनि उस काढिला॥कान झाला डोळा ॥ निबर बायको अतार ताना॥सासरा तो भोळा॥१॥ नवल वर्तलें नवल वर्तलें॥नवल चौजवेना॥डोहा मार्जी मासोळीनें वाचविलें जिवना ॥ नवल ॥ २ ॥ नवल वर्तलें नवल वर्तलें॥ अनाम चक्रपाणी॥गोकुळ नेलें चोरुनी तेथें॥कैसी व्यास जनी॥३॥

## पद ॥ २६ ॥

[ राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल—शुभार्मे तुला० ]

न ह्मणतां दूर मानवा तूं शिघ्र जाउनी पाहे गाणगपूर ॥ ध्रु० ॥ जथ नरसिंव्ह सरस्वती यति॥भक्त रक्षणातूर राहती ॥ न ह्मण० ॥१॥बहु पूजक सेवक सह शोभे॥श्रीगुरु जैसा शूर रथ स्थित॥ न ह्मण० ॥ २ ॥ प्रातःकाळीं संगमीं जाउनि॥ कर्म सुरनगांकुर शशि जणु॥३॥येऊनि मठी माध्यानीं भिक्षा ॥ करि सद्गुरु घृतपूर सदन्नें ॥न ह्म० ॥४॥ भक्ता सुखद समंदातें जो दंडानें करि चूर नरहरि ॥ न ह्मणता ॥ ५ ॥ दासत्रितापा दग्ध कराया ॥ होत असे बहु क्रूर ॥ अग्निपरि ॥ न ह्मणतां ॥६॥ दासा दावी स्वरूप शमवोनी ॥ षड्रिपुची घुरघुर ॥ सुबोधें ॥ ७ ॥ भीमसुतसुता मृत्यु निवारुनि ॥ जेणें केलें शूर गायनी ॥ न ह्मणतां ॥ ८ ॥

## पद ॥ २७ ॥

राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल–क्षणभंगुर० )

गेलि गुरुसी लागुनी लगन ॥ अहो लगन॥ काय करूं मज कांहीं

सुचेना॥अर्पुन गेली गगन॥ध्रु०॥जागृति स्वम सुषुप्ती तुर्या॥पाहुनी झाली मगन ॥ १ ॥ आंतरबाहेर चराचरव्यापक ॥ भरला दीस हो सगन ॥ गेली० ॥ २ ॥ चिंतामणि शिवदृष्टी पाहतां ॥ अर्पुन गेली गगन ॥ ३ ॥

॥ पद २८ ॥

( राग–कल्याण. ताल–दादरा चाल–चाल निरंजनासु. )

सद्गुरुसी हटका ॥ तुह्मी करा अपुली सुटका ॥ दृश्य भास नास पावे स्थीर नोहे घटका ॥ स० ॥ ध्रु० ॥ लिंगदेहि यमदुतां सांपडला आटका॥ आत्मज्ञान उमजुनिया अधिच तुह्मी सुटका॥स० ॥ १ ॥ करितो लिळा टिळेमाळा प्राणी बहु नेटका॥केव्हां नेणों काळ मारील पाठीवरी मुटका॥स० ॥२॥ भजनावांचुनी कधीं वेळ नका घालवुं लटका॥मनीं राम मुखीं नाम करी मार चुटका ॥३॥ सोहिरा ह्मणे चुकवाहो काळवेग फटका॥परात्पर रघुवीर तयासी झटका ॥ सद्गुरुसी हाटका ॥ ४ ॥

॥ पद २९ ॥

( राग–पिलु. ताल–दादरा चाल–दिंडीची. )

काय सांगु त्या समर्थाची थोरी॥ भजकासी आपणा ऐसा करी॥ ध्रु० ॥ सद्गुरुराया तन्मय छत्रपती ॥ मजसि करोनि सेवे अधिपती ॥ सोहंशब्द सनद देउनि हातीं ॥ शिरीं हात ठेविला मुद्रांकित ॥ काय ॥ १॥ अहंकाराचे ते दुर्ग आवरिलें॥ तयावरी मजला पाठविलें ॥ पूर्वद्वारीं त्रिकुट देखियेलें ॥ राजदृष्टी ब्रह्मयासी जिंकियेलें ॥ काय० ॥ २॥ उर्ध्वपंथें पश्चिममार्ग पाहे॥ सत्वगुणी श्रीहरी विष्णु आहे ॥ तया वळगुनी त्यावरता जाय ॥ तमा गोल्हाटी रुद्र दिसताहे॥का०॥ ३ ॥ ज्ञानशस्त्रें हीं घेउनियां हातीं ॥ केली तमोगुण अज्ञानाची शांति ॥ पुण्यगिरि तेथून दिसे पुढती ॥ शुद्ध अधिष्ठानीं विश्वमुर्ती ॥ ४ ॥ उमा राहोनि तया

गिरिवरी ॥ देखे भ्रमरगुंफा गडावरी ॥ आठपिठावर शोभा असे बरी ॥ परमानंद नांदतो तया घरीं ॥ ५ ॥ भोग बळें मीं प्रवेशलों तेथें ॥ अहंकार गेला हातोहातें ॥ विजयदुंदूभि वाजती अनुहातें ॥ ज्ञानदृष्टींत पावलों विश्रांतीतें ॥ ६ ॥ भक्तीनिशाण चढविलेंवरी ॥ जे कां ब्रह्मची भासे चराचरीं ॥ रामनाम गर्जति जय जयकारी ॥ दास ह्मणे तेथें न डरे उरी ॥ ७ ॥

## पद ॥ ३० ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—वारीं संकट हरी )

यतिवेशा मुनि सर्वेश्वर्या सर्वसुरस्मर्या ॥ श्रीनृसिंव्हसरस्वती दर्शक अंबा माधवनंदनवर्या ॥ ध्रु० ॥ सचित्सुख निर्गुणनिर्वीकारा अव्यक्तीधारा ॥ माया परंतु लोकोद्धार धरुनि नराकारा ॥ होउनि कृष्णसरस्वतीशिष्य ॥ प्रगटविसि व्हदयवित्सूर्या ॥ यतिवे० ॥ १ ॥ भिमामरजायांच्यासंगमतीरीं ॥ गाणगाख्यनगरी ॥ राहुनि दीनाची दुःखें सारीं ॥ दवडिसि पापारी ॥ अश्वत्थनिकट मठ करुनी वससी ॥ ब्रह्मराक्षसोत्धारकवीर्या ॥ २ ॥ तूझी करणी बहु लोक विचक्षण ॥ करि काळा शिक्षण ॥ गोपीनाथात्मज दंत विचक्षण ॥ काळें त्या भक्षण ॥ करितां शरण सति येता तूं जिवंत कारिसि त्या परमोदार्या ॥ ३ ॥ कुष्टी नंदीनामक तो ब्राह्मण गिरिजेला शरण ॥ जातां तिणें कथिलें हेचि चरण दवडिति रोग मरण ॥ मग तो तुजपासी येतां तूं ॥ कुष्ट हरुनि दाविलें आश्चर्या ॥ यति० ४ ॥ वर्षे साठ वया जी अति वृद्धा ॥ बहु साध्वी शुद्धा ॥ वंध्या गंगा सोमनाथ श्रद्धा ॥ करिनति करबंदा ॥ याजन्मी कन्यासुत देउनि तोषविलि बहु ब्राह्मणभार्या ॥ ५ ॥ स्नानासंगमासि जातां येतां शूद्रें नति करितां ॥ आज्ञा पिक कापी ऐसी ॥ होतां विश्वासुनी ताता ॥ तैसें करितां त्याचा शेतीं बहुत पिकाविलें धान्यगुरुवर्या ॥ ६ ॥ माझी या. संसारांतुनि सुटका करि अघटित घटका ॥ मारी या कामा-

दिक रिपुकटका॥भ्रम दवडी लटका ॥ मीमानंदनात्मज मन लावी स्वद्रूपि देउनिया धैर्या ॥ यतिवे०॥ ७ ॥

पद ॥ ३१ ॥

(राग–देस. ताल–त्रिवट.)

ती नृसिंव्हवाडी पहा गुरुघाट शोभतो दाट साधु घन घाट गर्जति भाट जा स्थळीं ॥धृ०॥ नीर नदीचें स्थीर वाहाते॥भीर रुचिरंग भीर शोभतें ॥ शिर स्यजली नारिन नरशते ॥ फिरति वरुनि तिर खग थळीं फिर खग बळी॥ती०॥१॥ माळ घालीं गळीं टाळ वाजवी चाळ बांधि गोपाळ आळावि॥ वाळ भव नदी काळ रुभवी जाळ वासना काळ आकळी ॥ २ ॥ छाग मारुनि याग कशाला नाग हय स्त्री बाग सुशाला॥ त्याग जा विषयराग यशाला लाग गुरु पदीं वाग कवि कुळी ॥ ती० ॥ ३ ॥

पद ॥ ३२ ॥

(राग–झिंजोटी. ताल–धुमाळी.)

श्री दत्तात्रय सुरत्तर वंदिती अनसूयात्हत्कमलारे ॥ ध्रु० ॥ ब्रह्मा विष्णु शंकर एका ॥ ठाई होउनि गोळारे ॥ श्री० ॥ १ ॥ तीन मुखें बहु शोभति दत्ता ॥ षड्बाहू असती तुजलारे ॥ शंख चक्र करीं त्रिशुळ विराजे ॥ डमरु कमंडलु मालारे ॥ २ ॥ कनक पादुका लेउनि पाई ॥ पीतांबर तो पिंवळारे ॥ तीन रंग शोभति येकांगीं ॥ केशर चर्चित भाळारे ॥ ३ ॥ स्फटिका समान कांति दिसे तो ॥ जाणा शंकर भोळारे ॥गौरवर्ण शोभे चतुरानन ॥ मध्यें विष्णु शोभे काळारे ॥४॥ अत्रि नंदना हे दयाघना ॥ वारी या भव जाळारे॥नारायण सुत ठेवि अक्षय॥चरणि तुझ्या भाळा॥५

पाळणा ॥ ३३ ॥

(राग–देस. ताल–त्रिवट.)

दत्त गुरु राया जोजोरे ॥ ध्रु० ॥ रजोगुणि जग करुनि भाग-

लासी ॥ सत्वगुणि पालनें तूं जागलासी ॥ तमोगुणि त्यांचा नाशा लागलासी ॥ विषभूषण केलें त्वां गळ्यासी ॥ भक्तासाठीं आला या देउळासी॥दत्त०॥१॥तुझी आला मम गेहासी ॥ पावन केलें मदेहासी॥सत्य वैकुंठ कैलास वासी ॥ लक्ष्मी सावित्रि पार्वती जासी ॥ भार्या वर्णु काय भाग्यासी ॥ दत्त० ॥ २ ॥ स्त्री बुद्धीसी लाभुनि आला ॥ ह्मणवुनी माझे बाळक झाला ॥ बाळ होउनिया दुग्धही प्याला ॥ चारि वेदही वर्णिति ज्याला ॥ आतां काय बोलुं या बोलाला ॥ द० ॥ ३ ॥ सद्गुरुरूपं धृत्वा तत्व बोधिसि मानसी महातत्वं ॥ वत्कृपया सच्चिद्ब्रह्मत्वं ॥ सर्वस्य जनस्यान्यत्वं ॥ स्यात्कथं लक्ष्मणेन्यत्वं ॥ ४ ॥

## पद ॥ ३४ ॥

( राग–पिलु.ताल–ताल. धुमाळी. चाल–दिंडीची. )

त्यासि उतराई काय होउ बाई॥जन्ममरण विरहित केलें पाही॥ध्रु० कामक्रोधादि मदमछर॥छळीत होते मज बहुत निरंतर॥त्याची बहु बंदी मोडियेली भार॥कल्पनातें विसरली काम्य घोर ॥ १॥ हारपलें तें सांगितलें गुज ॥ ज्ञानदृष्टी देखिलें दिव्यतेज ॥ जनिंवनिं पाहिलें महाराज॥चैतन्य ते कोंदलें सहजी सहज ॥ २ ॥ महाराज सद्गुरुरायें॥निजानंदि मज दाखविली सोय॥नाथ सायुज्य पदीं नांदताहे॥शेकसुलतान वंदी त्याचे पाय ॥ ३ ॥

## पद ॥ ३९ ॥

( राग–जिल्हा–ताल –दादरा–चाल नको नको खिसंग नाम. ]

दत्त दत्त दत्त हाचि जप करी मना ॥ करुनि दिव्य षड्भुजा स्वरुप चिंतना ॥ ध्रु० ॥ दत्त हाचि मुख्य देव सकळ त्रिभुवना ॥ दत्त हेंचि विश्वरूप धरुनि भावना ॥ १ ॥ देह गेह इष्टमित्र पुत्र बंधुजना ॥ नाशिवंत मानुनि तूं नकरि कामना ॥ २

दत्त नाम जपुनि करिसि जरि उपासना ॥ मुक्त होसि जिंकुनि तू अनादि वासना ॥ ३ ॥ सतत जपुनि दत्त मंत्र ॥ हाचिरें मना ॥ बाळ कविसे भेटवी त्रैलोक्य पावना ॥ ४ ॥

पद ॥ ३६ ॥*

[ राग—कल्याण. ताल—एका. ]

जय जय दत्तराज योगी ॥ जय जय महाराज योगी ॥ ध्रु० ॥ शेली शृंगी कंथा झोली बभुत लगया तनमो ॥ कोटी चंद्रका तेज झुलतहै चलो आपनें गतमों ॥ जय जय० ॥ १ ॥ शंखचक्र और त्रिशुल बिराजे गले बडी बनमाला ॥ जोगदंड अवधूत दिगांबर बनारस रहनेवाला ॥ जय जय० ॥ २ ॥ कृपा करो हम दीन-रंक है लेजाव अपने माया ॥ महादेवसुत ध्यान धरत जब तब दर्शन पाया ॥ जयजय० ॥ ३ ॥

पद ॥ ३७ ॥

( राग—कानंगडा. ताल—त्रिवट. )

दत्तात्रया श्रीपाद नरहरी ॥ तारारे ॥ भक्तकाज कैवारी सर्वार्थं दाई दिनाची आई त्वरें कृपा करी धांव पांव झडकरीं ॥ भस्म अंगीं त्रिशुलधारी ॥ दत्ता० ॥ ध्रु० ॥ गजेंद्रासि नक्रें धरियेलें सरोवरीं ॥ स्मरतां घेउनि चक्र अलासि करीं ॥ उद्धार करूनि नेलें वैकुंठासी तेणें परि ॥ धांवे पावे झडकरी ॥भस्मां० ॥ दत्ता० ॥ १ ॥ प्रल्हादासि पिता गांजितसे परोपरी ॥ प्रगट होउनि स्तंभीं दैत्यातें मारी ॥ आठवुनि ब्रिद ऐसें भक्ताभिमान धरी ॥ तेणें परि धांवे पावे झडकरी ॥ भस्म० ॥ दत्ता० ॥ २ ॥ द्रौपदिचीं वस्त्रें फेडी दुःशासन दुराचारी ॥ राखियली लाज तिची सभेमाझारी ॥ प्रीतीनें सतत कृष्णदासाचें पाळण करी ॥ तेणें परी धांव झडकरी० ॥ भस्म० ॥ दत्ता० ॥ ३ ॥

पद ॥ ३८ ॥ ✓

(राग—कल्याण. ताल—एका )

दत्तात्रय माउलीग ॥ माय माझी दत्तराज माउली० ॥ ध्रु० ॥ त्वत्संकल्पें स्वर्गादि करिती ॥ ब्रह्मांदिक बाहुलीग ॥ माय० ॥ १ ॥ पुत्र होउनि अनसूयेचा ॥ चित्तवृत्ति तोषविलीग ॥माय० ॥ २ ॥ त्वां भारतिसी सर्वांहि सेना ॥ यतिरूपें दाविली ग ॥ माय० ॥ ३ ॥ भीमात्मजतनयावरि करि तूं ॥ कृपापांगसाउली ग ॥ माय० ॥ ४ ॥

## पद ॥ ३९ ॥

[ राग–कालंगडा. ताल–धुमाळी.अष्टमूर्ति परमेश० या चा० ]

ध्यास हृदयीं नरहरी निरंतर ॥ भेटूं कृपाकर मजवरारे ॥ ध्रु०॥ पाहुनि तव मुख सेविन मी सुख ॥ होयिं देवा संमुख झडकरारे ॥ ध्या० ॥ १ ॥ त्रिविधताप मज जाचविती निज ॥ दावि पदपंकज नरहरारे ॥ ध्या० ॥ २ ॥ धन सुत जाया जाइल काया ॥ दुस्तर माया आवरारे ॥ ध्या० ॥ ३ ॥ जगन्नाथ द्विज बाळ विनवि तुज ॥ कृष्ण पाप बीज परिहरारे ॥ ध्या० ॥ ४ ॥

## पद ॥ ४० ॥

(राग–जोगी.ताल–धुमाळी मजलावरिल सु०याचालीवर.)

श्रीगुरु दत्त देखिला काय ॥ कोणी तरी सांगाहो ॥ ध्रु० ॥ छाटी आहे ज्याची लाल ॥ कंठीं रुद्राक्षाची माळ ॥ ज्याला कांपे थर थर काळ ॥ माया जाळ छेदक जो ॥ श्री० ॥ १॥ काशीमध्यें करितो स्नान ॥ पांचाळेश्वरीं अनुष्ठान ॥ करविरक्षेत्रीं भिक्षा जाण ॥ शय्यास्थान माहूरी ॥ श्रीगु० ॥ २ ॥

## पद ॥ ४१ ॥

[रागकालंगडा. ताल–धुमाळ चरंजीव कल्याणरहोहरिक०या चालीवर.]

दत्तदिगांबर मूर्ति निशीदिनी ॥ स्मरशिल जरि तूं मनुजारे ॥ध्रु० ॥ विश्वांव्यापक त्रैमूर्त्यात्मक ॥ षड्गुण तरु गुरु पायींरे ॥ दंडकंडलु करिं घेउनिया ॥ औदुंबरतरू छांईरे ॥ दत्त० ॥ १ ॥

णगभुवनीं वास करुनियां ॥ भक्त रक्षिसी आपुलेरे ॥ बाळ- गोविंद प्रार्थि निरंतर ॥ जन्ममरण हें चुकवीरे ॥ दत्त० ॥ २ ॥

पद ॥ ४२ ॥

(राग–कालंगडा. ताल एका. चाल वरच्या पदाची)

त्तदयाकर मी अपराधी ॥ तारक तूं मायबापारे ॥ ध्रु० ॥ या- संसारी श्रमलों भारी ॥ संकट वारी मायबारे ॥ दत्त० ॥ १ ॥ पूर्णावतार हा त्रैमूर्तीचा ॥ वेश धरिशि मायबापारे ॥ दत्त० ॥२॥नृसिंह विठ्ठला दर्शन द्यावें॥करिं मज पावन मायबापारे॥३॥

पद ॥ ४३ ॥

( राग–कालंगडा. ताल चाल–वरच्या पदाप्रमाणें. )

विश्वेश्वर गुरु पतितोद्धारा॥ तूं भक्तांची माउली॥ भव तापें संतप्त झालों ॥ सुखकर करि सावुली ॥ ध्रु० ॥ कामादिक रिपु छळितां माझी॥ चित्तवृत्ति कां व्हांवली ॥ तेणें होउनि व्याकुळ दत्ता॥ तुज पाशी धावली ॥ विश्वेश्वर० ॥ १ ॥ बुडतां भवसागरीं तुझीरे॥भक्ति नांव लाधली ॥ नेउनि सोडि पैलतिरातें॥ठेवीं सतत पाउलीं ॥ विश्वेश्वर० ॥२॥ संसाराची आशा दत्ता॥दृढतर मनीं ठसली ॥ यास्तव तनु मी धनप्राणादिक॥तंव चरणीं वाहिली॥३॥

पद ॥ ४४ ॥

( राग–पिलु. ताल–दादरा. )

दत्त गुरू दत्त गुरू दत्तात्रय गुरुहो ॥ ध्रु० ॥ आदिनाथ दिनानाथ ब्रह्मरूप दत्तरूप ॥ दत्त गुरू० ॥ १ ॥ शंखचक्रगदाधरा ॥ ब्रह्मरूप ॥ दत्त० ॥ २ ॥ उमापते रमापते ॥ ब्रह्मरूप ॥ दत्त० ॥ ३ ॥ पूर्णब्रह्म सनातन । ब्रह्मरूप ॥ दत्त० ॥ ४ ॥ अनसूया वरदपुत्र ॥ ब्रह्मरूप ॥ दत्त० ॥ ५ ॥ भक्तकाज कल्पद्रुम ॥ ब्रह्मरूप० ॥ दत्त० ॥ ६ ॥ सच्चित अति सुखसागर ॥ ब्रह्मरूप ॥ दत्त० ॥ ७ ॥ निरंजन निराधार ॥ निर्विकल्प चि-

अकाश ॥ ब्रह्मरूप० ॥ दत्त०॥८॥एकाजनार्दनीं दत्त ॥ सर्वाठायीं सदोदित ॥ दत्त० ॥ ९ ॥

पद ॥ ४५ ॥

( राग—कल्याण. ताल—धुमाळी—चाल क्षणभंगुर संसार. )

नरहरि मजला प्रिय वाटे ॥ मन दाटे निजपद आठवुनी ॥ नर० ॥ ध्रु० ॥ हा मज ध्यास निरंतर देवा ॥ जीवा दे सुख गांठवुनी ॥ न० ॥ १ ॥ दुष्ट पातकी विषय सुखीं मी ॥ बुडलों कर्मे दाटवुनी ॥ न० ॥ २ ॥ कृष्ण जगन्नाथात्मज याला ॥ सुखमय करिं तुज भेटवुनीं ॥ न० ॥ ३ ॥

पद ॥ ४६ ॥

( राग—कालंगडा. ताल—त्रिवट. )

याहुन गारुड काय ॥ दत्तारे याहुन गा० ॥ ध्रु० ॥ गर्भाशयीं अणुरेणूं पासुनीं ॥ निघती कर शिर पाय ॥ दत्तारे० ॥ १ ॥ बाळ आधीं तारुण्य मधें मग ॥ वार्धिक्य येउनि जाय ॥ दत्ता० ॥ २ ॥ दास कौतुकें ओळखुनि हे खुण ॥ दत्त पदातें गाय ॥ दत्तारे० ॥ ३ ॥

पद ॥ ४७ ॥

( राग—कालंगडा, ताल—एका. चाल—अष्टमुर्ति परमेश. )

भव तारक ह्या तुझ्या पादुका वंदिन मी माथा ॥ करावी कृपा गुरुनाथा ॥ ध्रु० ॥ अनीवार हें मन बहु माझें चरणीं स्थीर व्हावें ॥ तव पदीं भजनीं लागावें ॥ कामक्रोधादिक हे षड्रिपू समूळ छेदावे ॥ हेंचि मागणें मला द्यावें ॥ चाल० ॥ अघहरणा करिं करुणा, दत्ता ॥ धांव, पाव, आतां ॥ करावी० ॥ १ ॥ तूंचि ब्रह्मा तूंचि विष्णु तूंचि उमाकांत ॥ तूंची समग्र दैवत ॥ माता पिता इष्टबंधु तूंचि सर्व गोत ॥ तूंचि माझें सकळ तीर्थ ॥ चाल ॥ तुजविण मी गा कांहिंच नेणें ॥ तूंचि कर्ता हर्ता ॥ करावी०॥ २ ॥ तवमन धन हें सर्व अर्पुनी कुरवंडिन काया ॥

पेक्षूं नको गुरुराया ॥ कर्महीन मी मतीहीन मी सकळ श्रम
ायां ॥ लज्जा राखें गुरुसदया ॥ चाल ॥ मातृ बाळका परि
ांभाळी ॥ तूंचि मुक्तिदाता ॥ करावी० ॥ ३ ॥ शेषा ब्रह्मां वेदा
कळे तुझा महिमा थोर ॥ काय वर्णू मी पामर ॥वियोग नसावा
व चरणाचा हाचि देई वर ॥ शिरीं ठेवीं अभय कर ॥ चाल ॥
ीच विनंती दर्शन द्यावें ॥ दास दीनानाथा ॥ करावी० ॥ ४ ॥

## पद ॥ ४८ ॥

[ राग–कालंगडा. ताल–त्रिवट. ]

गायिन प्रेम भरित नरहरि ॥ मुख पाहिन सुख मज तो करी ॥
॥ ध्रु० ॥ इहपरलोकीं जें उपयोगी ॥ साधिन तें झडकरी ॥
गा० ॥ १ ॥ त्याहुनि आणिक कोणि न मजला ॥ निश्चय हा
अंतरीं ॥ गा० ॥ २ ॥ या त्या मार्गे काय फिरोनी ॥ हेचि
सुलभ चाकरी ॥ गा० ॥ ३ ॥ जगन्नाथ सुत कृष्ण तयाचा ॥
प्रेम अधिक ज्यावरी ॥ गा० ॥ ४ ॥

## पद ॥ ४९ ॥

( राग कालंगडा–ताल–धुमाळी–चाल–दत्तात्रय चतु० )

दत्तात्रय करुणाकर गुरुवर ॥ घोर तुझ्याविण न ढळेरे ॥ ध्रु० ॥
कोठुनि आलों कोठें मी जातों ॥ पूर्णपणें मज न कळेरे॥ क्षणिक
सुखाविन्मुख होउनियां ॥ चित्त त्वत्पदीं डमुंदेरे॥दत्तात्रय०॥१॥
षड्रिपुनीही ग्रासिली काया ॥ विषय सुखांतुन न गळेरे ॥ त्या-
तुनि सोडवि भवजलें ध्रुवी ॥ मन्मन किंतें न मिळेरे ॥ दत्तात्र-
य० ॥ २॥ पाप विनाशन सन्निध आहे ॥ पाप अखिल मज न
कळेरे॥भक्तिरसें जरि आर्द्रहृदय हें ॥ तापें काधितें न जळेरे॥३॥

## पद ॥ ५० ॥

[ राग–कालंगडा.ताल–धुमाळी. चाल–कवण. तुह्मी कवणा० )

किती चुकलें नकळे नरसिंहा ॥ मज जेव्हां दुरदुर दिससी ॥

कि० ॥ ध्रु० ॥ व्यापक हेम नगीं जगीं तैसा ॥ व्यापुनि चिद्रूपें अससी ॥ कि० ॥ १ ॥ तळमळ जीवपणाची माझी ॥ न सुटे काय उगा बससी ॥ कि० ॥ जगन्नाथ सुत कृष्ण वदे कीं ॥ निर्दय मनिंचा तूं नससी ॥ कि० ॥ ३ ॥

पद ॥ ५१ ॥

( राग—गौरी—ताल—धुमाळी. चाल—हजातअल्ला. )

जनहो गाहो॥त्रैमूर्ति गुरूला पहाहो ॥ ध्रु०॥ कमलनयन प्रभु सुंदर हरी ॥ मृगमद भाळीं गंध केशरी ॥ मंदहास्य गुरु दुरित निवारी ॥ सुरवर किन्नर अर्चित पहाहो ॥ जनहो० ॥ १ ॥ सजल मेघतनु षड्भुज मूर्ति ॥ वनमाळी जो मुनिजन ध्याती ॥ करुणाघन तो हरिहर मूर्ति ॥ प्रेमभरित अंतरांत पहहो ॥ जन० ॥ २ ॥ पीतवसन परिधान कसोसी ॥ पायिं पादुका अवदुंबर-वासी ॥ शोभा वाढे जसि कैलासीं ॥ तनमन धन हें सर्व आ-पुनियां हो ॥ जन हो० ॥

पद ॥ ५२ ॥

( राग—गौरी. ताल—धुमाळी. चाल—हजरत अल्ला. )

पाहिन निजडोळां श्रीनरहरिला ॥ ध्रु० ॥ प्रल्हादाकारणें स्तंभ गाजविला जेणें ॥ भक्तांसि भेट देणें हेतु हा जया ॥ नित्य नाम उच्चारणें मज सौख्य कोटिगुणें ॥ अंतरिचा श्रम हरिला । पा० ॥ १ ॥ संसारीं गुंतणें काय लाभ घडे ॥ येणें नेणतां मूर्ख पणें नाशिलें वया ॥ अंति यमलोकीं जाणें नको नको ऐसें जिणें ॥ नारसिंह मनि धरिला ॥ पा० ॥ २ ॥ श्रीविष्णुस्मरणें नि-त्यानंदें मग्न होणें॥ भक्तिसुखा काय उणें कृष्णदास या ॥हरिसम आत्मखुणें दावुनिया नारायणें॥ निवटिलें भव करिला पा० ॥ ३ ।-

गुरुपदकमळीं मन भ्रमरा ॥ धरिशिल जरि तूं दृढ थारा ॥ तरि तुज निजसुख मनुचारा ॥ लाभा न मिळे जो भ्रमरा ॥ध्रु०॥ मंजुळतत्व गुण गान करी ॥ निजरुपिं निश्चल प्रेम धरी ॥ नि-

त्य निरंजन गुरु नरहरी ॥ सर्व चराचर भति विवरी ॥ १ ॥ प्रपंच पंचक सुमन जसें ॥ तेथें क्षणभरि तूं न वसें ॥ अद्वय भजनीं भ्रमर जसे ॥ श्रीधर विभु मग नयनिं दिसे ॥ गुरुप० ॥२ ॥

॥ पद ९३ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

ध्यान दिगांबर ज्याचें ॥ पाहूं नयनीं ॥ मदन मनोहर सुंदर ॥ आठवूनि मनीं ॥ ध्रु० ॥ तरुणारुण सचरण प्रभा ॥ करजीत प्रभा ॥ नख पंक्ति शशी विलसे ॥ विराजीत प्रभा ॥ प्रपदें सुंदर घाट ॥ नीळवर्ण शुभा ॥ जंघा लाजविती त्या ॥ कर्दळीस्तंभा ॥ ध्यान० ॥१॥ कटि रीण कटि जीत कटि तट ॥ कौपीन बंध ॥ शांभवी मुद्रा मूद्रीत ॥ जलजापूरु कंद ॥ तुंदिल नाभि सखोलित ॥ विकसीतारविंद ॥ वक्ष विशाल ग्रीवा ॥ जलजाकृतिकंद ॥ ध्यान० ॥ २ ॥ अमलकमलदलनयन विराजीत ॥ चंपक नासा ॥ अधर प्रवाला तमसे ॥ मुदमंदसुहासा ॥ कुंदरदन मीनाकृती ॥ मकरे सुविलासा ॥ मस्तकीं मुकुट जटाजुटी ॥ मित्रा रहिवासा ॥ ध्यान० ॥ ३ ॥ षड्भुज बाहु अजाण ॥ सुचिल भीत सायुज मान ॥ दंडकमंडलु त्रिशुल ॥ डमरु संधान ॥ शंख चक्र करीं मिरवी ॥ विश्वा मी भगवान् ॥ अभिनव जय कश तनुहे ॥ स्तुति दे सन्मान ॥ ध्यान० ॥ ४ ॥ भस्म विलेपित भाळीं ॥ सुशोभित केशरी गंध ॥ रत्नाक्षत वरी मिरवे ॥ अति सुगंध ॥ मुक्ता मिश्रीत रुद्राक्षा ॥ माळाही सुगंध ॥ दत्तात्रय वर श्रीधर ॥ गुरुब्रह्मानंद ॥ ध्यान दिगांबर० ॥ ५ ॥

पद ॥ ९४ ॥

(राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—क्षणभंगुर सं०)

लागला मज नरसिंह ऐसा ध्यास ॥ ध्रु० ॥ दर्शन देउनी पावन केला ॥ हरिला माझा त्रास ॥ ला० ॥१॥ निज भजकाला

जो वरदाता ॥ सुखकर तोचि मनास ॥ ला० ॥ २ ॥ जगन्नाथ-सुत कृष्ण ह्मणें मीं ॥ झालों नरहरिदास ॥ लागला० ॥ ३ ॥

पद ॥ ६१ ॥

[ राग—कल्याण. ताळ—एका. चाल—बहुधीर झरनदी. ]

श्रीक्षेत्रकृष्णातिरीं, वसे नरहरी अवदुंबर शिरीं, अतिघनछाया अतिघनछाया ॥ त्रैमूर्ति धरुनि अवतार जगीं ताराया ॥ ध्रु० ॥ काय सांगु कृष्णेचा थाट, समोंवती घांट, वृक्ष घनदाट, शमींचे भारी-शमींचे भारी ॥ त्या ठायिं राहिली श्रीगुरु यतिची स्वारी ॥ हा दिव्य अमोलिक हिरा, विधी हरिहरा, मनीं निट धरा, भवार्णव तारि-भवार्णव तारी ॥ त्रिभुवनांत ऐसा नसे भक्त कैवारी ॥ त्रैताप, जाळितो पाप, नसे त्या माप, पहा निर्धारि-पहा निर्धारि ॥ निष्काम भक्तिनेठायिं मुक्ति संसारिं ॥ चाल ॥ देउनी राज्य रजकाला या क्षिती ॥ तारिले भक्तजन सारे नसे मिती ॥ संकटीं रक्षितो भक्तां अशि स्थिती ॥ हे चरण, धरुनि दृढ शरण, करिल जो स्मरण, अर्पुनी काया, अर्पुनी काया ॥ त्रैमुर्ति० ॥ १ ॥ भूभार हराया सार, घेउनि अवतार, अत्रिच्या पोटीं, अत्रिच्यापोटीं ॥ महाक्षेत्र वसविली वाडीपतितां साठीं ॥ नित्य नुतन असे दरबार, यात्रेचा भार शोभे महाद्वार, साधुजन दाटी-साधुजन दाटी ॥ भासतें जणुं हा थाट नसे वैकुंठी ॥ किति यति तसेच भूपतो विप्र शोभती वेद घनपाठि वेद घनपाठि ॥ महासिद्ध वृद्ध बैरागि सदोदित भेटी ॥ चाल ॥ ठायि ठायीं हरिगुणलीला वर्णिती ॥ सप्रेमयुक्त आनंदें नाचती ॥ किति चरित्र गुरूचें विप्र वाचिती ॥ हें भुवन सुशोभित सुवन नसे कलि पवन पलस्व एकन्याया-पलस्व एकन्याया ॥ त्रैमूर्ति० ॥ २ ॥ अशि पुनीत जागा नसे, अवदुंबरिं वसे, वाट पहातसे, सदैव गुरुमूर्ति-सदैव गुरुमूर्ति ॥ कधीं येतिल माझे भक्त वाढविति कीर्ति ॥

नारायण स्वामी करून हातीं हात धरून प्रेमरस भरून समाधी वरती-समाधी वरती ॥ देउनि तयासी मान चालवी आर्ती ॥ घेउनि हातामध्यें दंड, उभा अखंड, करितसे दंड, अधर्माचरत्या-अधर्माचरत्या ॥ भवरोग समंधीं तुटे-कामना पुरती॥ चाल ॥ किति पिशाच्च बाधा सारी घालवी, ॥ महा रोग कोड कुष्टादि मालवी ॥ खळ संबंधीं बांधुनि स्तंभीं बोलवी ॥ हा प्रताप अद्भुत जगीं, आली भरमुगी अशा कलियुगीं, सितारामाया ॥ त्रैमूर्ति० ॥ ३॥

॥ पद ९६ ॥

( राग-कल्याण. ताल-त्रिवट. चाल-हा नर जन्म किती. )

सेवीं नारसिंहराज ॥ नको मना तळमळ ॥ से०॥ ध्रु० ॥ विषयि जनांची संगती सांडी॥ किति तुज विनवणीं करितों काहीं तरि धरीं लाज ॥ से० ॥ १ ॥ साधुससमागम लक्षुनि जायीं ॥ दुस्तर हा भवनिधि तरणें साधी हेंचि काज ॥ से० ॥२॥ जगन्नाथ बाळक कृष्ण तयाला॥फिरविसी कां पर सदनीं येयिना किंवाज॥से०॥३॥

॥ पद ९७ ॥

(राग-कालिंगडा. ताल-धुमाळी. चाल-रामनामसेजादा.)

परतत्व नसे दुसरें ॥ गुरुविण शोधुन पाहिं बरें ॥ ध्रु० ॥ नृसिंह सरस्वती हे स्तुति बोलती तत्व खरें ॥ जगीं तत्वमसी ति महावचनीं दृढ बोलुनि भक्त बरें ॥ मदमोहन मत्व जडत्व जठासुनी सर्व गुणे अतिरे ॥ उद्धरिले जन या भवभंजन भ्रांति जशी न उरे ॥ परतत्व० ॥ १ ॥ कलिमाजि नराकृती होउनि हा यतीराजवर्य नरहरी ॥ करी चित्र विचित्र चारित्र जगत्रय वंद्य कपालहरी ॥ भवताप अमोप विलाप न पापही जो स्मरणेंचि हरी ॥ दे नृसिंह सरस्वती द्वय तुमचें न धरी ॥ परतत्व० ॥ २ ॥ स्तुति सार विचार अपार गुणाकर शंकर किंकर देवदया ॥ अधिकार परात्पर ब्रह्म चराचर मीपण ने विलया ॥

मुनि दत्तदिगांबर योग्य धुरंधर जो करि पूर्ण दया ॥ श्रीधरनाथ मजा उमजा तुझि मृत्यु भया विजया विजया ॥ परतत्व० ॥ ३ ॥

पद ॥ ५८ ॥

(राग—गौरी. ताल—धुमाळी. चाल—तोंवरि तळमळरे.)

इतकें दे मजला दे मजला ॥ मागतसें गुरु तुजला ॥ ध्रु ॥ संत समागम अर्चा ॥ सारासार ज्ञानचर्चा ॥ इतु० ॥ १ ॥ संत घरा प्रती येतां ॥ भक्तिभावें शरण तयांप्रती ॥ इतु० ॥ २ ॥ भगवद्भजनीं जागो ॥ तुझिया स्वरुपीं मन हें लागो ॥ इतु०॥३ ऐसोंचि वैभव देई ॥ अखंड केशव सद्गुरुपायीं ॥ इतु० ॥ ४ ॥

पद ॥ ५९ ॥

(राग—कल्याण. ताल—धाड—वरील पदा प्रमाणें.)

आतां मी नाहीं ॥ मी नाहीं ॥ नरहरि वांचुनि कांहीं ॥ आतां० ॥ ध्रु० ॥ विकल्प अवघा सरला ॥ दोहीं डोळां नरहरि भरला ॥ आतां० ॥ १ ॥ अनुभव पाउल वाटे ॥ जिविचें जीवन नरहरि भेटे ॥ आतां० ॥ २ ॥ चित्सुख घनसारा ॥ नरहरि वांचुनि व्यर्थ पसारा ॥ आतां० ॥ ३ ॥ ॥ सोडुनि साधन क्षुद्रा ॥ सबाह्य अभ्यंतरीं नरहरि मुद्रा ॥ आतां० ॥ ४ ॥ शिवपण जिवपण नेलें ॥ केशव गुरुनें नरहरि केलें ॥ आतां० ॥ ५ ॥

पद ॥ ६० ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी चाल—दत्तात्रय चतुराक्षरी)

सदयहृदय नरसिंह मला दे ॥ निजसुख ब्रह्मरसाचें ॥ ध्रु० ॥ संचित प्रारब्ध क्रियमाणें ॥ जनन मरण सुख दुःख जिवाला भोग घडे हें साचें ॥ सदय० ॥ १ ॥ हा भवबंध अविद्या योगें ॥ पुत्र मित्र धन कलत्र नोहे ॥ शाश्वत दोंदिवसांचें ॥ सद० ॥ २ ॥ तनय जगन्नाथाचा विनवी ॥ कृष्ण कृपाघन नरहरि राया ॥ करिं हित निजदासाचें ॥ सदय० ॥ ३ ॥

## पद ॥ ६१ ॥

[ राग–सूखकल्याण. ताल–धुमाळी. ]

दत्त भजनकूं दिया कमलमुख·गुरूभजनकूं दिया ॥ गुरूकृपासे ऐसी उत्तम सुंदर नरतनु पाया ॥ ध्रु० ॥ खाया पिया सुखसें सोया॥हुनाहुना सो लिया ॥ १ ॥ ज्या मुख निसिदिन गुरू नाम नही ॥ ओ तुम कछु नहि किया ॥ दत्त०॥२॥ दास कहतहै सुन भाइ साधु मट्टिच होगयि काया ॥ ३ ॥ गुरू स्तवनकूं जो नहि-पाया ॥ आया वैसा गया ॥ दत्त० ॥ ४ ॥

## पद ॥ ६२ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–बरंजीव कल्याण रहो. )

श्रीपादश्रीवल्लभ नरहरी तारिं तारिं मजला दयाळा तारिं तारिं मजला ॥ श्रमलों मी या प्रपंचिधामीं आलों शरण तुला ॥ ध्रु० करितां आटाकाट प्रपंच अवघा दिसतो मिथ्यात्वें ॥ दयाळा दिसतो मिथ्यात्वें ॥ ह्मणवुनि भजन तुझें मज देवा वाटे सत्यत्वें ॥ श्रीपाद० ॥ १ ॥ किंचित मात्र कृपा जरि मजवरि करिशिल उदार मन ॥ चुकलों मी ह्या विषय सुखाचे आहारांतुनि जाण ॥ श्री० ॥ २ ॥ कृष्णातटिंनिकटी जो विलसे औदुंबर छायीं ॥ हंस परात्पर भारतिनायक लीन तुझे पांयीं ॥श्री०॥३॥

## पद ॥ ६३ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–भीतोमालिमनें तुष्ट )

धन्य दिवस माझा आज ॥ भेटला नरसिंह महाराज ॥ ध्रु० ॥ जन्म सफल नरहरिनें केलें ॥ साधुनि माझें काज ॥ भेटला० ॥ १ ॥ चंचल हें मन वस्तू ठेवुनि ॥ दिधलें त्याचें व्याज ॥ भेटला० ॥ २ ॥ भक्तजनाचें कार्य कराया ॥ किमपि नये त्या माज ॥ भे० ॥ ३ ॥ बोले कृष्ण जगन्नाथात्मज ॥ नाचूं सांडुनि लाज ॥ भेटला० ॥ ४ ॥

## पद ॥ ६४ ॥

(राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—वारी संकट हरि दामाजी)

जनहो श्रीपादपदीं मन ठेवा ॥ मनि कुमति न ठेवा ॥ संगमीं संध्या स्नान करुनि ॥ श्री नरहरिचरण औदुंबरिं सेवा ॥ ध्रु० त्रिगुणात्मक दत्त दिगांबर मूर्ती । षड्गुण परि स्फूर्ती ॥ चाल ॥ चरण कमल मकरंद मधुपसम ॥ स्वामिचरण सच्चितसुख सेवा ॥ जनहो० ॥ १ ॥ कृष्णा श्री पूर्वक पंचगंगा अतिविमलतरंगा ॥ मध्यें श्रीसद्गुरुपदयुगीं रंगा ॥ परिहरुनि कुसंगा ॥चाल॥ अर्थ चतुर्विध सार्थक घडती ॥ कृतार्थ बुद्धि ठसतांचि सदैवा ॥ जनहो० ॥ २ ॥ राज्य देउनि नृप केलें रंका ॥ हा त्रिभुवनी डंका ॥ कळतां निरसे दुरित कलंका ॥ कां मिथ्या शंका ॥ चाल ॥ धीटपणेंचि अवीट पदाप्रति ॥ नीट करुनि मन सत्वर पावा ॥ ३ ॥

## पद ॥ ६५ ॥

( राग—कल्याण—ताल—धुमाळी—चाल—संतबायाची जोड )

नरसिंहराजा ब्रह्म सनातनरे ॥ ध्रु० ॥ रौप्याहि नोहे दगडही नोहे कांचनरे ॥ नर० ॥ १ ॥ या जडदेहा फिरवी तयाचें ॥ करणें चिंतनरे ॥ नर० ॥ २ ॥ कृष्ण जगन्नाथात्मक याचें करि पदवंदनरे ॥ नर० ॥ ३ ॥

## पद ॥ ६६ ॥

[ राग—परज. ताल—धुमाळी. चाल—भवचें शिवमयकीं शिव० ]

दत्ता ब्रह्मचारी ब्रह्मचारी ॥ त्रिभुवनांत तुझी फेरी ॥ ध्रु० ॥ शेषातळीं आसन ॥ माहुरगडासि निद्रास्थान ॥ दत्तात्र० ॥ १ ॥ काशित स्नान करि ॥ चंदन लावित पंढरपुरीं ॥ दत्तात्र० ॥ २ ॥ कोल्हापुरीं फिरे झोळी ॥ भोजन करीत पुरि पांचाळी ॥ द० ३ ॥ माणिक ह्मणें सद्गुरुनाथा ॥ जगव्यापका अत्रिसुता ॥ दत्ता० ॥ ४ ॥

## पद ॥ ६७ ॥

(राग-सोनी. ताल-दादरा. चाल-निरंजना सुखहोइल)

गुंग मला केलें गुरुनें गुंग मला केलें ॥ एकाएकीं झडप घालुनि उलट पाहवीलें ॥ ध्रु० ॥ देशिक ठकडा मोठा बाई काय चेटूक केलें सन्मुख बैसविलें ॥ कानुबानु सांगुनि कानीं उलट पाहविलें ॥ १ ॥ झपकर होता अंधार तेथें खपकर उजाडलें ॥ चंद्र सूर्य नसतां तेथें तेज प्रकाशलें ॥२॥ जातां जातां नवल झालें सांगतां नये बोले ॥ मनचि पांगुळलें ॥ पूर्णानंदि शिवरामीं तेथें दर्शन झालें ॥ ३ ॥

## पद ॥ ६८ ॥

(राग. झिंजोटी-ताल-एका.)

समज मूढा गुरुविण गति तुज नाहींरे ॥ ध्रु० ॥ देशोदेशीं हिंडशी ॥ नाना तीर्थे भ्रमसी ॥ घोंडा पाणीच ॥ पाहिरे ॥ समज० योग याग विधि ॥ येणें नोहे प्राप्ती ॥ व्यर्थचि खटपट ॥ पाहिरे ॥ समज ॥ २ ॥ कर्ता हर्ता ॥ तो करविता ॥ व्यर्थचि भाषण ॥ पाहिरे ॥ समज० ॥ ३ ॥ सांगतों माणिक ॥ नको करूं आणिक ॥ लाग तूं सद्गुरू पायिरे ॥ सम० ॥ ४ ॥

## पद ॥ ६९ ॥

(राग. कालंगडा ताल-दादरा.)

आलाहो बाई आला ॥ गुरुराज माझा हा ॥ ध्रु० ॥ सायुज्य तुरंगीं चढे ॥ सत्वाचा रुमाल उडे॥अष्टभाव सेवक पुढें ॥ चालती चपला गाढे हो ॥ आ० ॥ १ ॥ शांतिचा मंदिल शिरीं ॥ धैर्याचा तुरा वरी ॥ भक्तीची कटार उरीं ॥ नामाचा फिरंग करिं हो ॥ आ० ॥ २ ॥ काळाचा जबडा फोडी ॥ विषयांची मुंडी मोडी॥प्रारब्धीं लिहिलें फाडी ॥ निर्दोष यश जोडी हो ॥ आ० ॥ ३ ॥ कीर्तिचा नगारा वाजे ॥ आनंद त्रिभुवनिं गाजे हो ॥ तनमन छत्र विराजे ॥ केशव स्वामी महाराजा ॥ आ०॥ ४ ॥

॥ पद ॥ ७० ॥

( राग-हिंडोल. ताल-त्रिवट. )

मोहे लटक लागी गुरुचरननकी ॥ ध्रु० ॥ चरणबिना मोहे कछु नही भावे ॥ झुटी माया सब सपननकी ॥ १ ॥ भव जलसागर सूकगयो सब ॥ नही फिकीर मोहे तरननकी ॥ २ ॥ निर्द्वंद्व नारायण हासी खेले॥उलट विधी खुप नयननकी ॥३॥

पद ॥ ७१ ॥

[रागगौरी.-ताल-धुमाळी. चाल-गाफिल मत रहना बेटा.]

गुरुनें अमल पिलायाजी ॥ मुजको गरक सुलायाजी ॥ ध्रु० ॥ आगमनिगमकी बुट्टी गहिरा॥गुरूवचनका पानी ॥ मनकुंडीमें खुब घोटकर ॥ आत्मग्यानसे छानी ॥ गुरुनें० ॥ १ ॥ नैनअगोचर मुद्रा चढकर ॥ उलटा महाल देखो॥व्हांके अंदर मूरत बैठी॥ रूप नही व्हां रेखो ॥ गुरुनें ० ॥ २ ॥ निरंजन रघुनाथगुरू॥येकही बात सुनाई॥ मेरा चेहेरा मुजे बताया ॥ आपेआप भुलाई॥४॥

पद ॥ ७२ ॥

[ राग-गौरी. ताल-धुमाळी. चाल-कैसा जोग कमाया बे ]

गुरुनें बहुत सुनायाजी ॥ मुजकुं फकीर बनायाजी ध्रु० ॥ निराकारकी ताजवनीहै ॥ निर्गुण सईलाली ॥ गुरु० ॥ १ ॥ आत्मग्यानका लिया कटोरा ॥ घरघर तुकडे मांगे ॥ कामक्रोधकी धुनी जलतहे॥अनुहत डंका बाजे ॥ गुरु० ॥ २ ॥ औटहातका लाल पिंजरा ॥ सोहं पोपट बोले ॥ गुरुनाथ निरंजन रघुनाथ गुरुनें॥ अंतरकापट खोले ॥ गुरु० ॥ ३ ॥

पद ॥ ७३ ॥

( राग-कल्याण. ताल-धुमाळी. संतपदाची जोड या चालीवर.)

नमन वैष्णव सद्गुरु राजा ॥ ध्रु० ० ॥ स्वरूपीं जगनग कनकीं-जैसें ॥ निश्चय हा माझा ॥ नम० ॥ १ ॥ पदकमलाहुनि विषय

न रुचती ॥ चित्तभ्रमरा ज्या ॥ नम० ॥ २ ॥ जगन्नाथसुत कृष्ण म्हणे मज ॥ निजानंद अजि पाजा ॥ नम० ॥ ३ ॥

पद. ॥ ७४ ॥

[ राग–कल्याण. ताल–धुमाळी. संतपदाची जोड येचालीवर. ]

भेटले मज वैष्णव सद्गुरुराज ॥ ध्रु ॥ माया मृगजल भ्रांति उडाली ॥ चढतां चिन्मयमाज ॥ भे० ॥ १ ॥ जग धोंडाळुनि पाहत असतां ॥ मागुनि केला गाज ॥ भे० ॥ २ ॥ एकांती एकांतीं पाहतां पाहतां ॥ अवचित मिळालें आज ॥ भे० ॥ ३ ॥ कृष्ण जगन्नाथात्मज नाचे ॥ सांडुनि लौकिक लाज ॥ भे० ॥ ४ ॥

पद ॥ ७५ ॥

( राग–पझ. ताल–धुमाळा. )

आज लहुं निर्बान गुरुजी॥आज लहुं निर्बान ॥ ध्रु० ॥ तुमारे चरणपर दुवा राखुं ॥ सीस करुं खूर्बान ॥ गुरुजी० ॥ १ ॥ पांच पचीस हाती स्वारू ॥ उपर लाल निशान ॥ २ ॥ एकविसहजार छेसो घोडे ॥ हात लिये नव बान ॥ गुरुजी० ॥ ३ ॥ ग्यारो मेहलमे धूम मची है ॥ किया मुलुख मैदान ॥ गुरुजी० ॥ ४ ॥ दास तुका कहे सलाम हमारा॥ लगा उन्मनि ध्यान ॥ गुरुजी० ५

पद ॥ ७६ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल–संतपदाची जोड. )

गुरुचा विसरूं कसा उपकार ॥ ध्रु० ॥ स्वस्वरूपाच्या अनुसंधानें ॥ हरिला हा जडभार ॥ गुरु० ॥ कोण मी याचा विचार पाहतां ॥ चरणीं दिधला थार ॥ गु० ॥ २ ॥ कृष्ण जगन्नाथात्मजासि वैष्णव ॥ सद्गुरुचा आधार ॥ गुरु० ॥ ३ ॥

पद. ॥ ७७ ॥

( राग–धनाश्री. त्रिवटा ताल–धुमाळी. चाल–भक्तासाठीं तो जगजे. )

हरी कोण मला तारी ॥ बंदी जाहली दरबारीं ॥ ध्रु० ॥ पांडव

ह्मणती तुज खासा ॥ त्यांतें दवडिसि वनवासा ॥ छळणासी येउनि दुर्वासा ॥ परंतु पावसि सूगमसा ॥ गोपी अनुसल्या रासा ॥ विरहें देसि तयां त्रासा ॥ आवडे कुब्जा तुज नारी॥ धुंदी० ॥ १ ॥ स्तन मुखि बकि नीच विष घोटी ॥ मानिसि देवकिसम पोटीं ॥ ज्यांचीं आचरणें खोटीं ॥ वदविसि त्यांतें शतकोटी ॥ नारदां कीर्तनिं रति मोठी ॥ पड त्या न मिळे लंगोटी ॥ अशि काय चाल तुझी भारी ॥ धुंदी० ॥ २ ॥ त्वां हे भक्तचि बहु केले ॥ तेही विचित्र करित गेले ॥ कन्ये पुस्तक लिहविलें ॥ कोणी पशुतें बोलविलें ॥ मृतपुत्रांतें ऊठविलें ॥ अमृत मृतांतें सेवविलें ॥ मारुनि उठविति कीं घारी ॥ धुंदी०॥३ ॥ अघटित घटनापटु देवा ॥ न कळत लीलेचा हेवा ॥ इच्छिसि मन भज घनसेवा ॥ पुरवा प्रासादिक भावें ॥लाउनि दाद भवा वारीं॥४॥

पद ॥ ७८ ॥

(राग—भूपकल्याण. ताल—एका.)

कांहो धरिली अढी अढी ॥ दत्ता कांहो अढी ॥ अनाथ मी ॥ अपराधी स्मरतों ॥ उत्तरा पैल थडी ध्रु०॥ एकनाथागृहिं पाणि वाहिलें ॥ गंगेच्या कावडी ॥ कबिराचे शेले विणुनी ॥ त्याची घालिसि घडी ॥ दत्ता० ॥ १ ॥ सांवतामाळीयाची भाजी खुडुनियां ॥ त्याची बांधिसी जुडी ॥नरसीमेहत्याची हुंडी पटवुनी ॥ त्याचा झालासि गडी ॥२॥ जनाबाइचीं धुणीं धूतलीं ॥ चंद्रभागेच्या थडीं ॥ सज्जन कसाई मांस विकीतां ॥ त्याची लाविसि घडी ॥ दत्ता० ॥ ३ ॥ दामाजीपंताचे वेळीं ॥ महार झाला तांतडी ॥ पायीं वहणा हातीं काठी॥खांद्यावर घोंगडी ॥४॥ चोरव्यामेळ्याचे घरीं येउनी ॥ दोरें ओढि तांतडी ॥त्याची स्त्री बहु हांका मारी वत ॥ कोठें दिघली दडी ॥ ५ ॥ गजेंद्रांची धांवा ऐकुनी ॥ वेगें घालिसि उडी ॥ अर्जुन रथिं सा-

रथ्य करूनि त्यांचीं ॥ दूरकरिसि सांकडीं ॥ दत्ता० ॥ ४ ॥

पद ॥ ७९ ॥

( राग—रामकली. ताल—एका. चाल—विठ्ठल भक्तांची माउ )

दत्तात्रय अवधूता ॥ जनार्दन स्वामि एकनाथा ॥ गुरू दत्ता० ॥ ध्रु० ॥ दत्त अवधूत ॥ अवधूत निराकार ॥ स्मरणें पावे सत्वर ॥ शुद्ध अविनाश ॥ अविनाश सुंदर ॥ स्वरूप हें दिसें मनोहर ॥ पतित मी पापी ॥ पापी दुर्धर ॥ ने तूं भवसिंधू पार ॥ मागणें हेंची ॥ हेंची सत्वर मस्तकीं ठेवि अभयकर ॥ सगुण हें रूप ॥ रूप दावि आतां ॥ जना० ॥ १ ॥ मुख्य नीवास ॥ नीवास मेरुशिखरीं ॥ समाधी निद्रा माहूरीं ॥ स्नान सारिलें ॥ सारिलें गंगातीरीं ॥ टिळक रेखिला पंढरीं ॥ माध्यान्हभिक्षा ॥ भिक्षा करवीरीं ॥ भोजन केलें कावेरीं ॥ सायंसंध्या ॥ संध्या सागरीं ॥ मुख्य तें आसन केदारीं ॥ जाउनी चरणीं ॥ चरणीं ठेवुं माथा ॥ जना० ॥ २ ॥ भस्मभूषित ॥ भूषित दिव्य कांती ॥ माळा त्रिशुळ डमरु हातीं ॥ गळां वनमाळा ॥ वनमाळा वैजयंती ॥ कर्णी कुंडलें सूर्यदीप्ती ॥ माथां मुकूट ॥ मुगुट चंद्रज्योती ॥ पहातां वेधलि मनोवृत्ती ॥ आकर्णनयन ॥ नयन मदनमूर्ति ॥ वर्णितां मौनावल्या श्रुती ॥ तेथें मी पामर ॥ काय वर्णु आतां ॥ जना० ॥ ३ ॥ अत्रि अनसूया ॥ अनसूयात्मज दत्त ॥ त्रिगुण अवतार मूर्तिमंत ॥ कटीं मेखळा ॥ मेखळा रत्नजडित ॥ चरणीं नपुरें रुणझुणत ॥ प्रसन्न हें वदन ॥ वदन हर्षयुक्त ॥ तारिले पतित असंख्यात ॥ अखंड हें नाम ॥ नाम वदनांत ॥ मूर्ति मम बिंबलि हृदयांत ॥ अभय वर देई ॥ देइं गुरूनाथा ॥ जना० ॥ ४ ॥ लक्षचौऱ्यांयशीं ॥ चौऱ्यांयाशीं जन्मवायां ॥ म्यां मोगिले गुरुराया ॥ भक्तवत्सला ॥ वत्सला दत्तराया ॥ करावी कृपेची छाया ॥

मागणें हेंचि ॥ हेचि गुरुसखया॥न्यावें मातें निजठाया॥कृष्णात्मजासी ॥ आत्मजासि तारिं आतां ॥ जना० ९ ॥

पद ॥ ८० ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. )

नाथ कैसो गजको बंद छुडायो ॥ येही अचरज मोरे मन भायो ॥ हांसी पुछे जनक पुरकी नारी ॥ नाथ० ॥ ध्रु० ॥ जग और ग्राह लरे जलभीतर ॥ लरत लरत गज हारे ॥ येही गज डूबन नहि पावे ॥ गजकी टेर सुनी अत्रिनंदन ॥ पाव पलख बिच आये नाथ० ॥ १ ॥ लेहे प्रऱ्हाद खंबसे बांधे ॥ राजन त्रास दिखायो ॥ साधुजननकी लज्जा राखो ॥ बदत विलंब नहि लायो ॥ नाथ० ॥ २॥ अंधी अंधेला माततात पियासे॥सर्बन पानिकुं जावे ॥ ले गडुवा जलभरनन लागे॥ दसरथ बान चढायो ॥ नाथ० ॥ ३ ॥ राजा जनकपुर जग्य रचो है ॥ धनुस उठेना उठाई ॥ तुरउ धनुस जनकपन राख्यो ॥ सिता हरि घन लायो ॥नाथ० ॥ ४ ॥ साथसखी मिलि मंगल गावै ॥ रेसम गांठि गुंथावे ॥ छुठेछ न छुटे सीयाजिके कंकन ॥व्हां कैसे चाप चढायो॥नाथ०॥ ॥ ५ ॥ शबरिके बेहेर सुदामाके तंदुर ॥ रुचिरुचि भोग लगायो ॥ जिर्ज्योधन घर मेवा त्यागो ॥ साग विदुरघर पायो ॥ नाथ० ॥६॥ तुलसिदास भजो भगवान ॥ गुरुभजन मन गाई ॥कोमल मात उमर रहि थोरी ॥ तोहि भरोंसा न आयो ॥ नाथ०॥७॥

पद ॥ ८१ ॥

(राग–धनाश्री. ताल–धुमाळी. चाल–अशाला अशा ना०)

गुरुविण तुज मुक्ती नाहींरे बापा ॥ ध्रु० ॥ फिरून कोटी तीर्थे वासी ॥ करितों नानाचि उपायरे ॥ १ ॥ योग याग विधी तेणें नोहे सिद्धी व्यर्थच खटपट पाहीरे ॥ सांगतों मानिक सांगतों आणिक ॥ लाग तूं सद्गुरु पाईरे ॥ २ ॥

॥ पद ८२ ॥

[ राग—कल्याण. ताल—दीपचंदी. चाल—हा नर जन्म किती. ]

अशा मज कोणी कांहीं ह्मणा ॥ ध्रु० ॥ धरिलें तत्र व्रत कधीं न सोडूं ॥ श्रीरामस्मरणा ॥ अ० ॥ १ ॥ लोक लाज मज किमपि न लागे ॥ आत्मैक्यस्फुरणा ॥ अ० ॥ २ ॥ वंदिल निंदिल ज्या देहा तो ॥ अचुक पावे मरणा ॥अ० ३ ॥ यास्तव साधुनि संतसमागम ॥ करूं निज उद्धरणा ॥ अ० ॥ ४ ॥ विष्णु गुरूच्या कृष्णजगन्नाथ ॥ आठवितों चरणा अ० ॥ ५

॥ पद ८३ ॥

( राग—झिंजोटी. ताल—दादरा. चाल—गेला मान सावरील. )

जायिं गुरुपायीं लागवेगें स्वहित पाहींरे ॥ नर तनु हे स्थिर नाहीं विषयीं भरासि परि पडसि अपायीं ॥ न० ॥ ध्रु० ॥ स्त्री-पुत्र सुहृत् तुज वाटे हित॥यम घाला घालि तेंव्हां करिसि तूं कायी ॥ न० ॥१॥ कोण कोणाचा यांत जिवाचा भुलसि फुकट ॥ का-यी धरिसि पिसायि ॥ न० ॥ २ विष्णु गुरुपदा आठवुनि सदा कृष्ण जगन्नाथ झाला सुखरुप ठायी ॥ न० ॥ ३ ॥

॥ पद ८४ ॥

( राग—सारंग. ताल—एका. चाल—आधीं मन मुंडा बा. )

अखंडितश्रीसद्गुणमंडित पंडितराणा ॥ शिकुनि साधुच्या झुंडित त्याला धुंडुनि मनिं आणा ॥ ध्रु० ॥ अघहारक सुखकारक तारक विश्वाचा उद्धारक जो ॥ निजानंद सुखकंद त-याचा छंद मनीं संतत उपजो ॥ अखं० ॥ १ ॥ जगन्नियंता सद्गतिदाता प्रणताचा प्रियकैवारी ॥ पडतां जडभारी संसारीं निज-दासांचें भय वारी ॥ अखं० ॥ २ ॥ जीवितेश उपदेष्टा त्याचा निदेश हाच स्वदेश खरा ॥ हरूं शकति ना अरि कोणीही वतन सुखाचें हेचि धरा ॥अखं०॥ ३ ॥

॥ पद ८५ ॥

( राग—कालंगडा. ताल—एका. चाल—नाम रामसे जादा भाई )

स्थिरावि चित्त गुरुराजकृपारे ॥ पांहतां कोण मी कैसारे ॥ स्थि० ॥ ध्रु० ॥ अनेक दृश्य जगत्पसारा यांचा एकचि आपण साक्षी बुमजारे ॥ प्रपंच कांहिं वस्तुत्वें नाहीं कनकावरि नग जैसारे ॥ स्थि० ॥ १ ॥ अस्तिभाति प्रिय जाणुनि आत्मा साचा नाम रुपात्मक वृत्ती वर्जारे ॥ ठायींच्या ठायीं नुरोनियांही जागत स्वरूपी बैसारे ॥ स्थि० ॥ २ ॥ अनुभव विष्णु कृष्ण जगन्नाथाचा निर्विषय स्फूर्तीनें समजारे ॥ व्यवहारितांही समाधी न ढळेपाहीं समय असो भलतैसारे ॥ स्थि० ॥ ३ ॥

॥ पद ८६ ॥

[ राग—खमाज. ताल—त्रिवट. चाल—मना भज भज भज सत्. ]

कहो गुरुनाथ मेरे भाई ॥ ध्रु० ॥ जीनें पूजा गुरुनाथ ॥ उसकी उडी जात पात ॥ घोषबाजे दीनरात ॥ सहज काल कांहीं ॥ १ सात घडी पलख फेर ॥ हो रही सदा गजर ॥ नर तनूभार बाहर ॥ येई बाहर व्हांई ॥ २ ॥ त्रिपुरीके पकड भाट ॥ काळ उखाडे एक झाट ॥ लगी जोत लखलखाट ॥ झुलेनाथ साई ॥ ३ ॥ दास तुका गावे ख्याल ॥ नाथ गोपाळ किसनकाबाल ॥ कहत नाथ गोपाल ॥ सुरस गुण गाई ॥ ४ ॥

॥ पद ८७ ॥

( राग—कल्याण. ताल—दीपचंदी. चाल—साधन या युगीं श्री. )

सद्गुरुका मर्म न जाना ॥ साधु भाई देखत जग गवराना जी ॥ ध्रु० ॥ हिंदु कहे वो राम हमारा ॥ मुसलमीन रहिमाना ॥ आपसमें दो लड लड मूवे ॥ दुर्वधिका मोलपछाना जी ॥ साधु० ॥ १ ॥ केतेक नेमी धरमीक होवे ॥ प्रात करे असनाना ॥ आतम मार पासानकुं पूजे ॥ उनका कौन गिनाना जी ॥ संत० २ ॥ केतेक

पीर आवलिया कहावे ॥ पढत किताब कुराना ॥ कहे हो मुरीद तकलीब बनावे ॥ उन्ने अल्ला नही जाना जी ॥ सत० ॥ ३ ॥ ईसबीद चलत कहेवत हामको॥आप कहावे शानाजी॥कहे कबीर सुनो भाई साधो ॥ दोनोमें कोन दिवाना जी ॥ सतगु० ४ ॥

॥ पद ८८ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल–भजनबिन धिठाचतु० )

गुरुचे पाय मनिं ध्याऊं ॥ श्रीचे पाय मनिं ध्याऊं ॥ ध्रु०॥ पाय न येती जरि मनिं ध्यातां ॥ नामचि आह्मि गाऊं ॥ गुरु०॥ १ ॥ नामहि नये जरि सर्वकाळ मुखीं ॥ पूजाकाळीं पाहूं ॥ गुरु० ॥ २॥ तेंहि घडेना प्रतिदिनि जरि तरी॥वाडिमधें त्या राहूं ॥गुरु० ३॥ संसाराची त्या वाडीमध्यें ॥ काळजी आह्मि न ठेवूं ॥गुरु० ॥४॥ लक्ष्मण ह्मणें पदकुसुम द्वयें ॥ पाहिलीं आण पुढें वाहूं ॥ ५ ॥

॥ पद ८९ ॥

(राग–यमनकल्याण. ताल–धुमाळी. चाल–सगुण माया आलि०)

स्तवनीं लागा श्रीगुरु यतीच्या जातो काळ हा वृथा रे ॥ ध्रु० ॥ चित्सुख सोडुनि उगा कां रे ॥ भुलतां तुह्मीं प्रपंचा रे ॥ धन जन वैभव मानहि सारा ॥ सत्य व्यर्थ पसारा रे ॥ स्तवनीं०॥ १ ॥ भवजल डोहीं बुडतां बा रे ॥ कामा नये धनमानादि ॥ आपुल्या चित्तीं भाव धरा रे दृढ ॥ धरा तयाची कास रे ॥ स्त० ॥ २ ॥ पतित पावन जोडुनि प्रेमें ॥ लागा भजनीं अनिवार रे ॥ दास तुमचा तुह्मां प्रार्थी ॥ ध्यावा सद्गुरुराजा रे ॥ स्तवनीं०॥ ३ ॥

॥ पद ९० ॥

( राग–छायानट. ताल–त्रिवट. कृपाघना तुज कां नये० )

गुरुकृपांजन पायो मेरेभाई ॥ रामबिना कछु सारहि नाहीं ॥ ध्रु० ॥ जागत राम सोवत राम ॥ सपनमें देखे रामहि राम ॥ गुरु०॥ १ ॥ अंदर राम बाहिरबी राम ॥ जहां देखो तहां पूरन

काम ॥ गुरु०॥ २ ॥ एकाजनार्दनीं नामही नीको ॥ जहां देखुं तहां राम सरीखो ॥ गुरु०॥ ३ ॥

॥ पद ९१ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. चाल–तारि तारि रामरायारे.)

या चरणीं मज ठाव ॥ अहो जी सद्गुरुराया ॥ ध्रु० ॥ नाहीं मज पापमिती ॥ आप्तजन गांजिताति ॥ गेलि व्यर्थ हातोहातीं ॥ माझी नरतनु वांया ॥ अहो० ॥ १ ॥ नाहीं होत तुझी भक्ती ॥ सदा विषयीं आसक्तीं ॥ कैसि अभाग्या मज मुक्ति ॥ जळो जळो तुजविण काया ॥ अहो० ॥ २ ॥ माझे अपराध किती ॥ चित्रगुप्त गणितां थकति ॥ पुत्रधनादि न कामा येती ॥ व्यर्थ या भ्रमें भ्रमलों ॥ अहो०॥ ३ ॥ निजपदीं शरणां गत ॥ मोकलितां हा अनाथ ॥ ब्रिद सर्वथा होईल व्यर्थ ॥ मग तूं काय करिसि ऊदारा ॥ अहो० ॥ ४ ॥ जरि नाहीं दास बूज ॥ कोण धांव ह्मणें तूज ॥ राखी राखी माझी लाज ॥ सर्व खोटी मायाहो अहो० ॥ ५ ॥

॥ पद ९२ ॥

( राग–धनाश्रीचा जिल्हा.ताल–पंजाबी त्रिवट. चाल–गब्बानो कृष्ण ग० )

आवड जेजे दीनासी ॥ ते न मोडी हा संन्यासी ॥ ध्रु० ॥ बहु रूपें कारंजपुरी ॥ भिक्षे जाय घरोघरी ॥ अष्टग्रामीं गाणगनगरीं ॥ काय अन्न न मिळे त्याला ॥ आव० ॥ १ ॥ सिधा आणुनिया पांचशेर ॥ भिक्षा करितां द्विजवर ॥ जेववूनी अगणीत नर ॥ मान दिधला बहू त्यासी ॥आव० ॥ २ ॥ प्राशी वांझ महिषी पय ॥ घेवड्याच्या शेंगा खाय ॥ याला दैन्य आलें काय ॥ रिद्धिसिद्धी ज्या दासी ॥ आवड० ॥ ३ ॥

॥ पद ९३ ॥

[ राग–सूधकल्याण. ताल–दादरा.]

मनीं श्रीपाद आठवा ॥ धरुनि श्रद्धा रति भक्ति भावा हो ॥ ध्रु० होता निर्गुण निर्विकार ॥ झाला सगुण साकार ॥ भक्तां प्रेमें निर्धार ॥ त्याशि आवडे भोळीसेवा हो ॥ मनीं० ॥ १ ॥ गुरुचरित्र कामधेनू ॥ पठणी ज्याचा नित्य नेमू ॥ त्याची होइल पूर्ण कामू ॥ ह्मणोनिया त्वरें गावा हो ॥ मनीं ॥ २ ॥ हरुनि सकळ आपदा ॥ नेइल आपूलिया पदा ॥ कृष्णदासा छंद सदा ॥ दासा साठीं केला धांवा हो ॥ मनी श्री० ॥ ३ ॥

॥ पद ९४ ॥

( राग—हमीरकल्याण. ताल—एका. )

आतां गति कैशि करूं गुरुराज ॥ वाटतसे मनीं लाज ॥ आ० ॥ ध्रु० ॥ इहलोक न परलोकां मुकलों ॥ चुकलों साधन वाट ॥ हाट धरुनि यम हाट सुधरला ॥ कांट न चालत आज ॥ आतां० ॥ १ ॥ शक्ति नसोनि आसक्ति प्रपंचीं ॥ भक्ति न होत मजला ॥ तुजला पुजिला नाहीं कधीं हृदीं ॥ सजलों निशिदिनिं साज ॥ आतां० ॥ २ देहि विदेही मुदेही तुला जे ॥ भजति ते सदया ॥ उदया येति दया न कसी तव ॥ वध या कृति मम माज ॥ आतां० ॥ ३ ॥

॥ पद ९५ ॥

( राग—भैरवी. ताल—धुमाळी. )

तारि तारि हरी ॥ सद्गुरुराया हो ॥ ध्रु० ॥ आठव नाहीं तव चरणाचा ॥ मंद मी साधनहीन रे ॥ स० ॥ जन्म जरा भयें व्याकुळ झालों ॥ चिखलीं जैसा मीन रे ॥ स० ॥ २ ॥ धांव एकांतीं एकजनार्दनीं ॥ पाव तों त्र्यंबक शीणरे ॥ ३ ॥

॥ पद ९६ ॥

( राग—काफी. ताल—त्रिवट. चाल— )

तो हा श्री सद्गुरु मीं पाहिला ॥ ध्रु० ॥ अनाम अरूप निर्गुण निष्क्रिय ॥ अजाति स्वप्रभ राहिला ॥ तोहा० ॥ १ ॥ कोहं सोहं

भाव विवर्जित ॥ जळीं बुद्बुदसा वाहिला ॥ तोहा० ॥ २ ॥ पूर्णचिदाकाशीं कैचा ॥ भेदाभेद राहिला ॥ तोहा० ॥ ३ ॥

॥ पद ९७ ॥

( राग–खमाज. ताल–त्रिवट. )

हृदयीं सद्गुरु पाय आतां ॥ मज हें भव भय कैचें हो ॥ अंत बाह्य श्रीगुरुरूप एकत्वें साचें ॥ ध्रु० ॥ मी माझें ही बुद्धि हरवली द्वैतहि कोठें भास होइना ॥ दृश्य द्रष्टा दर्शन गुरुविण कांहीं हा भासे नाहो ॥ हृदयीं० ॥ १ ॥ कर्ता कर्म करण हर पलें काय करूं हो मी आतां ॥ ध्यातां ध्यान ध्येय दिसेना मज माजि जें मींच पहातां ॥ हृद० ॥ २ ॥ अवस्थानवस्था स्थिती कळेना भोग्य भोग ना भोक्ता ॥ नानात्वाविण सद्गुरुची निज परिपूर्णत्राता ॥ हृद० ॥ ३ ॥

॥ पद ९८ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. चाल–तारि तारि रामराया. )

श्रीगुरूनें बरें केलें ॥ माझें मीपण नेलें ॥ ध्रु० ॥ दृश्य जरि पाहूं तरि कोठें दिसेना ॥ द्रष्टत्व ही वांझ झालें ॥ माझें मी० ॥ १ ॥ विराट विश्वीं हिरण्यगर्भ तैजस ॥ ईश्वर प्राण काय झाले ॥ माझें मी० ॥ २ ॥ पिंड ब्रह्मांड अहि रज्जु न्यायें ॥ चित्स्वरुपीं ठेलें ॥ माझें० ॥ ३ ॥

॥ पद ९९ ॥

( राग–गौरी. ताल–धुमाळी. चाल–आह्मी नमु त्याला. )

गुरु पादें मन राहो हें मन राहो॥तत्पद सादर लोचन पाहों ॥ध्रु०॥ तद्यश श्रवणीं कर्ण रमावें ॥ निशिदिनि वाचे भजनहि व्हावें ॥ गुरुपादें० ॥ १ ॥ पदसुमना नासेंद्रिय सेवो ॥ गुरुपदतीर्थी मस्तक लेवो ॥ गुरु० ॥ २ ॥ हे कर करोत गुरुपदपूजा ॥ हृदयीं प्रगट राहो गुरुराजा ॥ गुरु० ॥ ३ ॥ मातृ भ्रातृ पितृ

विद्या साधन ॥ अहंकार मानो गुरुचरण ॥ ४ ॥ बहू वास ना धरि दृढ भावें ॥ प्रसादें याच्या सिद्धी जावें ॥ गुरु ॥ ५ ॥

पद ॥ १०० ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—विठाबाई माउ.)

दत्तात्रय महाराज भज मना ॥ ध्रु० ॥ अयुतवत्सरें अत्रिमुनीनें स्त्रीसह केली अनुष्ठानें ॥ कृपा केली मग करुणापूर्णे ॥ धरिली ब्रिदाची लाज ॥ भजम० ॥ १ ॥ ब्रह्मा विष्णु आणि महेश्वर ॥ मुनि वर मागा ह्मणती सत्वर ॥ द्या युष्मत्सम पुत्र निरंतर ॥ करावया निजकाज ॥ भजम० ॥ २ ॥ ब्रह्मांशें सुत चंद्र प्रथम हा ॥ श्रीशंकर दुर्वाससुत पहा ॥ तृतिय विष्णु योगीश्वर महा ॥ त्रिभुवनि विस्मय भाज ॥ भजम० ॥ ३ ॥

पद ॥ १०१ ॥

(राग—बहिरवी. ताल—धुमाळी.)

गुरुने डोइवरि हात फिरवीला ॥ काय ह्मणावें आतां याला ध्रु० ॥ फुंकुनि कान नेलें मन ॥ माझा मजला विसर पाडिला ॥ १ ॥ ज्ञान मिलावा घालुनि नेत्रीं ॥ दृश्य दिसेना केलें मजला ॥ २ ॥ साखर नाम ठेविलें कोणी ॥ केवळ हा विषाचा प्याला ॥ ३ ॥

पद ॥ १०२ ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—नाम रामसे जादा)

विसरुनि जातां त्याला ॥ कायहो ॥ ध्रु० ॥ भवाब्धितारक सद्गुरु अवघ्या ॥ ब्रह्मादीं कोंदला ॥ कायहो० ॥ १ ॥ शमन भीति चुकवाया सौख्यद ॥ सुमति त्यजा कुमतीला ॥ कायहो० ॥ २ ॥ तत्वमसिपदां बोधी देशिक ॥ निर्गुण निज ज्ञानाला ॥ कायहो० ॥ ३ ॥ रामचंद्रसुत अद्वैतामृत ॥ याचि विचारें प्याला ॥ काय० ॥ ४ ॥

पद ॥ १०३ ॥

( राग. भूप कल्याण ताल–त्रिवट )

इतनी बिनती तुम सुन लीजो ॥ मेरे गुरु दत्तात्रय नरसिंग सरस्वती तुम करुनाकर महाराज ॥ ध्रु० ॥ सबकुं छोडके हस्त रहे तुमारे ॥ पांव छोड कहां जाऊं ॥ दुःख दरिद्र सब दूर करो तुम इतना सुखदीजो मुझकूं ॥ १ ॥

पद ॥ १०४ ॥

( राग. देस ताल–त्रिवट )

गळ्यानों गुरुला मनिं आणा ॥ जो भव चुकवुनि ॥ भजकां देतो॥ गणपति देशिकराणा ॥ गळ्यानों ॥ ध्रु० ॥ रामदास ह्मणति ज्यास लोकीं ॥ राम उपासक जाणा ॥ निर्गुणग्रामीं मठहिं जयानें ॥ रचिला गोजिरवाणा ॥ गळ्यानों ० ॥ १ ॥ भक्तशिरोमणि शोभे हाटकीं ॥ जैसा हीरकदाणा ॥ दासबोध ग्रंथावरि ज्याची ॥ निष्ठा मे परिणामा ॥ गळ्यानो० ॥ २ ॥ प्रेममुद्राम भजनीं होतो मृदंग नाद दणाणा ॥ ऐकुनिं नरनारी जन येती ॥ ज्याच्या भजनश्रवणा ॥ गळ्यानो ॥० ३ ॥ पूर्ण ज्ञानी भक्तजनीं जो ॥ व्यासचि केवळ जाणा ॥ रंगनाथ या सखा ह्मणवि परि त्या भज समता नाणा ॥ गळ्यानों ॥ ४ ॥

॥ पद १०५ ॥

(राग–खमाज.ताल–त्रिवट.चाल–भजरे भजमगुना.)

जा वेगीं शरण गुरूंसी ॥ अतिदुस्तर वैष्णविमाया ॥ ध्रु० ॥
दुर्लभ कलियुगीं सुरगण वांछिति॥मोक्षद मानवि काया ॥ जा०॥१॥
नेणुनि निजहित विषयसुखास्तव॥घालविलें वय वायां॥जा वे०॥२॥
स्त्री सुत धन लौकिक इच्छुनियां॥आर्जविसी क्षिती राया ॥जा० ३
एकाजनार्दनीं प्रेमें लीला ॥ त्रिंबक आठवि पाया जा वे० ॥ ४ ॥

पद ॥ १०६ ॥

( राग–ललत. ताल–दादरा. चाल–दे दे मुकुंदा निजचरणीं ठाव०.)

औदुंबरवासी मज ॥ तारि २ हो० ॥ ध्रु० ॥ श्रीभीमाकृष्णातटीं॥ संगमिं राहूनि निकटीं ॥ दासाचें सर्व भय वारि वारिहो॥ औदुं० ॥ १ ॥ पोटशूळ महाव्याधि ॥ भूत प्रेत समंदादि ॥ आर्तिस-मयीं दंड त्यासि ॥ मारि मारिहो ॥ २ ॥ विनवी दासानुदासा हरवी संसार त्रास ॥ कृष्णदास भविकास ॥ तारि तारि हो॥ ओदुंबर० ॥ ३ ॥

## पद ॥ १०७ ॥

(राग-गौरी. ताल-धुमाळी. चाल-भाइ हुषार रहनावे.)

आउंगा ना जाउंगा॥ गुरुके हुकुमसें मै रामरस पीउंगा॥ ध्रु० ॥ तुमहो सिताफल ॥ तुमहो नींबु ॥ तुमहो मुसलमान ॥ तुमहो हिंदु ॥ आ० ॥ १ ॥ तुम हो कुची तुम हो ताला॥ तुम हो ह-मारे घरके रखवाला ॥ आ०॥ २ ॥ तुम हो सुई तुम हो धागा ॥ तुम हो दीगांबर येक नागा ॥ आ० ॥ ३ ॥ कहे कबीर सु-नो मेरे भाई ॥ हमकु रोवे तो वाकु राम दुहाई ॥ आ० ॥ ४ ॥

## पद ॥ १०८ ॥ ✓

(राग-झिंजोटी. ताल-एका. चाल-गोकुळवासी पुतनारी.)

जा जा जा तुह्मि झटकारे गुरुपदिं जाउनि अटकारे रामरसाचा घेसिल घुटका तेव्हांच होईल सुटकारे ॥ ध्रु० ॥ नव दरवाजे खिडकारे षडचक्रावर फिरकारे ॥ तेथें खासिल गिरकी प्राण्या चिन्मयस्वरूप ओळखारे जा०॥ १॥ औटहाताचा मळारे रावति-बारा सोळारे ॥ हितार्थ त्याणें रचिला मळा अमृताचा वेळारे ॥ २ ॥ येणें ऐसें राहारे आत्मस्वरूप पाहिरे ॥ जिवाशिवाच्या होतिल भेटी शून्याचे ठाईरे ॥ ३ ॥ ऐसा होसी धीटरे उलटा मार्ग धीटरे ॥ रामदास ह्मणे गड्या मोक्षपदाची वाटरे ॥ ४ ॥

## पद ॥ १०९ ॥

[राग-परज. ताल धुमाळी.]

बाबा अहंकार निशि घनदाट ॥ गुरु वचनासी फुटली फांट ॥ माता भक्तीचे भेटली वरवंट ॥ तिनें मार्ग दाविले चौकडेगा ॥ नर हरी रामा गोविंदा ॥ ध्रु० ॥ एक बोल स्पष्ट बोलावा ॥ वाचे हरी हरी ह्मणावा ॥ संतसमागम धरावा ॥ तेणें ब्रह्मानंद होय आघवा ॥ १ ॥ आला सीतळ शांतिचा वारा ॥ तेणें सुख झालें शरिरा ॥ सुटल्या पातकाच्या धारा ॥ कळिकाळासीं धाक धरा॥गो० ॥२॥ अनूहात वाजवा टाळ ॥ अनुक्षिर गीत रसाळ ॥ अनूभव तन्मय सकळ ॥ नामा ह्मणे केशव कृपाळगा ॥ ३ ॥

## पद ॥ ११० ॥

( राग. पिलु ताल-दादरा ]

दत्ता मज तारीं तारीं ॥ दिनावरी दया करीं ॥ ध्रु० ॥ न होतांहि तत्ववेत्ता ॥ श्रमविली व्यर्थचि माता ॥ धरूनियां अहंममता॥ हिंडतसे दारोदारीं ॥ दत्ता० ॥ १ ॥ एका एका योनीप्रती ॥ कोटिकोटी फेरे होती ॥ भोगावे तें दुःख किती ॥ श्रम झाले भारी भारी ॥ दत्ता० ॥ २ ॥ भक्तकाज कल्पद्रुम ॥ पुरवी माझा सर्वकाम ॥ तुझे चरणीं राहो प्रेम ॥ दुरित नीवारीं ॥ दत्ता० ३

## पद ॥ १११ ॥

(राग.-कल्याण.ताल-त्रिवट.)

श्रीपाद औदुंबर वासा ॥ कृष्णातीर निवासा ॥ ध्रु० ॥ काषायांबर दंड कमंडलु ॥ ध्यानाती सुंदररे ॥ त्रिशुळ चक्र करीं विराजित ॥ भस्म रुद्राक्ष धारणरे ॥ श्रीपाद० ॥ १ ॥ गंगातीरीं स्नान सारी ॥ पंढरपुरिं श्रीखंडारे ॥ निद्रासन माहुरीं करी॥ भिक्षा मागत पंढरपुरींरे ॥ श्रीपाद० ॥ २ ॥ चौदा विद्या चौसष्ट कळा ॥ रिद्धीसिद्धी ओळंगतरे ॥ एकाजनार्दनीं स्मरण करितां ॥ दुःखें सर्वहि हरतीरे ॥ श्रीपाद० ॥ ३ ॥

पद ॥ ११२ ॥

(राग—कालंगडा. ताल—त्रिवट. चाल—नामरामसे.)

अवधूत निराकारी ॥ तयांची तिन्ही लोकिं फेरी ॥ ध्रु० ॥ ब्रह्मा विष्णू पूर्ण महेश्वर चैतन्याचा गोळा ॥ अवतरलासे दत्त दिगांबर त्रिभुवनिं ज्याची लीला ॥ अवधू०॥ १ ॥ प्रयागतीर्थी स्नान जयाचें करविर क्षेत्रीं भिक्षा ॥ नित्य निरंजन निर्गुणरंगीं प्रणव रूपिणी दीक्षा ॥ अवधू०॥ २ ॥ शंख चक्र आणि त्रिशुल विराजे भस्मोद्धूलित काया ॥ चतुर्वेदविध वंश लागती सदां यतीच्या पायां॥अवधू०॥ ३ ॥ तेत्तिस कोटी सुरगण मुनिजन जोडिती ज्याला पाणी ॥ कलिकाळाचा कहड चढेना सदां फकिर निर्वाणी ॥ अवधू०॥ ४ ॥ श्रीगुरुमहिमा शंकर ऊमा आनंदानें गाती ॥ सीतारामा ऐसा प्रेमा राहो निरंतर चित्तीं॥अवधू०॥५॥

पद ११३ ॥

(राग—कल्याण. ताल—त्रिवट. चाल—संत पदाची जोड.)

गुरुचे पाय मनिं ध्याऊं ॥ श्रीचे पाय मनिं ध्याऊं ॥ध्रु० ॥ पाय न येती जरि मनिं ध्यातां ॥ नामचि आह्मी गाऊं ॥ गुरुचे ॥१॥ नामहि नये जरि सर्वकाळ मुखीं ॥ पूजा काळीं पाहूं ॥ गुरुचे २ तेंहि घडेना प्रतिदिनिं जरि तरी ॥ वाडिमधें त्या राहूं ॥ गुरुचे ३ वाडिमधें त्या संसाराची ॥ काळजी आह्मि नठेवूं ॥ गुरुचे॥४॥ लक्ष्मण ह्मणें कुसुमपदद्वयें ॥ पाहिली आण पुढें काहूं ॥ गुरु ५

पद ॥ ११४ ॥

( राग—रामकली. ताल—एका,चाल—लावणीची. )

मानवा निरंतर करुनि अचल चित्ता ॥ पादुका भजत जा दत्ता ॥ ध्रु० ॥ घेतसे द्विराकृति कमल कमंडलु दंडा ॥ जो करी भजक मलखंडा ॥ आठवा हितास्तव गुरुसि नका करुं बंडा ॥ नाहिंसा करील यमदंडा॥ाहाणा त्यजिल मधुर सुधारस खंडा॥

सविजे कुलश येरंडा ॥ चाल ॥ जो वसे जवळ कृष्णेसी ॥ जो वसे ॥ संगमीं बुडवि तृष्णेसी ॥ दाखवी हरिख लोकांसी ॥ हारुनी जनांची चिंता ॥ पादु० ॥ १ ॥ बैसला गजानन निकट सुखप्रद वामीं ॥ वांछितां पुरवि जो धामीं ॥ साम रामेश्वर अमरजानदीतटि गामीं ॥ असे जो सजल विश्रामी ॥ पूजिती जटा बुध नमुनि सदा प्रति यामीं ॥ आवडी धरुनि गुरु नामीं ॥ चाल ॥ भोंवतीं कितिक संन्यासी ॥ भोंवतीं ॥ वाचिती बहुत चारितासी ॥ इच्छिल्या पुरवि आस्थेसी ॥ हरिख बहु संता ॥ पादुका० ॥ २ ॥ पाठिसी जया करि निबिड औंदुबर छाया ॥ वंदिती अमरगण पायां ॥ मायेची सुकोमलहृदय सती अनुसूया ॥ अत्रितनय तो गाया ॥ माहुरीं निजे करि आसन जी हरिमाया ॥ सेविजे मरण चुकवाया ॥ चाल ॥ आरत्या करिति त्या गुरुसी ॥ आरत्या ॥ काढिती सुजन सिबिकेसी ॥ भालचंद्र कवि पायांसी ॥ स्मरुनि भगवंता ॥ पादुका भजत जा दत्ता ॥ ३ ॥

पद ॥ ११९ ॥

(राग—कालिंगडा. ताल—धुमाळी. चाल—अष्टमूर्ति परमेश स०)

दत्तात्रय चतुराक्षरि मंत्र संतसख्यापाशीं ॥ शरण रिघोनी जरि घे तरि तुज नित्य घडे काशी ॥ ध्रु० ॥ दर्पण दाविति संत समर्थ कीं तें तत्वंपद ॥ दगड पुजावे नलगे कांहीं सहज सुखानंद ॥ दरवाजे नव बंद करावे हा मिथ्या वाद ॥ दमशम केल्या दर्शन देतो स्वामी अभेद ॥ दत्ता० ॥ १ ॥ तारक विश्वकदंबा पहातां मग कैंचो अहंता ॥ ताठा सरला जाणिव आली सहज झालि लिनता ॥ तामस हा गुण सहज निमाला मनीं आली समता ॥ तांडव करणें नलगे कांहीं अवघी गुरुसत्ता ॥ दत्ता० ॥ २ ॥ तृण जलपानीं सर्वाभूतीं भरला एकचि पवित्र ॥ त्रैलोकींचें मंडण स्वामी केवळ सत्पात्र ॥ त्रिगुण रहित निरंतर ध्यानीं

परमपार सूत्र ॥ त्रिपदा जप गायत्री करणें वेदाचें अत्र ॥ दत्ता० ॥ ३ ॥ यंत्र भूमंडळ उभारिलें हें जोडाक्षर माये ॥ एकचि असतां द्विविधा झाली साम्यातें काय ॥ येणें जाणें नलगे कांहीं अपाय ऊपाय ॥ एकचि मध्वनाथ वंदी सद्गुरूचे पाय ॥ दत्तात्रय० ॥ ४ ॥

## पद ॥ ११६ ॥

राग—कालंगडा. ताल—एका चाल—लावणीची )

बा करीं त्वरेनें भजन सद्गुरूचें ॥ जों नाहिं बोलावणें आलें यमाचें ॥ ध्रु० ॥ देह दुर्लभ नाहीं पुन्हा मिळायाचा ॥ दरवाजा जो निजसुखधामाचा ॥ हा कल्पद्रुम कल्पिलाच देहाचा ॥ तरी शाश्वत नोहे पळांत जायाचा.॥ घडि येतां काळामुखीं पडाया ॥ जरि ह्मणसि थांब तरि नाहिं रहायाचा॥चाल॥संपत्ति नको ही उधळूं फूकाची ॥ पुढें होईल दुर्धर गतेर जीवाची ॥ अनुतापाग्नीमध्यें पोळशि उगाची ॥ झडकरि करि साधन स्वहिताचें ॥ जों नाहिं बोलावणें आलें यमाचें ॥१॥

## पद ॥ ११७ ॥

( राग—परज. ताल—त्रिवट. चाल—झाला विठ्ठलसंग )

घडला दत्तात्रय संग ॥ मनिं भरला रंग ॥ ध्रु० ॥ भक्तवत्सल येतां तो हृदयीं ॥ झाला चिंताभंग ॥ घडला० ॥ १ ॥ चिन्मयमूर्ति परात्पर स्फुरली ॥ पाहुनि झालों मी दंग ॥ घडला० ॥२॥ एक चित्त तूं विकळ प्रेमाचा ॥ वाजतो जैसा चंग ॥घडला० ॥३॥

## पद ॥ ११८ ॥

(राग—खमाज. ताल—त्रिवट.चाल—वद वद वद रसने हर सांभ.)

वद वद वद मनुजा दत्तनाम वाचे॥हर हर भव आपदेसि त्यजुनि भय जनांचें ॥ ध्रु० ॥ सावध हो करिसि काय ॥ जन्म अखिल व्यर्थ जाय ॥ हरिल तो नरहरि भय॥ शरणागताचें ॥ वद वद०

॥ १ ॥ सोडुनियां लोभ सकळ ॥ चित्त करुनि परम विमळ ॥ भक्तिरसें करि तु प्रेमळ ॥ भजन यतींचें ॥ वद वद०॥२ ॥ अतिविनयें करुनि नमन ॥ अर्पुनियां हृदयसुमन ॥ दृढभावें करुनि पुजन ॥ जगद्वंदनाचें ॥ वद वद० ॥ ३ ॥

पद ॥ ११९ ॥

[ राग—काफी—ताल—त्रिवट. ]

तूं मेरे प्रानअधार ॥ गुरुजी तूं मेरे प्रानआधार ॥ ध्रु० ॥ नमस्कार दंडवत भजना ॥ अनक बार उबार ॥ गुरुजी० ॥ १ ॥ सुखदुःख मनकी सबहिबर्था ॥ तुजही आज्ञासार ॥ गुरुजी० ॥ २ ॥ तूं मेरे पाठबळ बुद्धबळ तुमही ॥ तूं मेरे परवार ॥ गुरुजी० ॥३॥ जे तुम करो सांई फळ मेरो ॥ पेखनान गुरुचरणार ॥ गुरुजी० ॥ ४ ॥

पद ॥ १२० ॥

( राग—काफी. ताल—त्रिवट. )

अनाळस गुरु तुज भजावें ॥ ध्रु० ॥ नित्य भजावें नित्य नमावें ॥ नित्य शरण तुज जावें ॥ तव पदकमळीं मन अलिसम दीजे ॥ आनंदांत रमावें ॥ अनाळस० ॥ १ ॥ नश्वर येथें सौख्यें सकळही ॥ हें पुरतें समजावें ॥ भक्तिलतेचें दत्ता माझ्या ॥ चित्तीं बीज रुजावें ॥ अनाळस० ॥ २ ॥

पद ॥ १२१ ॥

(राग—कल्याण.ताल—धुमाळी. चाल—क्षणभंगुर.)

भावें करूं भजना ॥ दत्ताच्या भावें करूं भजना ॥ ध्रु० ॥ नामस्मरणें दीन सख्या त्वां॥तारियलें दुर्जना ॥ कोण तुझ्यासम हृदयारामा ॥ योग्य असें वंदना ॥ भावें० ॥ १ ॥ भक्तांच्या बा संकटिं धांवुनि ॥ करिसी तूं अवना ॥ ऐसा तूं रे दयाळु दत्ताचा देवा सुखसदना ॥ भावें० ॥ २ ॥

# देवीचीं पदें

## पद ॥ १ ॥

( राग–मुलतानि. ताल–एका. चाल–म्हाणी म्हाणी. )

आदिमाया मूळ निवृत्ती कळारे ॥ प्रणवरूपिणी वेल्हाळा पाहों डोळारे ॥ ध्रु० ॥ जिचें रूप साजिरें शोभे पूर्णरे ॥ दृष्टी होईल उतरा लिंबलोण ॥ आ० ॥ १ ॥ जिच्या दंतपंक्तीचा झळके रंग ॥ तिकडे पाषाण होती पद्मराग ॥ आ० ॥ २ ॥ दया घांट ल्याहालिस निजमाये ॥ भक्तिकंकण मणगटीं शोभताहे ॥आ०॥३ पाई विरवल्या मुरडिव वाक्या ल्यालीरे ॥ गोट पैंजण घालुनि रंगा आलीरे आ० ॥ ४ ॥ ब्रह्मानंद अक्षय अभंग पूर्ण ॥ श्रीधरासी शिकवी स्तनपानारे ॥ आदिमाया० ॥ ५ ॥

## पद ॥ २ ॥

( राग–परज. ताल–त्रिवट. )

महालक्ष्मी निज दर्शन दे मज ॥ होय सुख सहज आत्मनिरीक्षणीं ॥ महा० ॥ ध्रु० ॥ तूंचि जिवलगा जीवन त्रिजगा अखंड सुभगा सदसद्विलक्षणी ॥ महा० ॥ १ ॥ असुनिं निराकृति चतुर्भुजाकृति ॥ मूर्ति तुझी भजकांसि सुरक्षणीं ॥ महा० ॥ २ मातुलिंग विज्ञानगदाधृती ॥ खेट निजानुसंधान क्षणक्षणीं ॥ महा० ॥ ३ ॥ अद्वय ब्रह्मानंद प्राशनपात्र ॥ करीं बिभ्रती श्रीकमलेक्षणीं ॥ महा० ॥ ४ ॥ चतुरायुधवती श्रीविष्णुयुवती ॥ कृष्ण जगन्नाथ पदीं लीन स्वमोक्षणी ॥ महा० ॥ ५ ॥

## पद ॥ ३ ॥

( राग–झिंझोटी. ताल–एका. भज भज भवजल. या चालीवर. )

शिवद असो सतत सती ॥ पार्वती तुझाला ॥ ध्रु० ॥ उत्सुकता हृदयिं धरुन ॥ त्वरित जरी जाय सजुन ॥ परि फिरली

लाज त्यजुन ॥ प्रथम संगमाला ॥ शिव०॥१॥ सखीजनें शिकवूनी पळ ॥ पाठविली स्वपतिजवळ ॥ पाही तद्वदन कमळ ॥ प्रीति भयें बाला ॥ शिव० ॥ २ ॥ हसत शिवें प्रेमबळें ॥ आलिंगन घट्ट दिलें ॥ देहपुलक धर्मजलें ॥ जिचा व्यापियेला॥शिव० ॥ ३ ॥

## पद ॥ ४ ॥ ✓

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. चाल–संत पदा. )

श्रीकामाक्षी नमूं निरंतर ॥ भावें चरणीं रमूं ॥ श्री० ॥ ध्रु० ॥ सार नसुनि संसारसुखी या ॥ काया अहर्निशी श्रमूं ॥ निं०॥१॥ अपार भवनिधि पार कराया ॥ साधनि बहु किति दमूं ॥नि०॥२॥ कृष्ण जगन्नाथ ह्मणे हित हें ॥ सांडुनि न उगी भ्रमूं ॥नि०॥३॥

## पद ॥ ५ ॥

( राग–मुलतानि ताल–धुमाळी )

आदि निर्गुण प्रगटली भवानी ॥ मोहमैसासुर मर्दना लागूनी ॥ त्रिविध ताप करावया झाडणी ॥ भक्तालागीं पावसी निर्वाणी ॥१ अइचा जोगवा जोगवा मागेन ॥ ध्रु० ॥ द्वैत सारून माळ मी घालीन ॥ हातीं बोधाचा झेंडा मी घरीन ॥ भेद रहित वारीसी जाईन ॥ १ ॥ पूर्ण बोधाची भरीन मी परडी ॥ आशा मनीशाची पाडीन परवडी ॥ मनविकार करीन कुरवंडी ॥ अद्भुत रसाच्या भरीन दुरडी ॥ २ ॥ नवविध भक्तीचा करोनि नवरात्रा ॥ करोनि पोटीं मागेन ज्ञानपुत्रा ॥ सांडुनि अंतरी सद्भावीच्या मित्रा ॥ दंभ सासरा सांडीन कुपुत्रा ॥ ३ ॥ आतां साजणी झालें मी निःसंग ॥ विकल्प सोयऱ्याचा सोडियला संग ॥ काम क्रोध हे झोडियेले मांग ॥ लोभ कळा मारग सुरंग ॥ ४ ॥ आईचा जोगवा मागुनी ठेविला ॥ जाउनि महाद्वारीं नवस म्यां फेडिला ॥ एक एक पण जनार्दन वळखिला ॥ जन्म मरणाचा फेरा चुकविला ॥ ५ ॥

## पद ॥ ६ ॥

( राग—कालंगडा. ता० धुमाळी. )

ब्रह्म कुमरी वाग्देवी ती सरस्वती पावो ॥ चरणाश्रय तो सौख्यद जीचा भक्त मनी भरवों ॥ ध्रु० ॥ जलधी कैसा होई दुःखद सांगे यादांला ॥ त्वच्चरणाचा धीरचि माते आहे दासाला ॥ तव प्रसादे उल्लंघतीगे पंगू ते गिरिला ॥ तेवी जन मन रंजनि सादर यत्न हाचि होवो ॥ ब्रह्म० ॥ १ ॥

## पद ॥ ७ ॥

(राग—देस. ताल—धुमाळी.)

हरिच हे जगदंबा ह्माळसा॥नको विसरु मानसा ॥ ध्रु० ॥ जे दिसा शिवा प्रति पिसा करुनि दशा दिशा फिरवी घारसा ॥ हरिच हे० ॥ १ ॥ सुरासुर मिळुनि समुद्र मथितां ॥ धरी मोहिनी ठसा ॥ उभय पंक्तिनें बसा ह्मणुनि ॥ वाढिते अमृत पस पसा ॥ हरि० ॥ २ ॥ चंद्र-सुर्य-मध्यस्थ होय खळ ॥ राहु दनुज देवसा ॥ जसा निरखिला तसा तेक्षणीं ॥ उडवि चक्र तद्घसा ॥ ह० ॥३॥ मनीं अपेक्षित जसा तेक्षणीं॥ देह धरि तसं तसा॥असा विठ्ठलीं प्रसाद कर असतां॥ कोठु नियां वसवसा॥४॥

## पद ॥ ८ ॥ *

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—अष्टमूर्ति परमे .)

शिवदायक ती जनास होवों हिमनगजा शंकरपत्नी ॥ भक्तांच्या रक्षणीं दक्ष जीं नमन करूं तिज कर जुळुनी ॥ ध्रु० ॥ विवाह कालीं व्याकुल होई होम धूम लागुनि नयनीं ॥ हर्ष पावली पुढें स्वांतरीं शिव शिर्षी शशि देखोनीं ॥ ब्रह्मा देखुनियां जवळी करि वदन खालतें लाजोनीं ॥ पदनखमुकुरी हर शिरि गंगा ॥ धरितां देखें जी नयनीं ॥ सवत भाव उपजुनि त्या योगें.॥ खिन्न

जहाली जी स्वमनीं ॥ रोमांचित तनू जिची जाहली ॥ स्पर्श शिवाचा होवोनीं ॥ शिव दायक ती० ॥ १ ॥

## पद ॥ ९ ॥

( राग–खमाज–तालझुमाळी चाल–गझ्यानो )

अंबिके माते भवानी ॥ त्रिभुवन वंद्ये भवहरिणी ॥ ध्रु० ॥ दैत्यमर्दनि जगज्जननी ॥ विनवीतें कर जोडोनी ॥ दीन अनाथ ह्या विपिनीं ॥ पडिलि संकटीं तव भगिनी ॥ तारिं तारिं ती येवोनी ॥ तुजविण त्राता नाहिं कोणीं ॥ अंबिके० ॥ ९ ॥

## पद ॥ १० ॥

( राग–कालंगडा. झुमाळी.अष्टमूर्ति परमेश० या चा०

रघुकुल वंद्ये पवित्र गंगे असों नमन हें तुला ॥ तव प्रसादें भगिरथ उद्धरी आपुल्या पितरांला ॥ ध्रु० ॥ सगर अश्वमेधास्तव सोडी भूवरी अश्वाला ॥ जाइल निजपद जाणुनि ऐसें तो इंद्रें हरिला ॥ तच्छोधास्तव भगिरथ पूर्वज भेदिति वसुधेला ॥ तैं कपिलमुनीचें तीव्रतेज तें भस्म करि त्याला ॥ तेव्हा भगिरथें तप करूनी बहू प्रसन्न करि तुजला ॥ तेणें पावन करिशी तयांच्या दीर्घदग्धतनुला ॥ रघु० ॥ १ ॥

## पद ॥ ११ ॥

( राग–कल्याण–ताल–त्रिवट. )

तव पदीं कन्या नमीतसे अंबे ॥ ध्रु० ॥ चराचरीं जग व्यापक असुनी ॥ पालन करसी कुटुंबें ॥ १ ॥ सत्य असे जरी सांग परोपरी ॥ व्यर्थ पती कां विटंबे ॥ २ ॥ पति तर रणशूर दानव थर थर ॥ कांपति फार कदंबे ॥ ३ ॥ वंद्य पिता जरी निंद्य करी परी ॥ काय करूं जगदंबे ॥ ४ ॥ दुर्मरणें निंद्य मोक्ष विराला ॥ सत्वर तार सदंबे ॥ ५ ॥

## ॥ पद १२ ॥

(रागजोगी. ताल-धुमाळी.)

भगवती हे वसुंधरे तूं किती निष्ठुर अससी ॥ विपत्ति अपुल्या प्रियकन्येची सोसिलीस कैसी॥ध्रु० ॥ गंगा अरुंधति रवि वन्ही वसिष्ठादि मुनिसी॥शील जिचें श्रुत असुनि असें कां दूषण हें तिसी॥१॥

## पद ॥ १३ ॥

[राग-झिंजोटी-ताल-दादार. चाल देवी श्री व्हिक्टोरिया.)

देवी वीरश्री तूंगे संकटें हरी॥ निपजो तव भक्तचि बहू आर्य भूवरी ॥ ध्रु० ॥ झाली अन्नान्नदशा नीतिच्या जनी ॥ नूतन अरि त्यास देति कष्ट यातना ॥ अर्जवि जना साठविती स्वस्थ बहु धना ॥ ईशा ऐशा मेषां दंडषि करी, शस्त्र तूं धरी; प्रेमल, हरी, सुटति अंतरीं ॥ देवी० ॥ १ ॥ तुजवांचुनि कोण अह्मां अन्य कीं असे॥पहासी किति अंत घोर दुःख होतसे॥ सुखवी, मुकवी, चुकवी, मंदहि स्थिती दुःखद अती, दुष्ट जिंभती, धन्य सुंदरी ॥ देवी० ॥ २ ॥ होवो आनंद जगीं ऐक्य वाढुनी ॥ वाढों उद्योग कला विविध निपजुनी ॥ संपत्ती येऊं येथ परद्विपाहुनी ॥ झाडी; काढी, ताडी, पापाला, दुःखाला, दुर्मतिला, ही कृपा करी ॥ देवी० ॥ ३ ॥ झडकरि करि षडरी दमन; एक क्षण तरी ॥ सांडुनियां विषय वमन; हे मना स्मरी ॥ जग त्राता धीर पदा या भवांतरीं॥सुरसे, खासे, व्हीं, असे, भजनाला; स्मरणाला, नमनाला, मुखीं वैखरी ॥ देवी० ॥ ४ ॥

## पद ॥ १४ ॥

( राग-जिल्हा ताल एका चाल-नको नको त्रिसंग नाम. ]

धांव पाव भेट मला ब्रह्मनंदने ॥ तुजविण मज कोणि नसे असुरकंदने ॥ ध्रु० ॥ सुखकर वर देउनियां रक्षि कीं मला ॥ बुद्धिलेश नाहीं यास देइं सुमतिला ॥ पंगु मुके चढति 'गिरी

वदति वाणिला ॥ त्वद्वरदाहि कालिदास कवी जाहला ॥ १ ॥ नील शाल मुक्त माल कुंकु शोभला ॥ सुरवर नर सर्व असे ध्याति तूजला ॥ भक्त जना तोषविसी मतिस देउनी ॥ आठवि तुज दास मनी हेंच ऐकुनी धांव० ॥ १ ॥

पद ॥ १५ ॥

( राग—मुलतानी ताल—धुमाळी. )

ते माय माझी हो । आवडे सांभा ॥ ध्रु० ॥ महिषासुर खल शुंभा लागुनि नयनी ॥ विषय कुसुंबा पाजुनि निवटी आपण धरी कुसुंबा शेला ॥ नेसुनि कडे घेई हेरंबा ॥ आवडे० २॥ चित्सौंदर्या चंबा नयनी चुंबाया हृत्संबा वरिली ॥ बिंबा पृथुलनित बावरि पट नेसलि खंबाइत अंबा ॥ आवडे०. ॥ २ ॥ अमृत मनोरथ फळला अंबा निंबाहूनिकडे भव तरला ॥ घ्या हो सकल विलंबा सांडुनि ॥ दैवत हे अवलंबा ॥ अंबा आवडे सांभा ॥ ३ ॥

पद ॥ १६ ॥

(राग—देस. ताल—धुमाळी.)

तुज विनविती प्रजापतितनये अतिविनये नमुनी नये ॥ ध्रु०॥ वाणीचें दैवत तूंचि लावण्याची ॥ खाणी बहु लेणी ही लेउनि वीणा पुस्तक धरुनी सदा हंसासनीं विराजसी ॥ १ ॥ सत्य लोकवासिनी ते प्रणवस्वरूपिणी ॥ अज्ञानबीजनासिनी गायन वदनीं करुनी स्वानंद वनि वससी ॥ २ ॥ मी तूझें अज्ञान बाळ॥जननि तूं माजि केवळ होउनी कृपाळ हारी यश ते रसाळ बोलवी सदा मजसी० ॥ ३ ॥

पद ॥ १७ ॥

( राग—कल्याण. ताल—दादा. चाल—पवनतनय परम वि० )

पाही पाही अंबिके विलंब केवि केला पदसरसिजसुरस पाजि जीवऱ्हा भुकेला ॥ ध्रु० ॥ कामिनि हिरण्य चिंतनात काम गाजे॥

बोलणें उणें नसाय कोप नोहे राजे ॥ १ ॥ कोणि सत्पुरुष भेटवुनी मला देई ॥ कोणत्या तरी प्रकारें सेवनासि नित्य घेई ॥ २ ॥

पद ॥ १८ ॥

( राग—भूप. ताल—त्रिवट. )

येई शारदे ब्रह्मनंदिनी दिन रजनि पद नमुनि ॥ तव सज्जन र हाति जनीं विश्ववंदिनी ॥ ध्रु० ॥ तव मुखाप्रति रवींदु लाजती हैमवति रमासति रतिहि नति तुज करिती रूप चांगलें त्या वरि भले अलंकार रत्नहार दिव्यकार तेज अपार मार मोही नीं हंसवाहिनी ॥ १ ॥ किरिट कुंडलें वदन शोभलें केशभार बद्ध कबर मुक्तहार वेद चार पारंगे तुला स्तवितसें मला त्वरित पाव घेई धांव दे प्रभाव या नारायणात्मजा मनि दंतवंदिनी ॥ २ ॥

पद ॥ १९ ॥

( राग—ब्याहाग. ताल—त्रिवट. )

नमामी महिषासुर मर्दिनी महा मानि महिषा सुर मर्द्दिनी ॥ ध्रु० ॥ महिषा मस्तक नरक भेदन विनोदिनी मोदिनि मालिनि मालिनि प्रणतजनसौभाग्यजननि कात्यायनि नारायणी ॥ महिषासुर० ॥ १ ॥ सत्य प्रतापिनि मिथ्या विनोदिनि भाग्य वरदायिनि अखिल लोक सदा नमिति कंकणालंकृत जननी ॥ २ ॥ अंड पिंड ब्रह्माड मंडळ दंडिनि प्रचंडी निमानि मालिनि पालिनि पंच गंगा प्रति भीनी कोलापुरवासिनी कोण क्षत्री कमलालंकार धारिणी ॥ ३ ॥

पद ॥ २० ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळी. )

अंबे उबग कसा धरिला ॥ सदये गणपतिचा ॥ ध्रु० ॥ संवित्स्वपुषा अखिलाधार ॥ करिसि श्रुष्टिस्थिति संहार ॥ हरिहर ब्रह्मां तव कुमार ॥ नेणती पार लीलेचा ॥ अंबे उबग० ॥ १ ॥ नमुनि

## पद ॥ २६ ॥

[राग—अडाणा. ताल—त्रिवट.)

भेटेल कधिं जगदंबा जय अविलंबें देउनि न विलंब नेइल चरणांबुजिं मजला ॥ ध्रु० ॥ हर हरे आठ प्रहर विहरलों ॥ जगतजननीपद समज विसरलों ॥ सदयत्त्वमयमय सुदय भवमय हरविल श्रम हे॥ भेटेल०॥१॥ सुदिनसमय कधिं उदित मुदित मज॥ विदित होईल भवनदिस्त्वहितभय ॥ उत्तमपुरुषगम सकलुषमतिभ्रम हरविल श्रम हे ॥ भेटेल क० ॥ २ ॥

## पद ॥ २७ ॥

(राग—कालिंगडा. ताल—त्रिवट.)

महाराज भवानी ॥ ब्रह्मभुवनकी रानी ॥ ध्रु० ॥ आगे शंकर तांडव करता है ॥ भाव करत शुलपानी ॥ महा० १ ॥ सुरनर गंधर्वकी भीड भईहै ॥ आगे खडा दंडपानी ॥ महा० ॥ २ ॥ सूरदासप्रभु पलपल निरखत ॥ भक्तवत्सल जगदानी ॥महा॥३॥

## पद ॥ २८ ॥

(राग—परज. ताल—धुमाळी.)

लक्ष्मी जगदंबा जगदंबा ॥ मम कुलदैवत अंबा ॥ ध्रु० ॥ शाम चतुर्भुज मूर्ती ॥ दोहीं डोळां भरली पूर्ती ॥ लक्ष्मी० ॥ १ ॥ सच्चित्सुखमुळमंत्री ॥ व्यापकबिंदू सोहंसूत्री ॥ लक्ष्मी० ॥ २ ॥ सबाह्य अंतरसाची ॥ मूर्ती ओतिलि ब्रह्मरसाची ॥ लक्ष्मी०॥३॥ शिवदिन बालक पाळी ॥ केशरी मळवट भव्य कपाळीं ॥लक्ष्मी०॥

## पद ॥ २९ ॥

(राग—भैरवी. ताल—धुमाळी.)

धांवगे अंबाबाई ॥ दीन सज्जनाचे आई ॥ तुझिया पायांवीण ॥ जिवा विश्रांति नाहीं ॥ धांवगे० ॥ ध्रु० ॥ स्वरूप तूझें पाहातां॥ मन तन्मय झालें ॥ ब्रह्मादिक सर्व सिद्ध ॥ शरण तुजलाची

आले ॥ थोरावरी करिसी दया ॥ दीन काय वायां गेले॥ धांवगे० ॥ १ ॥ स्वशूर पुत्र दोघे ॥ कवण्या हेतूनें निमाले ॥ नकळे वृत्त कांहीं ॥ अंबे आजि वांयां गेले ॥ स्वमुखें वृत्त मजला ॥ सांगे नेत्रीं जळ आलें ॥ धांवगें० ॥ २ ॥ तुझिया औदार्याचा ॥ पार न लागे साचा ॥ वर्णितां सर्व थकले ॥ पुरल काय माझि वाचा ॥ अभागी मी ह्मणुनि त्वांही॥सोडियला दास साचा ॥ ३॥

पद ॥३०॥

(राग–तोडी. ताल–धुमाळी.)

अंबे अजुनि कां न होसि जागी ॥ निष्ठुरता त्यागीं ॥ श्रमलें यास्तव प्रार्थितसें तुजलागीं ॥ व्हावें अनुरागी ॥ ध्रु० ॥ माते कां घालुनिया संसारीं ॥ हांसविशी सारी ॥ लज्जा कवणाची जननि विचारी ॥ कां पडसि विचारीं ॥ अंबे० ॥ १ ॥ उठवीं मत्पुत्रा जननी हातें ॥ उचित न हा हातें ॥ कन्या रामाची नोवरि त्यातें॥ स्मर निजजननातें ॥ अंबे० २ ॥ ऐकें हे विनती नगवरबाळी ॥ बिरुदातें पाळीं ॥ घालीं सदये निज सौख्यसुकाळीं ॥ भास्कर सुत पाळीं ॥ अंबे आ० ॥ ३ ॥

पद ॥ ३१ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल– बहु धीर आरनदीती. )

तु विटेवरी सखये बाई हो करि कृपा ॥ माझें मन लागो तुझ्या पाई हो करि कृपा ॥ तु सांवळे सुंदरी हो करि कृपा ॥ लावण्य मनोहारि हो करि कृपा ॥ निजभक्त करुणा करिहो करि कृपा ॥ ( चाल ) पंढरपुरीं राहिली ॥ डोळा पाहिली ॥ संतें देखिली ॥ वरून विठाइ, वरून विठाइ ॥ सच्चिदानंदे अंबाबाइ करि कृपा ॥ करी कृपाउजळकुळ दिपा, बोध करीं सोपा ॥ येउनी लवलाई, येउनी लवलाई ॥ सच्चिदानंद अंबाबाइ हो करी कृपा ॥ १ ॥ तुझा देवारा मांडिला हो करि कृपा ॥

चौक आसनी कळस ठेविला हो करि कृपा ॥ प्रेम चांदवा वर दिधला हो करि कृपा ॥ ज्ञान गादी दिली बैसावया हो करि कृपा ॥ वर बसविली आदि माया हो करि कृपा ॥ प्रेम पुष्पें आणिली पुजावया हो करि कृपा ॥ ( चाल ) काम क्रोध मदमत्सर ॥ दंभ अहंकार ॥ त्याचे बळ फार ॥ सर्व सुख देई, सर्व० ॥ सच्चिदानंदे अंबाबाई० करि कृपा, उजळकुळ दिपा, बोध करि सोपा, येउनी लवलाई, येउनी० ॥ सच्चिदानंदे अंबाबाई० ॥ २ ॥ शुक सनकादिक गोधळीं हो करि कृपा ॥ नाचताति प्रेम कल्होळी हो करि कृपा ॥ उदे उदे शब्द आरोळी हो करि कृपा ॥ पुढें पुंडलीक दिवटा हो करी कृपा ॥ त्यानें मार्ग दाविला निटा हो करि कृपा ॥ आई दाविली मूळपीठा हो करी कृपा ॥ ( चाल ) बाइ रखुमा देवी वरु, सूख सागरू, त्याला नमस्कारू सर्व सुख देई, सर्व० ॥ सच्चिदानंदे० ॥ करी कृपा, उज़ळकुळ दिपा, बोध करी सोपा, येउनी लवलाई, येउनी० सच्चिदानंदे अंबाबाई हो करी कृपा ॥ ३ ॥

# रामचरितसंबंधीं पदें.

## पद ॥ १ ॥

( राग—कल्याण. ताल—धुमाळी. )

कपींद्रा सुखी असे कीं षड्गुण—तरु—आराम ॥ सबांधवराम ॥ कपींद्रा ॥ ध्रु० ॥ कनककुरंगा पाठीं श्रमले ॥ प्रभु सर्वज्ञ काम ॥ मजसाठीं ॥ प्रभु० ॥ क० ॥ १ ॥ निजकांतेतें दुष्टें हरिलें ॥ स्मरतो कीं मंगलधाम ॥ केंव्हां तरी ॥ स्म० ॥ क० ॥ २ ॥ सौमित्रा दुर्वाक्यें च्छळिलें ॥ त्याचा हा परिणाम ॥ भोगितें ॥ त्या० ॥ क० ॥ ३ ॥ मज विरहित त्यां चिंता कैची ॥ अखिललोक अभिराम ॥ सख्याला० ॥ क० ॥ ४ ॥ ॥ त्र्यंबकभंगी एका जनार्दना ॥ करिती विबुध प्रणाम ॥ निरंतर ॥ करिती० ॥ क० ॥ ५ ॥

पद ॥ २ ॥

(राग–पिलु जिल्हा. ताल–धुमाळी.)

सुखी कीं राम राजा ॥ सखे सांग मुद्रे ॥ ध्रु० ॥ मी येक पापिणीगे ॥ मुकलिसें रामपाया ॥ परि तुवां कैसा त्यजिला॥ सखा राम माझा ॥ सु० ॥ १ ॥ गांजिति राक्षसी ह्या ॥ परि तें मीं सांगुं कायी ॥ विसरलें दुःख सारें, तुझिया दर्शनें ॥ सु० ॥ २॥ राम मनि राम ध्यानी ॥ वचनिंहि चापपाणी ॥ पंत विठ्ठलाख्यकविची॥एषा हि पूजा ॥ सुखी० ॥ ३ ॥

पद ॥ ३ ॥

( राग. जोगी–ताल–धुमाळी. )

रामा हे तव नेत्रांतुनि कां ॥बाष्पबिंदू गळती ॥ विस्तृत होउनि जणूं सांचले ॥ तडाग महिवरती ॥ ध्रु० ॥ दुःखाचे बहु वेग तुवां जरी ॥रोधियलें चित्तीं ॥तरि दाटुनि उर येतां सहजची ॥ बाहेर ते निघती ॥ रा० ॥१॥ त्वदधर नासा पुढें क्षणोक्षणी ॥ मंद मंद स्फुरती ॥ तेणें जन तूं दुःखित ऐसा ॥ संशय मनिं धरिती ॥ रा० ॥ २ ॥

॥ पद ४ ॥

( राग. लीलांबरी ताळ–दादरा. )

जयतु जयतु रामभद्र दीनवत्सला ॥ इष्टहेतु तव प्रसादें पूर्ण जाहला ॥ ध्रु० ॥ वांचविसी देउनियां अभय त्या मुला ॥ दंडुनियां तनुवैभव देसि तूं मला ॥ चरणीं ह्या लीन असे दास आपुला ॥ घालवि तव हस्तें मरण सकल विपत्तिला ॥ जयतु० १

पद ॥ ५ ॥

[ कर्नाटकी चालीवर. ]

निजमख रक्षाया कौशिक नेई सौमित्र रघुराया ॥ एक शरें पंथिं वधुनी टांकियली रामें राक्षसी विकाळवदनकाया ॥ ध्रु० ॥

राजीवनयन करी चकीत सारी ॥ जाउनी जनकपुरी शिवध-नु भंगुनी ज्यानकी वरीली परशुधरा लावी शिर नमवाया ॥ र-घुकुळ मुगुट मणि शुराग्रहणी बसतां कतु रक्षणी बहू रक्षोगण वक्ष विदारूनी उद्धरली गौतममुनीवरजाया ॥ १ ॥

॥ पद ६ ॥

( उत्तररामचरित्र. राग–मुलतानि. ताल–धुमाळी. )

जानकिचें मन शांत कराया रामचंद्र झडकरी ॥ जातसे निघुनि अंतःपुरीं ॥ ध्रु० ॥ सह परिवारें निज कन्येला भेटुनि मिथिला प-ती ॥ गेला विदेह नगरा प्रती ॥ त्यांच्या विरहें वैदेही मनीं हो-य दुःखिता अती ॥ नयनीं अश्रुपूर वाहती ॥ असतां धर्मासनीं रघुपति हें ऐकुनियां अंतरीं ॥ ह्मणे हा स्वजन मोह किति तरा जानकि० ॥ १ ॥

पद ॥ ५ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. चाल–माझा कृष्ण देखि )

माझा भरत देखिला काय ॥ कोणी सांगा हो॥ ध्रु० ॥ शोभे गौर वर्णी काय ॥ कैकयी ते ज्याची माय ॥ जो रामाचा बंधूराय॥ वंदिति पाय जन ज्याचे ॥ माझाभ ० ॥ १ ॥ ज्याला ह्मणती सर्व नृपाळ॥ तो अनशनींच नेतो काळ ॥यास्तव वाटतसे हळह ळ ॥ ठेवित माळ मजचरणीं ॥ मा०॥२॥ मस्तकिं वागवि जटा भार ॥ सुटला मजसाठी संसार ॥ प्रेमाबाईवर उपकार ॥ होइल फार भेटीचा ॥ मा० ॥ ३

पद ॥ ८ ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. )

शिव शिव काय ह्मणावें हीला ॥ विपरित ऐशा कर्मगतीला ध्रु०॥ निज राज्यासन निरखुनि पुत्रा ॥ पूर्वज धरिती ज्याला ॥ बाळ पणीं धरी राघव ऐशा ॥ अरण्यवासव्रताला॥ विप० ॥ १ ॥

पद ॥ ९ ॥

( राग-गौडी. ताल-धुमाळी. )

मंद अभागि मी ऐसा॥सुखी होय कसा ॥ ध्रु० ॥ राजश्रीच्युत झालों ॥ विपिनासी आलों ॥ परि तें मी सीता योगें ॥नाहीं स्मरलों ॥ त्याहि तशा देवीला ॥ कैसा मुकलों ॥ मंद० ॥ १ ॥ त्या विरहींच मरावें ॥ परि कां चुकलें ॥ होते बंधु सुहृत्तम ॥ मगया अमले ॥ होते हे डोळ्यांचे ॥ सोहळे उरले, ॥ रक्षुनि बहुधा मजला ॥ बहु धैर्य दिलें ॥ मंद० ॥ २ ॥ ह्मणत मी होतों याच्या ॥ भुजशक्तिवरी ॥ दुष्ट शिरोमणि रावण ॥ मारिन समरीं ॥ अंकीं घेइन पुनरपी ॥ क्षितिची कुमरी ॥ अर्पिन राज्य बिभिषणा ॥ निज भक्त करीं ॥ मंद० ॥ ३ ॥ बा सखया सुग्रीवा ॥ तुज कष्टविलें ॥ ॥ तूंही श्रम बहु केले॥परि नाहि फळलें ॥ पाहुनि लक्ष्मणगतिला ॥ हृदय उललें ॥ कैकइ- नवस शताऽवधि ॥ आज बा पुरले ॥ मंद ॥ ४ ॥ तूं तरि वृथा कारे मरसी ॥ मम मित्रवरा ॥ यश कोठुनियां हा मी ॥ दुर्दैवी पुरा॥ तूं तरि सुखी असे बा ॥ जा निज-नगरा॥ लक्ष्मणवत् गति माझी॥ हा निश्चय खरा ॥ मंद० ॥ ५ ॥ सर्वहि पूर्वज-कीर्ती ॥ बा मी माळविली॥ सून सुमित्रेचीहि उगि नागविली॥ जन्मुनि मी कौसल्या वृथा भागविली ॥ तत्पदिं विठ्ठलपंतें मति वागविली ॥ ६ ॥

पद ॥ १० ॥

( राग-धनाश्रीचा जिल्हा. ताल-धुमाळी. चाल-कंकण नमुटे रामाला. )

जन्मुनी रविवंशीं ऐसा ॥ झालों निर्दय मी कैसा ॥ ध्रु० ॥ जी ही शोभा सदनाची ॥मूर्तिच केवळ मदनाची ॥ विश्रांति मम हृदयाची ॥ माझी प्राणसखी साची ॥ तिजला घालितसें फासा ॥ झालों निर्दयमी कैसा ॥ १ ॥ यावा बळी राक्षसाला ॥ तैसा टाकितसे हिजला ॥ नाहीं लाज दया मजला॥ करणया कर्म असें

सजला ॥ झाला नसेल कोणि ऐसा ॥ झालों निर्दय मी कैसा ॥ २ ॥

पद ॥ ११ ॥

[ राग. धनाश्रीचा जिल्हा. ताल—धुमाळी चाल—कंकण न सुटे रामाला

पडलें संकट स्वामीला ॥ भाउजी स्वस्थ कसे बसलां ॥ ध्रु० ॥ कांचनमृगा मागें गेले ॥ हिंडतां वनीं बहू श्रमले ॥ येतां दुष्टें विघ्न केलें ॥ ह्मणवुनि तुह्मांसि बाहिलें ॥ आतां वनिं जाऊनी रक्षावें त्याला ॥ भावोजी० ॥ १ ॥ मृग तो मायावी दिसतो ॥ रामें वधितां ओरडतो ॥ दुष्टासंगें समर करितो ॥ विजयी दाशरथी होतो ॥ न रुचे परि हें जानकिला ॥ भावोजी० ॥ २ ॥ तुमच्या मनीं असें होतें ॥ राघव वनासि जाईतें ॥ त्याचा नाश होइल तेथें ॥ ह्मणजे भोगावी मातें ॥ तुमच्या मनिंचा भाव कळला मजला ॥ भावोजी० ॥ ३ ॥ दुष्टाच्या पद मंदिरा ॥ पतीच्या वेचणार खर्चणारा ॥ मजवरतीं हेतु तुझा सारा ॥ मी तर रघुपतिची दारा ॥ कैची प्राप्त होईन तुजला ॥ भावोजी० ॥ ४ ॥ स्वरुपीं सुंदर मी जाया ॥ कशिरे पाहासी भोगाया ॥ मी तर रघुपतिची जाया ॥ प्राणच देइन या ठायां ॥ उठि उठि लवकर उशिर बहु झाला ॥ भावोजी० ॥ ५ ॥ ऐकुनी अशा दुरुक्तीला ॥ लक्ष्मुमण दुःखित बहू झाला ॥ सोडुनि वनीं एकटीला ॥ रामा मागें तो गेला ॥ मग नेई रावण सीतेला ॥ भावोजी० ॥ ६ ॥

पद ॥ १२ ॥

( राग—केदार. ताल—त्रिवट. )

कौसल्या ह्मणे बा रामा नको वना जाऊं जाऊं ॥ माझीयारे तान्ह्या बाळा तुला कोठें पाहुं पाहुं ॥ ध्रु० ॥ अयोध्या ही ओस पडली तुजविण आजि रामा ॥ मला गमेना कीं कांहीं साधू मन—विश्रामा ॥ भावणारी मूर्छित पडका आग लागो तुझ्या

कामा ॥ किती तुझ्या मागें मागें कोठवरी धावूं धावूं ॥ कौ० ॥ २
हरणीचें पाडस वनीं चुकलेंगे बाइ बाई ॥ तैसें मन झालें रामा
रडतें धाई धाई ॥ नको आतां टाकुन जाऊं मजकडे पाहिं पाहीं ॥
तुजसाठीं रामा आजी विष कीं मीं घेऊं घेऊं ॥ कौस० ॥ ३ ॥
स्तनीं फुटलासे पान्हा बाळा जवळि येई येई ॥ किती कष्टविशी
मजला सुखीं गृहीं राहीं राहीं ॥ त्यजुनियां राज्य ऐसें वनीं
कांहीं नाहीं नाहीं ॥ कैकयिचे सदनीं कैसी एकटि मी राहुं
राहूं ॥ कौस० ॥४॥ सिताहिं स्वरूपानें अति सकुमार खाणीं ॥
खडे रुचतिल तिजला वनीं माझे माय बहिणी ॥ तृषाकांत झा-
ल्ये रामा उभा रहा पाजं पाणी ॥ चतुर्दश वर्षे दुःख कोठवरी
साहुं साहूं ॥ कौस० ॥ ५ ॥ वनिं करी सावुलिये दिनकर-कु-
ळदीपा ॥ सरोवर जवळि ठेवीं वरुणा तूं माय बापा ॥ पदोप-
दीं रक्षी तान्ह्या नव्हे वनवास सोपा ॥ निशीदिनी माधव तुझे
गुण सदां गाऊं गाऊं ॥ कौ० ॥ ६ ॥

॥ पद १३ ॥ √

(राग-जोगी. ताल-धुमाळी. चाल-मजला वरिलं प्र०.)

सीते माझे प्रियकरणी ॥ कोठें गेलीस गे ॥ ध्रु० ॥ जंवरि होता
तुझा सहवास ॥ नाहीं वाटला मज वनवास ॥ तुजविण जाहला जी-
व उदास ॥ त्यजिली आस शरीराची ॥ सीते० ॥ १ ॥ नाहीं
आणिलें मी मृगचर्म ॥ म्हणउनि रुसलिस हेंचि वर्म ॥ परि मज
शोकास्पद हें कर्म ॥ तुज हा धर्म योग्य नव्हे ॥ सीते० ॥ २ ॥
कीं घ्यावया श्वशुराची भेट ॥ सखये स्वर्गी गेलिस थेट ॥ तोडुनि
अजि प्रीतिचा देंठ ॥ लाउनी नेट शोकासी ॥ सीते० ॥ ३ ॥
टाकुनि मजला या शोकांत ॥ भोगूं पहासी सुख एकांत ॥ परि मज
होतसे गे आकांत ॥ न होय शांत तुजवीण ॥ सीते० ॥ ४ ॥
लागुनि तव शोकास्पद बाण ॥ व्याकुळ होती पांचही प्राण ॥

हे गुरुदासप्रभू निर्वाण ॥ वाहुनी आण निरसीली ॥ रीति०॥१ ॥

॥ पद १४ ॥

[राग—देस ताल—धुमाळी.]

साजणी ग माझे मनिचें, हितगुज हें ऐकें बाई ॥ ध्रु० ॥ लाज काय धरुनी आतां, भय लौकिक करणें काई ॥ वेधलेंच मानस माझें न चळे हें दुसरे ठाई ॥होइन रामाची दासी ॥ भावें वंदिन पदासी॥स्वशिरा मी ठेविन त्याच्या पाईं॥ साजणी०॥१॥ कां महेशचाप चढाया, पण केला माझ्या तातें ॥ रामचंद्र ओढिल केसा, नवपल्लव कोमल हातें ॥ नवसा तुझि सांब शिवातें ॥ नवसारसलोचन यातें ॥ नुचलो पारि वरिलें आपुले ठाई ॥साजणी॥ २ ॥ या मनासि आला माझ्या, शरकार्मुकपाणी राजा ॥ कामनाचा दुसरी नाहीं, कृत निश्चय झालें आजा ॥ सकळा तुह्मी गाजा वाजा ॥ न करा मातेस वंदा जो ॥ नमितें मी तुमच्या पाई ॥ साजणी०॥ ३ ॥ पाहतांचि राघव डोळां, मन तन्मय झालें माझें ॥ लाहतांचि प्रेम विसावा, मज जाली न जगीं लाजे ॥ रमतें मन देवनरामीं ॥ नमनी मन रामीं ॥ ह्मणतो आनंदसुताचा स्वामी ॥ साजणी० ॥ ४ ॥

॥ पद ॥ १५ ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळी. चाल—माझा भरत देखिला. ]

माझ्या बाळावरता रोष ॥ कैकयि धरिशी कां ॥ ध्रु० ॥ चिमणें बाळक कीं रघुराय ॥ केला नसतां तव अन्याय ॥ वनासि दवडुनि सुख तरि काय ॥ ऐसा अनर्थ करिसी कां ॥ १ ॥ राम केवळ नेणते बाळ ॥ फिरेल विपिनीं कीं अळुमाळ ॥ यास्तव वाटतसे हळहळ ॥ ठेविन भाळ चरणीं कां ॥ २ ॥ अंतरल्यावर श्रीरघुराज ॥ माझे प्राणचि जातिल आज ॥ त्रिभुवनिं अपकीर्तीची लाज ॥ व्यर्थचि आज वरसी कां ॥ ३ ॥ देई भरताशी

संभार ॥ परि मजवरता करि उपकार ॥ जीवनतनयाचा दातार ॥ चित्तीं दूर धरिसी कां ॥ ४ ॥

पद ॥ १६ ॥

( राग, ताल, व चाल—वरच्या पदाप्रमाणें. )

माझ्या बाळा रघुवीरा ॥ वनासि जाऊं नको ॥ ध्रु० ॥ कोमळ नाजुक तुझा काय ॥ व्यर्थचि भरिं भरलासी काय ॥ रडते मोकलोनि मी धाय ॥ पंकीं गाय रोउं नको ॥ माझ्या० ॥ १ ॥ तुझ्या पायां येतिल फोड ॥ वन विचाराची इच्छा सोड ॥ दई मजला येवढी जोड ॥ सुकृत मोड मोडूं नको ॥ माझ्या० ॥ २ ॥ सूक्ष्म केवळ तूं तर बाळ ॥ कैसा फिरसिल रानोमाळ ॥ होईल अनर्थ कीं तात्काळ ॥ विपरित काळ दावूं नको ॥ मा० ॥ ३ ॥ विनवित रामा सीते माय ॥ स्वस्थचि मजपासीं तूं राय ॥ जीवन तनय वंदितो पाय ॥ कांहीं उदास होउं नको । माझ्या बाळा रघुवी० ॥ ४ ॥

पद ॥ १७ ॥

(राग—जोगी. ताल—धुमाळी. चाल—मजला वरिल सुभद्रा काय.)

राजा वेड तुझें हें काय ॥ सत्वर धर जा मुनिचे पाय ॥ ध्रु० ॥ कथितों आजी तुज गुज एक ॥ राया सावधान ऐक ॥ अजि तूं ह्मणसि जयासी लेंक ॥ राम तो पूर्णब्रह्म देख ॥ तो हा अवतरला अनपाय ॥ सत्वर० ॥ १ ॥ पूर्वीं कश्यप तूं आर्या ॥ अदिति हे कौसल्या भार्या ॥ उभयतां करुनि तपश्चर्या ॥ आराधुनी देवधुर्या ॥ प्रार्थिलें तया वरदवर्या ॥ त्वयास्मतसुतता स्विकार्या ॥ तो हा तव गेही रघुराय ॥ सत्वर० ॥ २ ॥ तयाची प्रिया जगज्जननी ॥ प्रगटली असे जनकसदनीं ॥ घडो तद्योग मला सुजनीं ॥ हेतु हा मुनिच्या आगमनीं ॥ न धरुनि शंका किमपि मनीं ॥ मुलें ही अर्पी मुनिचरणीं ॥ हा निजकल्याणसदुपाय ॥ सत्वर० ॥ ३ ॥ असें हें परमगुह्यवृत्त ॥ एकतां राजा

पंक्तिरथ ॥ नयनी प्रेमाश्रू वाहत ॥ आपणा मानी कृतकृत्य ॥ मुनिला सानुज तो रघुनाथ ॥ अर्पी कृपण जसें हो वित्त ॥ हर्षे मुनिसह विठ्ठलराय ॥ सत्वर धरजा मुनिचे पाय ॥ ४ ॥

पद ॥ १८ ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळी. चाल—वरल्याप्रमाणें. )

जानकी सांग सहचरिला ॥ कळवी जनकाशीं ॥ ध्रु० ॥ हें धनु ठेवावें सदनांत ॥ विश्वासावें मद्वचनांत ॥ नाहितरि जाइन मी विपिनांत ॥ देह दहनांत अर्पिन हा ॥ जान० ॥ १ ॥ काय करूं मी नाही धीर ॥ सत्वर दावी तो रघुवीर ॥ पाहिन कधीं शरयू-तीर ॥ नयनी नीर वहाते गे ॥ जा० २ ॥ देइन कंठांतील मणि-हार ॥ प्रार्थी जोडुनि कर बहुवार ॥ सखे करी इतुका उपकार ॥ होय उदार मजवरती ॥ जान० ॥ ३ ॥ मी वरिला तो श्रीर-घुराम ॥ जो कां अखिलसुखाचें धाम ॥ जो कां सुरवरांत अभि-राम ॥ पूर्णकाम जो दासा ॥ जा० ॥ ४ ॥

पद ॥ १९ ॥

( राग—देस. ताल—त्रिवट. चाल—र. मरखे वैसारहनारे भाई. )

मातःस्वामिनी सीताबाई ॥ संशय न मनिं धरावा कांहीं ॥ ध्रु० ॥ त्रिभुवनपालक रविकुलराजा ॥ करुणासागर स्वामी माझा ॥ ॥ १ ॥ दूत मी विभुचा सुत पवनाचा ॥ सुग्रीवाचा सचिव मी साचा ॥ २ ॥ त्यज हे मुद्रा दुःखदरिद्रा ॥ दिधली प्रभुनें ध्यावी मुद्रा ॥ ३ ॥ संतोषे ती त्रिजगन्माता ॥ विठ्ठलपंतहि तें यश गाता० ॥ मातः स्वा० ॥ ४ ॥

पद ॥ २० ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळी. चाल—माझा कृष्ण देखिला काय. )

माझा मित्र बिभीषण आज ॥ कोठें जायिलरे ॥ ध्रु० ॥ होइल दीनाहूनि अतिदीन ॥ जैसा जळाविणें मीन ज्याला ॥ उद्वस लोक

तीन ॥ होयिल दीन सर्वस्वें ॥ मा० ॥ १ ॥ मजवरि अर्पुनिया सुख दुःख ॥ झाला प्राणासी विन्मूख ॥ आतां कोणाचें बा मूख ॥ पाहुनि सूख पावेरे ॥ मां० ॥ २ ॥ बारे मिळाली माकडें ॥ धरतिल पर्वताचे कडे ॥ नाहीं कोणाचें वांकडें ॥ एक बापुडें अंतरलें ॥ मा० ३ ॥

पद ॥ २१ ॥

(राग—जोगी. ताल—धुमाळी.)

रामा कौतुक पाहसी काय ॥ उद्धरीं मुनिदारा ॥ ध्रु० ॥ अज्ञानानें घडलें पाप ॥ कोपुनि मुनिनें दिधला शाप ॥ सदया दूर करीं संताप ॥ तूं मायबाप दीनाचा ॥ रामा० ॥ १ ॥ ऐकुनि उठिला तो रघुराय ॥ धरिला गौतमवधुवरी पाय ॥ केला सर्वही दूर अपाय ॥ हर्ष न माय मुनिला हा ॥ रामा० ॥ २ ॥ द्यावें मुनि तिजला वरदान ॥ राखी मुनिवनितेचा मान ॥ धरि मद्वचनाचा मान ॥ बापा अनमान न करीं हो ॥ रामा० ॥ ३ ॥ करिती सुरवर जैजैकार ॥ मुनि आलिंगीती वारंवार ॥ जाहले मजवरी बहु उपकार ॥ तूंचि अधार या दासा ॥ रामा कौतुक पाहासी काय ॥ उद्धरीं मुनिदारा ॥ ४ ॥

पद ॥ २२ ॥

[ राग—परज. ताल—धुमाळी ]

राम केवळ लहान ॥ स्वामी द्यावें कसेंहो दान ॥ ध्रु० ॥ स्वामि जया अद्यापि धनुष्या॥लाऊं नकळे बाण॥स्वा०॥१॥ राक्षस लक्ष मुलें हीं कैसें ॥ होइल यज्ञत्राण ॥स्वामी०॥ २ ॥ काय वदूं हा रामबहिश्चर ॥ या वृद्धाचा प्राण॥ स्वा०॥३॥ सतत जयाचें पंत विठ्ठला ॥ सहज लागलें ध्यान स्वा०॥ ४ ॥

पद ॥ २३ ॥

(राग—धनाश्रीचा जिल्हा—ताल—धुमाळी.)

मजला नेतील श्रीरघुराय ॥ ऐसें करीं बापा ॥ ध्रु० ॥ परसदनीं बहु झाला वास ॥ मास्तव करितील माझा त्रास॥ चित्तीं होतिल फार उदास ॥ करूं मी आस कोणाची ॥ मजला० ॥ १ ॥ सत्वर दाखवि माझा कांत ॥ यापरि सीता करि आकांत ॥ जाहला दशाननाचा अंत ॥ आता खंति वाटतसे ॥ मजला० ॥२॥ बरसा केला त्वां उपकार ॥ आठवूं किति रे वारंवार ॥ रघुपति करील तुज भवपार ॥ दे मज थार पतिचरणीं ॥ मज० ॥ ३ ॥

॥ पद ॥ २४

(राग-परज. ताल-धुमाळी.)

विश्वामित्र सभे आला॥मागतो माझ्या रामाला ॥ ध्रु० ॥ विनवा त्या ऋषिरायाला॥नको नेऊं माझ्या बाळाला ॥ जरि हा मागेल दुग्धाला ॥ तरि वनीं कोण देईल त्याला ॥ द्यावें पुत्रदान मजला ॥ मागतो माझ्या रामाला ॥ विश्वा० ॥ १ ॥ त्याविण आम्हा नाहीं कोणी॥ जैसें मत्स्याला पाणी॥ विनवा जाउनिया कोणी॥ भेटवा रघुकुळ राजमणी ॥ अभय दे वसिष्ठ मग तिजला ॥ ॥माग० ॥ २ ॥ कैकई फोडी हंबरडे ॥ कौसल्याही फार रडे ॥ झाले नेत्रही कोरडे ॥ बोलती वायडे वाकुडे ॥ दुष्ट हा कां नाहीं खपला ॥ माग० ॥ विश्वा० ॥ ३ ॥ कां रुसलासी जगदीशा ॥ मांडिली आमुची दुर्दशा ॥ मजला होती फार आशा ॥ वाटती उदास दाही दिशा॥ आतां काय भेटेल आपुल्याला ॥ मागतो माझ्या रामाला॥ विश्वामित्र सभे आला० ॥ ४ ॥

पद ॥ २५ ॥

(राग-धनाश्रीचा जिल्हा. ताल-धुमाळी. चाल-गड्यानो कृष्णमंडी.)

राम गोसावि झाला ॥ अवघे पाहुं चला ॥ ध्रु० काढुनि सोनियाची आंगी ॥ बरवि विभुति चर्चिली आंगीं ॥ जैसा दिव्य पुरातन योगी ॥ शरयुतिरीं बैसला ॥ राम० ॥ १ ॥ घरांत हो-

उनियां बेजार॥काढित किनखाबी पैजार॥जैसी जुनि तुटकी पैजार ॥ तैसें राज्य झुगारीलें ॥ राम० २ ॥ फेंकुनि दिला बाजिरा चिरा ॥ वाटिला मोतीयाचा तुरा ॥ फेडुनि पिंवळ्या पितांबरा ॥ वनि वल्कलें नेसला ॥ राम॥० ॥ ३ ॥ करूनि पर्णकुटीका बरी ॥ वरति भगवि ध्वजा गुडी ॥ नाहीं चोपद्दार देवडी ॥ चारी दिशा मोकळया ॥ रा० ॥ ४ ॥ उदास होउनि सुवर्णनगीं ॥ सन्निध बैसली सिता उगी ॥ भेटीस ना गे परवानगी ॥ उघडें दर्शन चांगलें ॥ रा०॥५॥ धाडूनि लक्ष्मण सुभटा ॥ चिक आणि प्रार्थूनियांवटा॥मउकेशाच्या केल्या जटा॥दिव्य त्या बटा झगझगीती ॥ ६ ॥ शंकर अम्रुतेश्वर भगवान॥ज्याचें आखंड करितो ध्यान ॥ आपुले जानिचें महिमान ॥ ज्याला त्याला आवडे राम॥ ७॥

पद ॥ २६ ॥

( राग-झिंजोटी. ताल-एका. चाल-अर्जुना तूं जाणरे. )

विश्व सर्व तारणें ॥ होंचि मुख्य कारण ॥ सूर्यवंशीं याचि लागीं ॥ धरी आवतारण ॥१॥ निर्गुण निर्मायरे॥ब्रह्मांडीं न समायरे ॥ दशरथ बाप त्यासी ॥ कौसल्या ते मायरे ॥ २ ॥ बळाचे हीं बळरे ॥ स्वयेंचि प्रबळरे ॥ समागमें चाले त्याच्या ॥ वान्नराचें दळरे ॥ ३ ॥ सीतेसि वियोगरे ॥ मागुति संयोगरे॥ नित्य सत्य व्यापकासी ॥ कैचें नाना भोगरे ॥४॥ शिवाचें जीवनरे ॥ पतित पावनरे ॥ राम यश गातां ऐसा ॥ तरला वामनरे ॥ ५ ॥

पद ॥ २७ ॥

( राग-झिंजोटी. ताल-एका. चाल-रामनाम तू भजके बंदे. )

राम ह्मणें सानुज मी येतों॥गुरुराया ह्या हो जनकपुरा ॥ ध्रु०॥ विश्वामित्र ह्मणें बा रामा ॥ पत्रास्तव जाणें हैं आज्ञा ॥ श्रम होतिल तुज पंथीं सुखधामा॥ आग्रह राहो नको धरूं॥ राम०॥ ॥ १ ॥ ऋषिवर्य तुह्मां सोडूनि सांगा ॥ सुखभोग क्षणं न रुचे

आंगां ॥ नृप तेथें चापाच्या भंगा ॥ करितिल तें पाहूं नयनभरी ॥ २ ॥ घे मग मुनि संगें रघुराया ॥ उद्धरि पंथें गौतम जाया ॥ राजाराम प्रसादिक पाया ॥ लागुनी धन्य हो रा० ॥ ३ ॥

पद ॥ २८ ॥

( राग–जोगी. ताल–त्रिवट. )

रामा काय कौतुक पाहसी ॥ झडकरी पाय दाखवि आतां ॥ ध्रु० ॥ धनसुत प्रमदानी मन हरिलें ॥ दंभमदानीं जननि जनकाजिव-दानी मजजवळी नयेच निधानी ॥ १ ॥ विषय विषानळ जाळी भव सतत जडे भवजाळी विचरे काम विहाळी मज विषमपणेंच नेहाळी ॥ २ ॥ कनु शत मातक पाहे कसी करीं करी परम परम कृपाहे आरती उचलोनी पाहे ॥ अजी आनंदसुत करीं बाहे ॥ ३ ॥

पद ॥ २९ ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. )

किती धीर धरुं दिनरजनि ॥ रुसला राघव आण समजाउनी किती० ॥ ध्रु० ॥ यौवराज्य रामातें द्याया ॥ इच्छा झाली पतिस हा देवा ॥ ह्मणें निर्दया राणी ॥ १ ॥ न्यासभूत वर माझे दे ॥ येकानें वनीं राम जाउं दे ॥ दुजा भरत पतिमेदिनी ॥ २ ॥ तिच्या प्रियास्तव भूभुज राघवा ॥ निरोप दे परी सत्य हा दैवा ॥ होय त्यजुनि कुलमुगुटमणी ॥ ३ ॥ रामचंद्रसुत विष्ठुर झाला ॥ कसा मजवरी वश सवतिला ॥ रुचे वास प्रिय काननी ॥ किती धीर धरुं दिनरजनी ॥ ४

पद ॥ ३० ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–अनंत भगवंताचीं नामें. )

भार्गव धनु भंगिलें राघवें पाहुनि सीतासती ॥ वराया आली रामा प्रती ॥ ध्रु० ॥ सूर्यकुलोद्भव दशरथनंदन त्रिभुवनसुंदर हरी ॥

घडो वर हाची ह्मणोनी घावरी ॥ त्रिलोकधात्री कोमलगात्री पंकजमाळा करीं घेउनि प्रेमभरें अंतरी (चाल) ह्मणे श्रीराम आज मजवरी ॥ रमेशारे करुणा केलीस बरी ॥ ह्मणुनी मीं झाल्ये तव नोवरी ॥ ऐसें बोलुनि कंठीं माळा घाली सत्वर गती वराया आ०॥ १ ॥ पद्माक्षी मग रघूत्तमाच्या अंकावरी बैसतां ॥ जनक नृप आणवी दशरथ पिता ॥ श्रुतिकिर्ती उर्न्मिळा मांडवी बंधूच्या या सुता ॥ जाहाला त्याही सभे आणिता ॥ (चाल) दिली उर्न्मिळा सुमित्रासुता ॥ मांडवि अर्पुनियां रिपुजिता ॥ करुनि श्रुतकीर्ती भरतांकिता ॥ विवाह केला किती वर्णावा समारंभ तो किती ॥ वराया आ० ॥ २ ॥ मग मिथिलापतीनें श्रीराघव बोळविला निज पुरा॰॥ तदा सुख जाहालें सुरभूसुरा या परि नाटकलीला वर्णुनी दत्तात्रय गुरुवरा ॥ तुला मी अर्पि-येलें सुखकरा ॥ (चाल) दयाळा पाव मला सत्वरा ॥ दास हा दीन ह्मणुनि करि धरा ॥ मनोरथ पुरवी कृपासागरा ॥ बाळ कविला श्रीदत्ता तुजवांचुनी नाहीं गती वराया०॥ ३ ॥

## पद ॥ ३१ ॥

(राग—देस. ताल—त्रिवट.)

हे दशरथ बाळ ॥ राम लक्ष्मण नामें याचिं ॥ केवळ राक्षसकाळ ॥ ध्रु० ॥ यज्ञरक्षणा घेउनि येता ॥ झाला सर्व सुकाळ ॥ हा विष्णु हा शेष दुजा हे ॥ जगताचे प्रतिपाळ ॥हे०॥१॥ घोर ताटिका सुबाहु मारुनी ॥ वारीति मुनिभयजाळ ॥ उद्धरीली निजपदीं अहल्या ॥ जी पातकी त्रिकाळ ॥२॥ राजा आतां कन्या तुझी ॥ घालिल यासिच माळ ॥ नारायणसुत जनकासि ह्मणे ॥ थोरची तूझे भाळ ॥ ३ ॥

## पद ॥ ३२ ॥

(राग—परज. ताल—धुमाळी.)

दशरथ नंदन बाळ सीते ॥ त्यासी घाली तूं माळ सीते ॥ ध्रु० ॥

मदन मनोहर रूप जयाचें ।। करिल तुझा प्रतिपाळ ।। सीते ।।१।।
राम सखा हा मन्मथपुतळा ।। दिसतो सुंदर बाळ ।। सीते ।। २ ।।
काळा डोंगर अंतरीं ओंगळ ।। रावण हा फटकाळ ।। सीते ।।३।।
देखुनि रूप वेडावले भूप ।। अंतरी घोटिती लाळ ।। सीते ।। ४ ।।
मध्वमुनेश्वर स्वामी रमापती ।। दानव कुळिचा काळ ।।सीते०।।५।।

## ।। पद ३३ ।।

( राग–खमाज. ताल–त्रिवट. चाल–या हरिविणें कैसा संसार कमूं हो )

या जानकीजिवनें आह्मा कैसे त्यागिलें ।। पाहुनि सुरूप कोटि इंदुवत मुखमन दीननिसी होते आनंदानें मोहिले ।। ध्रु० ।। कैकईचे समाधान व्हाया प्रियनंदन ।। धाडी नृपवर त्याचे चित्त ना ढळे ।।१।। त्यजुनि जननीसी सुखरुप वनवासी ।। झाला अति निष्ठुर हो चित्र वाटले ।। २ ।।

## पद ।। ३४ ।।

( राग–भूपकल्याण. ताल–त्रिवट. चाल–पंचतुंड नररुंडमालधर. )

चाप धरुनिया करी लक्षुमण ।। फळें आणाया गेला हो ।। ध्रु० ।। तयावनिं तो शभरि राक्षस ।। रावण भाचा राहे हो ।। शूर्पनखासुत तप प्रार्थुनिया ।। वंशजाळीमधें होता हो ।। १ ।। अकस्मात तो लक्षुमण तेथें ।। माध्यान्हीसी आला हो ।। काळखड्ग तें उतरे खाली ।। प्राप्त जाहाले त्याला हो ।। २ ।। धार तयाची कैसि आहे ।। ह्मणोनी उचलुनी मारी हो ।। वंशासहीत तो राक्षस तुटला ।। हर्षाचे सुरवरि झाला हो ।। ३ ।। तनुनदिचे पूर वाहुनि ।। लक्षुमण तेथें भ्याला हो ।। ऋषिवध झाला ह्मणुनि म्लानमुखानें ।। रामा जवळी आला हो ।। ४ ।। अंतरसाक्षी रामरघूत्तम ।। आलिंगोनी तयाला हो ।। ह्मणे लक्ष्मणा भीऊं नको तूं ।। राक्षस हस्तें तुटला हो ।।५।।

# रामाचीं पदें.

## पद ॥ १ ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. चाल–संतपदाची. जोड दे हरि. )

तबमे जानकी नाथ कहो ॥ ध्रु० ॥ सागर बांधुं सेना उतारो ॥ सोनेकी लंका जलाहो ॥ १ ॥ तेत्तीसकोटकी बंद छयुडाऊं ॥ बभसन छत्तर धराउं ॥ २ ॥ सूरदासप्रभु लंका जिती ॥ सो सीता घर ले आवो ॥ तबमे जानकी नाथ कहो ॥ ३ ॥

## पद ॥ २ ॥

( राग,–ताल,–चाल–वरच्याप्रमाणें.

रामी रतरे मनुजा साधि हीतरे ॥ ध्रु० ॥ सर्व जिवाचा राम विसावा ॥ अदमा आशा स्वतरे ॥ १ ॥ दीन करूणेस्तव गोचर झाला॥मानवसा भासतरे ॥२॥ सोच्चत्सैाख्यद शरण न जासी होई शरणागतरे ॥ ३ ॥

## पद ॥ ३ ॥

( राग–बहिरवी. ताल–त्रिवट. )

रामा तुज विसरलों ॥ अपराध क्षमा किजे ॥ ध्रु० ॥ जननीजठर-कुहरीं नवमास श्रमलों ॥ सोहं ह्मणता मी आतां ॥ कोहं स्मरलों ॥१॥ जप तप त्वद्भजन त्यजुनि ॥ विषई भ्रमलों स्त्री धन सुत संश्रुति त्या मोहें रमलों ॥ २ ॥ विहिताहित नेणुनि धनार्जनी रतलों ॥ आत्ममोचनार्थ सत्सेवनि ना जडलों ॥ ६ ॥ रामदास दर्शनासी॥हेळसुनि दडालों सर्वस्वि विलोकुनि ॥ नमनी झटलों ॥४॥

## पद ॥ ४ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. )

रामचंद्र सरकार प्रभुजी ॥ सुन मेरी एक बात ॥ ध्रु० ॥ तुमीबिन प्यारा हामसे देखो॥भाई बंद जोरू बेटा और साला॥ नही कोई मायतात ॥ १ ॥ मुस्किल राहा ग्यानभक्तीकी ॥ बेद शास्त्र पुराण कछु भजन जाने ॥ शिरपर है जमजीलाल ॥.राम० ॥२॥

आपना बचा डुब जावेगी ॥ धरो लाज अखिल सुरराज ॥ तप करोजि दासहा ॥ ३ ॥

पद ॥ ५ ॥

( राग—कालंगडा. ताल—त्रिवट. )

तो रघुराज दयाळधणी ॥ असतां मी कवणा न गणी ॥ ध्रु० ॥ सर्वसाक्षी सर्वांतरगत अगटीत जाची करणी सर्वघटी प्रतीबिंब दिसोनि आलिप्त जसा तरणी ॥ १ ॥ विश्व जन विश्वभर तत्पर विश्वोद्धर भरणी ॥ दीनबंधु मुनिवर्यनितंबीनी उठविली चरणी ॥ २ ॥ चाप उचलित वदा नृपासी पडोनी चळे धरणी ॥ माळ करे मी भुपेशसुता गाळी ॥ घालुनिया परणी ॥ ३ ॥ किर्ती मुखे वदति मुनिवर्य महत्पतितोद्धरणी ॥ लब्ध सुखे विठ्ठल त्याचे रतला नामस्मणी ॥ तो रघुराज दयाळ धणी असतां मी कवणा न गणी ॥ ४ ॥

॥ पद ६ ॥

[ राग—कालंगडा. ताल—धुमाळी. ]

रघुपती पहासी अंत किती ॥ अनाथ कीं मी परदेसी बा ॥ तुजविण नाहीं गती रघुप० ॥ ध्रु० ॥ मात्रोदरी क्लेश पुरीं ॥ दुःख भोगि नरहरी ॥ भोगियेल्या उंच निच योनी ना मीति ॥ रघुप० ॥ १ ॥ आप्तजन गांठीं धन ॥ नाहीं मान देती आन ॥ सोसवेना ताप तप ॥ विस्मर मति ॥ रघुप० ॥ २॥ निरंतर नमस्कार॥ माझा करा उपकार ॥ ज्ञानामृत पाज देई ॥ स्वरूपि स्थिती र० ॥ ३ ॥ दासपण खरें ह्मण ॥ समर्पुन वस्तु खुण ॥ दयाघन उचित हे ॥ दृश्य विरति ॥ रघुपति ॥ ४ ॥

॥ पद ७ ॥

( राग—जोगी. ताळ—दादरा. )

राम दर्शनासी चला ॥ लाभ हा भला ॥ ध्रु० ॥ रामजन्म रामनवमी नक्षत्र पुनर्वसु ॥ समय मध्यंदिनि घटी देव अवतार जाहाला ॥ १ ॥ दशरथासि दाशरथी पुत्र जन्मला ॥ त्रिभुवनांत आनंद थोर

जाहाला ॥ २ ॥ शबरी कबरी बदरीफळें पदरी वाटुनी ॥ माव
मळें भुलोनिया भक्षुं लागला ॥ ३ ॥ भजकाचे कोटी अन्याय हा
क्षमा करी उद्धरिता ॥ महाराज नाहीं भागला ॥ ४ ॥ महाविष
त्रिंबकासी अमृत लाधला ॥ पार्वतीस आनंद वाटला ॥ राम दर्श-
नासी चला लाभ हा भला ॥ ५ ॥

पद ॥ ८ ॥

( राग–बहिरवी. ताल–त्रिवट. )

कमलनयन घनशाम ॥ तनु हो ॥ ध्रु० ॥ चंद्रानन रघुराज विरा-
जे ॥ हस्तकीं कांचनबाण ॥ धनुहो ॥ क० ॥ १ ॥ सुंदर ना-
सिक बींब सुधाधर ॥ कुंदरदन अतिरम्य हनु हो ॥ क० ॥ २ ॥
सज्जनरंजन रविकुळमंडण ॥ जन्मुनि भूषवी भूपमनु हो ॥ कमल ॥ ३ ॥

पद ॥ ९ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

तो केला श्रीराम धनी ॥ नरवीर मुकुटमणी ॥ ध्रु० ॥ वर्णन क-
रितां फिरला मागें ॥ दशशतवदन फणी ॥ तो के० ॥ १ ॥
शुकसनकादिक मोहित झाले ॥ ज्याच्या शुभगणगुणी ॥ तो के० ॥ १ ॥
दया करूनि या दीन जनासीं ॥ लावित निजचरणीं ॥ ३ ॥

पद ॥ १० ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. )

राम माझा धरिल कसा अभिमान ॥ पहातो काय निधान ॥
ध्रु० ॥ जपतपसाधन कांहीं न नेणें ॥ पातकी दुष्ट महान् ॥
राम० ॥ १ ॥ परघातक मी गुरुवंचक मी ॥ दोष हे काय ल-
हान ॥ राम० ॥ २ ॥ करुणा घन हा निष्ठुर जाहाला ॥ त्र्यंबक
प्राणनिधान ॥ राम० ॥ ३ ॥

पद ॥ ११ ॥

( राग–झिंजोटी. ताल–धुमाळी. )

रामनामाची गती कोण जाणेरे ॥ जाणतसे कैलासपतिराणारे ध्रु० ॥ कीटपक्ष्यादिक मोक्षपदा जातीरे ॥ तेथें इतरांची कथा कोण गातीरे ॥ रामना० ॥ १ ॥ व्याधें वधितां मुखासि ह्मणे रामरे ॥ तेणें मिषें चढे तो मोक्षधामारे ॥ रामना० ॥ २ ॥ घेतां रामाचें नाम मोक्षग्राम द्वारीं ॥ धन्य झाली ते महीमान्य नारी ॥ राम० ॥ ३ ॥ अजामेळादि पूर्ण पापराशी ॥ नामसंकेतें पुण्यलोकवासी ॥ राम० ॥ ४ ॥ मंत्र हा माझ्या शिकविला मायबापें ॥ ह्मणे आनंदतनय गेलीं पापें ॥ ॥ ५ ॥

पद ॥ १२ ॥

( राग–काफी. ताल–एका. )

तारि तारी रामराया ॥ गेला गेला जन्म वायां ॥ ध्रु० ॥ टाकुनियां स्वकुळज धर्म ॥ केलें सर्वहि विपरित कर्म ॥ मजला मारिल तो यमधर्म ॥ काढिल चर्म नासिल काया ॥ तारि० ॥ १ ॥ जन्मापासुनि केलें पाप ॥ भोगिन त्याचें कर्म अपाप ॥ त्याचा वाटतसे संताप ॥ तूं आईबाप येऊं दे माया ॥ २ ॥ नाहीं केलें गंगास्नान ॥ नाहीं केले जपतप दान ॥ केला साधूचा अपमान ॥ धरिला मान नरकीं जाया ॥ तारि तारि० ॥ ३ ॥ निशिदिनि सुजन पथासिं धरीन ॥ आतां ते मी कधी न करीन ॥ झालों सर्व गुणानें हीन ॥ पडतों दीन तुझ्या पायां ॥ तारी० ॥ ४ ॥

पद ॥ १३ ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. माईमोरे नैनबसे. )

कमलापति भगवान ॥ मारु साई कमला० ॥ ध्रु० ॥ राम लछुमन भरत शत्रुघन ॥ चवरि डुलावि हनुमान ॥ मोरमुगुट पितांबर शोभे ॥ कुंडल झलकत कान ॥ २ ॥ सूरदासप्रभु तुह्मारे मिलनकूं दासके खाकू ध्यान ॥ मारुसाई कमलापति भगवान ॥ ३ ॥

पद ॥ १४ ॥

( राग–कालंगडा–ताल–त्रिवट. चाल–वरल्या पदाप्रमाणें. )

माई मोरे नयन बसे रघुवीर ॥ ध्रु० ॥ कर शरचाप सुसम झर लोचन ॥ ठाडे भये रणधीर ॥ १ ॥ ललित लवंग तब नागरलीला ॥ जब देखो तब धीर ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ बरसत कांचन नीर ॥ माई० ॥ ३ ॥

पद ॥ १५ ॥

(राग–भैरव कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–रतेरे रत सखया.)

रामा नमन तुला पावन नामा परिपूर्ण कामा ॥ मुळिचा चिद्धन तूं निजसुखधामा॥रामा० ॥ध्रु०॥असतां सहज निजाश्रमिं तो नसतां, येउनियां डसतां ॥ शक्राहंकार न जाणुमि फसतां, पति मज वरि कसता ॥ रामा० ॥ १ ॥ पतितें भ्रष्टविली शुद्धामतितें, यक्रोध पतितें ॥ शापादे जन्म शिलेचें सतितें ॥ करि उःशाप तीतें रामा० ॥ २ ॥ कळला मत्प्रियकर वर हा कळला, पापौघ जळला ॥ सच्चित्सुख राम दयाघन वळला भवताप पळला ॥ रामा० ३ तो तूं जो निरहंकृति निर्हेतू, हें सत्य परंतु ॥ नटला जग पाळाया विजय तूं जेविपटीं तंतू ॥रामा० ॥ ४ ॥ माया हे होय शिलामय काया, परि तीस हराया ॥ धरिला अवतार तुवां रघुराया, मज उद्धाराया ॥ रामा० ॥ ५ ॥ धंदा हाचि सदां कृष्ण मिलिंदा स्वपदारविंदा ॥ नचुके निज चिन्मधुप्राशन छंदा, दे परमानंदा ॥ रामा० ॥ ६ ॥ माथां कर ठेउनि निज परमार्थां वदवीं हृदयस्था ॥ वरदे विष्णु कृष्ण जगन्नाथा रघुवीर समर्था॥८॥

॥ पद १६ ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. )

शुद्धं ब्रह्म पदम् वन्दे सीताराम ॥ध्रु ० ॥ हैमवतीहर–चित्तविराम् ॥ दिनकर–वंशललामम् ॥ वन्दे० ॥ १ ॥ पदरजउद्धृत गौतमवामम् ॥ सजल–पयोधर–श्यामम् ॥ वन्दे० ॥ २ ॥ वि-

ग्रहविभव-विडंबित-कामम् ॥ विठ्ठलकुतुकारामम् ॥ वन्दे० ॥ ३

पद ॥ १७ ॥

( राग-काफी. ताल-धुमाळी. )

सखया रामा विश्रांति तुझिये नामीं ॥ ह्मणउनि मजला ने त्वरें निजसुख धामीं ॥ सखया० ॥ ॥ ध्रु० ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी ॥ पशु सुत जाया धन धामीं प्रीती मोठी ॥ माझीं माझीं ह्मणुनि म्यां धरिलीं पोटीं ॥ यांच्या संगें भोगिल्या दुःखकोटी॥ सखया० ॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धांवलों देशा दाही ॥ सेवक झालों मागुता कौतुक पाहीं ॥ परि खलजन हे न देती कवडी तेहा ॥ परि हे आशा पापिणी साजत नाहीं ॥ सखया० ॥ ॥ २ ॥ जंवरि दृढता तंवरि या तनुचि प्रीती ॥ जर्जर झाल्या निंदक हे अवघे होती ॥ यांची दुःखें तुजला मी सांगूं किती ॥ ह्मणउनि श्रीधर येतो काकुळती ॥ सखया० ॥ ३ ॥

पद ॥ १८ ॥

( राग-पिलु. ताल-दादरा. चाल-भज भज )

दाखवीं तव दिव्य पाय दयानिधे रामा ॥ ध्रु० ॥ हीन दीन आस तुझी, कास पूर्ण आह्मां ॥ धरावया पाहतसे अगा घनश्यामा ॥ दाख० ॥ १ ॥ मायबाप बंधु गोत्र, मित्र तूंचि आह्मां ॥ तुजवीण कोण असे सांग सख्या रामा ॥ दाख० ॥ २ ॥ सखआनंदतनय, ह्मणे गुण ग्रामा ॥ क्षीण भाग हरीं त्वरें पुसोनियां धामा ॥ दाख० ॥ ३ ॥

पद ॥ १९ ॥

( राग-काफी.ताल-धुमाळी. )

जिवलग राम पाहूं या चला ॥ देह अयोध्येमाजि हृदयस्थानीं प्रगटला ॥ जिव० ॥ ध्रु० ॥ दों दिवसांचें भाग्य न साचें ॥ नाम वाचे उच्चारुनि पाउल उचला ॥ जिव० ॥ १ ॥ द्वैत भावना

जेथ शिरेना ॥ पूर्ण ब्रह्मानंद रूप अद्वय संचला ॥ जिव०॥ ॥ २ ॥ विष्णु गुरु कृपा अक्षयरूपा ॥ विवरितां कृष्ण जगन्नाथ हा वाचला ॥ जिव० ॥ ३ ॥

पद ॥ २० ॥

( राग—खमाज. ताल—त्रिवट. )

श्रीराम तो मी पाहिन डोळां आवडी ॥ ध्रु० ॥ वाहुनि श्रमलों विषयाशेनें ॥ जन्ममरण कावडी ॥ श्री० ॥ १ ॥ अनंत ब्रह्मांडें धरि एकला जो ॥ सुमनातें जसी वावडी ॥ श्री० ॥ २ ॥ वैष्णव गुरुपंथ कृष्ण जगन्नाथ ॥ धरिनो साहुनि चावडी ॥ ३ ॥

पद २१ ॥

( राग—रामकली. ताल—धुमाळी. चाल—विठ्ठल भक्ताची माउली. )

सांगड बांधारे भक्तांची ॥ रघुनाथ नामाची ॥ ध्रु० ॥ संसार सागर सागर ॥ भरला जातो पूर ॥ १॥ लाटा उसळती विषयाच्या ॥ बहुतां प्रपंचाच्या ॥ २ ॥ माणकोजी बोधला बोधला ॥ हरि नामीं रंगला ॥ सांगड० ॥ ४ ॥

पद ॥ २२ ॥

( राग—कालंगडा. ताल—त्रिवट. चाल—माई मोरे नैन बसे. )

श्रीराम तुझें सहज करिल कल्याण ॥ ध्रु० ॥ सांडुनि स्नेहा विसरुनि देहा ॥ जरि रोधिसि मन प्राण ॥ श्रीराम० ॥ १ ॥ आपपर ऐसें द्वैत न कल्पुनि ॥ आपणा आपण जाण ॥ श्रीराम० ॥ ॥ २ ॥ विष्णु गुरूकृपे अनुभव घेउनि ॥ कृष्ण जगन्नाथ वाहे आण ॥ श्रीराम० ॥ ३ ॥

पद ॥ २३ ॥

( राग—परज. ताल—एका. )

भय्या राम कहोरे ॥ भवजलपार तरोरे ॥ ध्रु० ॥ जावे अंबर जावे धरणी जावे चंद्र सुरीजो ॥ गंगा सागर जमुना जावे कछु

न रहवे स्थीरो ॥ भय्या० ॥१॥ काया जावे माया जावे ॥ जावे तीनी लोक ॥ जितना देखो उतना जावे ॥ कहां करे जनशोक ॥ ॥ भय्या० ॥ २ ॥ माता पीता भान भयारे ॥ जोरू लडके साथी ॥ जबलग संपत तबलग साथी ॥ अवसर न मिले कोई ॥ भय्या० ॥ ३ ॥ वेद न जानो शास्त्र न जानो ॥ जानो तेरा नाम ॥ कहत कबिरा सुनभई साधू ॥ प्रीती करो मुझराम ॥ भय्या० ॥ ४ ॥

॥ पद २४ ॥

( राग—धनाश्री. ताल—धुमाळी. )

गाहो गाहो रामाचीं नावें ॥ ध्रु० ॥ सकळ वेदशास्त्र सत्पुराण सारीरे ॥ हरिति कीर्तनोंचि संचिताघ सोरेरे ॥ हृदय अर्पिलें दग्धसोंरेरे ॥ कुमतिसहित, दमुनि अहित, करित महित, निजजन रामाचीं नावें॥गाहो० ॥ १ ॥ असति तत्ज्ञकथितमंत्र सप्तकोटीरे चुकलिया जपांत देति हानि मोठीरे ॥ ह्मणति साधुही तदीय रीत खोटीरे ॥ ह्मणति सुकवि न मुखसुकवीं जरिहि चुकवि जड-पण रामाचीं नांवें ॥ गाहो० ॥ २ ॥ अमृतगर्व सर्व खर्व निपट केलारे ॥ यांहिं कीर धीर गीध गतिस नेलारे ॥ स्तविल काय हा मयूर मधुरतेला रे ॥ इतर मनुज जपुनि टपुनि वपुनिरसन पटु हि रामाचीं नांवें ॥ गाहो० ॥ ३ ॥

पद ॥ २५ ॥

( राग—कानडा ( दरबारी ) ताल—पंजाबी त्रिवट.)

रामीं रमवूं मना ॥ नाहीं सार ज्याविना ॥रा०॥ विषयीं न कांहीं सौख्य समज तरि ॥ किति भुलूं स्त्रीसुतधना ॥ रा० ॥ १ ॥ नर-तनु दुर्लभ अनुकूल असतांरे॥वेगें साधूं आत्मसाधना ॥ रा०॥२॥ विष्णुगुरुकृपा कृष्ण विवरितांरे॥पावे आंगें सुखसदना ॥ रा० ३

पद ॥ २६ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—कवण तुझी. )

वाजे नमुनि जनलाज त्यजुनि ॥ रघुराज सदैव भजवारे ॥ध्रु०॥ दृश्य विलक्षण राम सुलक्षण ॥ न क्षण एक क्षण त्यजावारे ॥ ॥ वाज० ॥ १ ॥ नाशिवंत जाण देह न मी ह्मण ॥ साक्षी आपण उमजावारे ॥ वाज० ॥ २ ॥ विष्णुचरणीं रत कृष्णजगन्नाथ ॥ काळ न विषयांत जावारे ॥ वाज० ॥ ३ ॥

पद ॥ २७ ॥ गुजराथी.

(राग—गौडी. ताल—एका. चाल—हजरत अल्ला.)

मनमां राम नाम तमे धारजो ॥ नित्य हरिनो स्मरण करजो ॥ जन्ममरणनो फेरो चुकाय जोरी ॥ ओ पापिलोको सामलोरी ॥ जपो राम नाम ॥ करो काम धाम ॥ तमे हरिनें चरण चित्त लागोरी ॥१॥ ओ पापिलोको सामलोरी ॥ ध्रु० ॥ अंतकाळनो सगो कोई नहीरे ॥ सर्वे संसारसंबंधी मळयारे ॥ ये झुटी माया जंजालरे ॥ओ पापि०॥१॥ मारो मारो करिनें धन मेळवूं ॥ खाऊं पिवूं ना धरम करवूं ॥ भुलो पूर्वजन्मनो पापरे ॥ ओ पापि० ॥२॥ एवो समजीनें भजो भगवानने ॥ मळे वैकुंठनो राज्य तमनें ॥ सुखदुःखनो निवारण थाय सेरे ॥ ओ पापि०॥ ३ ॥

पद ॥ २८ ॥ ✓

(राग—कालंगडा. ताल—एका. चाल—चंरजीव कल्याण.)

उत्तम जन्मा येउनि रामा मेलों उगा वायां ॥ ध्रु० ॥ आधी चुकलों मुकलों मी निज वेदस्वाध्याया ॥ कर्मे श्रौत स्मार्त न घडलीं सद्गति साधाया ॥ पुराण परिसुनि सादर झालों यशहि न तत्र गाया ॥ स्वस्थपणें कधीं नाहीं फावलें तुजला पूजाया ॥ उ० ॥ १ ॥ अर्जविलें बहु लवण भंजनें व्याह्या जावया ॥ क्षुधित अतिथि कधिं नाहिं घेतला प्रेमें जेवाया ॥ उदार कर कधीं केला नाहीं पैसा एक द्याया ॥ नाम फुकटचें तेंहि न आलें स्वामी वदना या ॥ २ ॥ कपट करुनिया निपट मोडिल्या बहुत आया बा-

या ॥ केली धन-गृह-क्षेत्र-स्त्री-पशु-शिशुवर बहु माया॥ नित्य सजविलीं वसन भूषणें निंद्या ही काया ॥ सिद्ध ठेविली सदाहि रसना सज्जन निंदाया ॥ ३ ॥ वटवट निशींदिनीं केली चहुंकडे मन हें रमवाया ॥ केलें स्नान न संध्या जप तप दुष्कृत शमवाया ॥ क्षणहि न केला साधुसमागम भवदव निववाया ॥ सद्यः कामुक झालों पाहुनि परधन परजाया ॥४॥ नाहीं विद्या कला कुशलता तुजला रिझवाया ॥ शुद्ध मधुर वाणीही नाहीं तुजला विनवाया ॥ बुद्धिहि नाहीं न कळे कांहीं शरणागत व्हाया ॥ थकलि मजल सर्वथा दयाळा स्वहित आचराया ॥ ५ ॥ हरि कनवाळु करि दीनावरि कृपेची छाया ॥ निगम नगारा गर्जे ऐसा निखिलां कळवाया ॥ यावरि विश्वासुनियां आलों जवळ तुझ्या पायां ॥ शुद्ध दगड हा पंत विठ्ठल स्वामी रघुराया ॥ उत्तम०॥६॥

पद ॥ २९ ॥

( राग-कालंगडा-ताल-धुमाळी. चाल-बरवी संतच. )

श्रीरामा तुझे नामीं ॥ विश्रांती केली आह्मीं ॥ आतां कांहीं नाहीं चिंता ॥ संसाराचे कामीं ॥ ध्रु० ॥ तारीं अथवा मारीं मजला ॥ ठेवीं मंगळधामीं ॥ सर्व भार माझा तुजवर ॥ मी सेवक तूं स्वामी श्रीरामा० ॥ १ ॥ भक्तकामकल्पद्रुमपुरता ॥ देह अयोध्याग्रामीं ॥ सत्रावी शरयूतीर ॥ निवासा साक्षी अंतर्यामीं ॥ श्रीरामा० ॥ ॥२ ॥ केशरि तूं रघुनाथ सितापति ॥ शिवदिन हनुमान हा मीं ॥ दास्य भक्तिची ध्वजा चालवी ॥ मागतसें वर हा मीं ॥ श्रीरामा० ॥ ३ ॥

पद ॥ ३० ॥

( राग-कल्याण. ताल-धुमाळी. चाल-रामकथारस. )

त्रिभुवनी रामचि दयाळु खरा ॥ त्रि० ॥ध्रु०॥ पुरा शोधुनि केला विचार ॥ देव एक रघुवीर ॥ राम०॥१॥ निजभजकवरा दे पदीं थारा ॥ न दिसे दुसरा किति कोमल मनिचा बरा ॥ रा० २ ॥

यजुनि असारा करुनि विचारा ॥ कोठुनि आपुले मूळ विवरुनि दृढ धरा ॥ राम० ॥ ३ ॥ मीपण भारा जाळुनि सारा ॥ विष्णु कृष्ण जगन्नाथ आत्म भक्तिभावें वरा ॥ राम० ॥ ४ ॥

पद ॥ ३१ ॥

[ राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. चाल–हरिशी सतत.]

रामनाम तूं भजले प्यारे कायकूं मगरुरी करताहै ॥ कचेमटिका बंगला तेरा पांव पलखमें ढलता है ॥ रामना० ॥ ध्रु० ॥ ब्रह्मन होकर ॥ पुरान बाचे स्नान तर्पन करता है ॥ सर्वकाल सुचील रहे तो ॥ यंव क्या साहेब मिलता है ॥ राम० ॥ १ ॥ जोगी होकर जटा बडावे हालमस्तमे रहता है ॥ उपर धरकर हात सुकावे यौंक्यासाहेब मिलताहै ॥ ध्रु० ॥ २ ॥ मानभाव पेहने काले कपडे दाढी मुछी मुंडताहै ॥ उलटी लकरी हात पकडकर यौं क्या साहेब मिलता है ॥ ३ ॥ राम० ॥ मुलना होकर बांग पुकारे ओ क्या साहेब बहिरा है ॥ मुंगीके पावमें आवज बाजे ओबी अल्ला सुनता है ॥ रा० ॥ ४ ॥ जंगम होकर लिंग बंधावे घरघर लेकर फिरता है ॥ शंख बजाकर भिक्षा मागे यौं क्या साहेब मिलता है ॥ राम० ॥ ५ ॥ कहत कबीरा सुन भै साधू मनकी-माला जपता है ॥ भाव भगतीसें ध्यान धरत है उसकूं साहेब मिलता है ॥ राम० ॥ ६ ॥

पद ॥ ३२ ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. चाल–कुलभगिनी. )

दिनरजनीं पाहुं राघवा ॥ राम मंदहसितमुख कमललोचन ॥ दिन० ॥ ध्रु० ॥ वामजानुवरी विराजे विमला सीता नारीरे ॥ कोटि विद्युत्प्रकाश आंगि दशदिशा फांके आघवा ॥ दोघे चंवरे ढाळिति ज्यासी भरत शत्रुघ्न ॥ दिन० ॥ १ ॥ नित्य ध्यानीं मग्न जयासी जपतो मदनारीरे ॥ विषताप निरसन झाला अनुभवं हा

गिरिजाधवा ॥ सव्यमार्गिं लक्ष्मण करि चापबाण ॥ दिन० ॥२ राम विष्णु पादाब्जीं लंपट ॥ कृष्ण मधु हारीरे ॥ तैसे वान्नरम-ण बिभीषण रामी रमुनीं घेति वाहवा पदि ठेवुनि शिर नह्याके अंजनिनंदन ॥ दिन० ॥ ३ ॥

॥ पद ३३ ॥

(राग–गौरी. ताल–धुमाळी. चाल–हरहर सांपडलों.)

जय जय रघुवीरा रणधीरा ॥ रविकुळमंडण हीरा ॥ ध्रु० ॥ राक्षसजलदसमीरा ॥ निजजनकरुणा पूर्णगंभीरा ॥ १ ॥ कनकरुचिरशुभचीरा ॥ मुनिजनमानसपंजरकीरा ॥ २ ॥ आनंदननय वजीरा ॥ पदयुगिं झळझळीत मंजिरा ॥ जय जय रघु० ३

पद ॥ ३४ ॥

[ राग–झिंजोटी, ताल–धुमाळी. )

रसनें रंगे या राघवाचे नामीं ॥ मिथ्या चाळे करिसी तूं कां रि-कामी ॥ रघुपति ह्मणतां तूं तरसील अंतरयामी ॥ ध्रु० ॥ सुंदर नामें या सुखधामा श्रीरामाची ॥ शंकरराजा तो गोडी जाणें याची ॥ टळेल पीडा या दुष्ट यमदुताची ॥ १ ॥ वाल्हा कोळी पातकी भूमंडळीं ॥ उलट्या नामें वाजवीली ॥ त्याच्यायोगें पातका झाली होळी ॥ २ ॥ रसनें किति विषयाचा करिसी सोस ॥ नामें तरिले तूं धरी तो विश्वास ॥ रंगि रंगे नामया विष्णुदास ॥ रसने ॥ ३ ॥

पद ॥ ३५ ॥

(राग–पिलु. ताल–एका. चाल–भजोरे भया राम गो०)

त्रिभुवनी राम दयाळु खरा ॥ ध्रु० ॥ सनकादिक ध्येय जाणुनि ध्याती ॥ निगमोन्मुखुनि हरा ॥ १ ॥ कैवारा मानवकारा ॥ प्राणी अजनृपतिघरा ॥ २ ॥ धर्म स्थापी दानव कांपी ॥ अभयद स्वाद धरा ॥ राम ॥ ३ ॥ विश्वी नमावें जो ॥ नवल हें स्थिर होय ॥ गणपति ह्रदईं वरा ॥ राम० ॥ ४ ॥

## पद ॥ ३६ ॥

(राग–भूपकल्याण. ताल–दीपचंदी.)

धारे धीर राहे स्थिर अरे तूं मना ॥ क्षणभरी तरी आठवि रघु-नंदना ॥ ध्रु० ॥ चंचळ चपळ वेगें ॥ नाटोपे कोणा ॥ सृष्टी-कर्ता ब्रह्मा तोही ॥ नाडला जाण ॥ १ ॥ हाचि समय टळल्या आह्मा ॥ कैचा श्रीराम ॥ जपताची नाम माझा ॥ तुटला भ्रम ॥ २ ॥ सांवळासुंदर राम ॥ कोदंडधारी ॥ परेहुनी परता राम-दासा अंतरी ॥ ३ ॥

## पद ॥ ३७ ॥

(राग–कल्याण. ताल–दादरा.)

सीतापत रामचंद्र रघुपति रघुराई॥ धु०॥रसना रतनाम केत॥ संतकुं दरशन देत॥विलसत मुख मंदमंद॥सुंदर सुख पाई ॥ १ ॥ दशन दमक चमक चाल ॥ ऐन गैन दृगविशाल ॥ भृकुटी मध्ये आलि-न पति ॥ नासिका सुवाई ॥ सीता० ॥ २ ॥ केशरेको टिलक भाल ॥ मनोरवि पातकाल ॥ कानन कुंडल झलमलाट ॥ रति-पति छबछाई ॥ ३ ॥ मोतनकी कंठमाल ॥ तारांगण उरवि शाल ॥ मानोगिरि निरफेक ॥ सुरस ती चला आई ॥४॥ सखास-हित शरयुतीर॥विलसत रघुवंसधीर ॥ तुलसिदास आदख निरख चरनरज पाई ॥ ५ ॥

## पद ॥ ३८ ॥

(राग–आनंदभैरवी. ताल–धुमाळी. उद्धवा शांतवन कर० यां. चा.)

राम राम बोला वाणी, मन लावा राघव चरणीं ॥ ध्रु० ॥ कर्म-तत्व गहन कळेना, कळलें तरि सांग घडेना ॥ कर्तृताभिमान उडेना, ब्रह्मार्पणबुद्धि चढेना, ॥ पुण्याशीं गांठि पडेना ॥ चाल ॥ अंधारिनिशा उजडेना ॥ हित कोंडुनियां आड रानीं ॥ राम

राम० ॥ १ ॥ साधूचा संग धरावा, नाहीं ज्या आप परावा ॥ स्वकरें तच्चरण चुरावा, कीर्तनीं करावा सुगरावा ॥चाल॥ भवसिंधु सुखे उतरावा, जन्माची होय शिराणी ॥ राम राम०॥२ विषय हे विषापरि विटती, स्वयमेव क्लेशहि सुटती ॥ वासना मूळही आटती, चित्ताच्या वृत्ती तुटती ॥चाल॥ ज्ञानांकुर हृदयीं फुटती सहज सर्व संशय फिटती ॥ कर्मबंध सहसा तुटती, स्वानंद सुखाची खाणी ॥ राम राम० ॥ ३ ॥ शास्त्रदीप घेउनि निघतां, निगमागम शोधुनि पहातां ॥ संतासीं हितगुज पुसतां, सुगम ह्याचि दाविति पंथा॥चाल॥आहेत मतांतर कंथा,॥ज्या रुचल्या नाहिं अनंता ॥ ह्मणुनि ह्याचि विठ्ठलपंता॥पथ गमला निर्मलवाणीं॥४॥

पद ॥ ३९ ॥

( राग–पिलु. ताल–एका. भजोरे भया राम गोविंद हरी. )

भले निंदो भले निंदो भले निंदो लोगो ॥ तनमन राम पीयारे जोगो ॥ ध्रु० ॥ मै नवरी मेरो राम भ्रतारा ॥ ताते सुरुचिर करो हो सिंगारा ॥ १ ॥ जैसे धोबीया रजमल धोवे ॥ हरत पर त सब नींद खोवे ॥ निंदक मोरे माई बापा ॥२ ॥ जनमजनमके काटे पापा ॥ कहे कबीर नींदक बलहारी ॥ आप रहे जन परा उतारी ॥ भले० ॥ ३ ॥

पद ॥ ४० ॥ ४

(राग,ताल,चाळवरच्या पदा प्रमाणें.)

चिंतावा रघुवीर हृदई चिंतावा रघुवीर ॥ ध्रु० ॥ लौकिक ठज्या त्यजुनि अयोध्या ॥ पांघुरे मग चीर ॥ हृदयीं० ॥ १ ॥ नाशिक त्रिंबक नगर मनोहर ॥ पावन गंगातीर ॥ हृदयीं० ॥ २ ॥ चित्रकुटीमध्यें पर्णकुटी करी ॥ सेउनि राहे नीर॥हृ०॥३॥ नाम हरींचें मधुर सुधेहुनि॥साखर न लगे क्षीर॥४॥मध्वमुनेश्वर ह्मणत सखयां ॥ चित्त करावें स्थीर ॥ हृदयीं० ॥ ५ ॥

पद ॥ ४१ ॥

(राग–देस, ताल–त्रिवट.)

कोदंडधारी राम गावाहो ॥ ध्रु० ॥ चंडकिरणकुल मंडणं परम दंड पराक्रम मोवांडित रिपुचयं खंड परशुशुंडोपम भुजदंड खोल सुर मंडणनाथा राम दावावो ॥ १ ॥ कुंडलिशय ह्मणे कुंडल मुरुचीर गंड जठर जटादंड कर जंगनुठ विजित शशिमंडळ कीर्ति राम दावाहो ॥ २ ॥ अंडजपति गति कांडलशित करि पंडित नतपद इशोड सुगुण मांड विहित मुनि षोडश गोपन श्रीधर हृदय पिचिल सुखदास ॥ राम दावाहो ॥ ३ ॥

पद ॥ ४२ ॥

(राग–झिंजाटी. ताल–चाल–रामनामाची यती.)

श्रीरामाच्या नामाचा छंद जासीरे ॥ जेथें राहे तेथें त्यांची कासीरे ॥ ध्रु० ॥ वर उपकार स्वधर्म सत्य वाचा ॥ धन्य धन्य नरदेही जन्म त्याचारे ॥ १ ॥ आणीकाचे गुण दोष नाणी ॥ चित्ती स्व स्वरुपीं सर्वदा जाची वृत्तीरे ॥ ह्मणे गंगाधरसुत त्यासि पाहिरे धन्व धन्य नरदेही त्याचा जन्मरे ॥ ३ ॥

पद ॥ ४३ ॥

[ राग–यमनकल्याण. ताळ–त्रिवट, चाळ–गोकुळवासी पुतना. ]

ध्याता सुत कामिनी ॥ झालि दिन यामिनी ॥ घडी येक तरि मनीं ॥ आठवा रामहो ॥ १ ॥ करितां संसार काम ॥ मुखीं आसो यावें राम राम ॥ शिवाचे विश्राम धाम ॥ आठवा रामहो ॥ २ ॥ धंदा सुटेना जरी ॥ सुखी असा व्यापारी ॥ वाचें आणि अंतरी ॥ आठवा राम ॥ ३ ॥ दिवस गेला व्यापारीं ॥ निद्रे गेली रात्र सारी ॥ गेले दिवस दोन चारी ॥ आठवा राम ॥ ४ ॥ काळ आतो घडोघडीं ॥ मोडी देहाची घडी ॥ येतो दिवस उघडी ॥ आठवा राम ॥ ५ ॥ कायावाचा आणि मनें ॥ प्रार्थीतसे वामन ॥ मये मये गेली आली वचन ॥ आठवि राम ॥ ६ ॥

## पद ॥ ४४ ॥

[ राग—कालंगडा. ताल—चाल—अखंड हरि हरि वदा. ]

सदैव राम राम ह्मणोरे बापानो ॥ नरतनु हे दुर्लभ ह्मणोरे बापानो ध्रु० ॥ तुह्मी प्रपंच केला जरी निका ॥ तरी होईल शेवटी हा फिका ॥ यम काढील शोधुनि बहु चुका ॥ मार मारील कठिण आईकारे बापानो ॥ सदैव० ॥ १ ॥ काय घालविनां वय फुका ॥ ध्यानी आठवा रघुनायका ॥ ब्रह्मत्वें आपणा तुका ॥ जन्ममरणाला मग मुकारे ॥ बापानो० ॥ २ ॥ देह पडेल कधीं न भरंवसा ॥ निज आत्मा आपुला कसा ॥ हे जाणत येकांती वसा ॥ नकळे तरी गुरुला पुसारे ॥ बापानो० ॥ ३ ॥ मोठेपणीचा अभिमान सोडा ॥ छी छी देह मीपण सोडा दृढ आसंग शस्त्रें तोडा आहे आखंड सुख तें जोडारे ॥ बापानो०॥४॥ जगीं तारक वैष्णव गुरु ॥ त्याचें चरण जाउनि धरु ॥ कृष्णजगन्नाथ सांगे उद्धरुं ॥ आपआपणा सावध करूरे ॥ बापानो सदैव० ॥ ५ ॥

## पद ॥ ४५ ॥

( राग—कालंगडा ताल—त्रिवट. )

केवळ माझा प्राण सखा रघुवीर ॥ तुजविण येक क्षणही न न धरवे धीर ॥ ध्रु० ॥ इष्ट मित्र सुरुदा पाही ॥ जिवलग वाटति न जाण त्याना रुणानुबंधें गांठी स्त्री पुत्राची ॥ काय मोहु देहादीक धना प्रपंच केवळ मिथ्यामय मृग नीर ॥ केवळ० ॥ १ ॥ मन पवनाचा संग सुटोनी येकांती मीपणा विना ॥ आपण आनंद मय स्वरुपें अद्वय अखंड भोगितां न उरे वासना ॥ सर्वात्मत्वें नटला गुणगंभिर केवळ ॥ २ ॥ विष्णुगुरुपदप्रसाद ज्यावरी त्याला जन्म नाहीं पुन्हा ॥ श्रीरामभक्ती निजआत्मैक्यें घडतां समुळी नुरे द्वैत भावना ॥ अनुभव कृष्ण जगन्नाथाचा स्थीर केवळ ॥ माझा० ॥ ३ ॥

पद ॥ ४६ ॥

( राग–देस. ताल–त्रिवट. )

सये वरील म्या रघुराज ॥ मान कराना करा ॥ ध्रु० ॥ निपट कपट जीव करी खटपट ॥ मनि चटपट आठवेना उठवेना सावध राहे ॥ १ ॥ विठ्ठल वरद वरद वर स्मर शर मारी ॥ तरी धिर धरवेना ॥ फिरवेना घरा सये वरीला ॥ २ ॥

पद ॥ ४७ ॥

( राग–पिलु. ताल–एका. चाल–भजोरे भया राम. )

रामराय बिकलमत मोरी ॥ न जानो दुनियां दिवानी तोरी ॥ ध्रु० जो पूजा रामन भावें ॥ सोई पूजन हार चढावे ॥ १ ॥ जो पूज्या राम भल्मानें ॥ सो पुजन हासन ज्यानें ॥ रा० ॥ २ ॥ करभाव प्रेमकी पूजा ॥ कबहु भयोरे देव न दूजा ॥ रा० ३ ॥ क्यों करिये बहोत पसारा ॥ पूजी जेसो पूजन हारा ॥ रा०॥४ कहे कबीर मै गावागावा ॥ मै आपलेखा जो पदमाही समाता ॥ सो पूजन हरसे आना ॥ राम० ॥ ५ ॥

पद ॥ ४८ ॥

( राग–भैरवकालंगडा. ताल–धुमाळी. स्मरे स्मर हृद. )

रतरे रत सखया राघव नामी किति रमसिल कामीं ॥ रामनाम सुखधाम निरंतर सेउनियां त्यज कुमति रिकामी ॥ ध्रु० ॥ नाना जन्मार्जित दुरितें जळलीं, कृतपुण्यें फळलीं ॥ तैं या नरतनुची प्राप्ती कळली, मग मति कां चळली ॥ लाज लाज करिं काज स्मरुनि रघुराजपद विरम धनसुत-धामीं ॥ रतरे० ॥ १ ॥ दारादि विषयांचा भ्रमकृत वारा, समजुनि मनिं थारा ॥ सारा मायकचि मोह पसारा, सारा निःसारा॥इष्टमित्र कुळगोत्र पुत्र सर्वत्र वृथा भ्रम, काकी मामी ॥ रतरे० ॥ २ ॥ करणें सत्संगीं मळमळ करणें शुद्धांतःकरणें ॥ स्मरणें हित वरणें संसृति त-

रणें सत्कर्माचरणें ॥ समज करुनि हित समज उमज मनीं देशिकवचनें कवण कसा मी ॥ ३ ॥ रतरे० ॥ ऐशा साधनें बहुजन तरले ॥ शांतीनें वरिले ॥ सहज देहत्वापासुनि सरले निजपदिं अनुसरले ॥ करिसि भजन तरि तरसि सहपितर येविषयीं तुज विठ्ठल हामी ॥ रतरे० ॥ ४ ॥

## पद ॥ ८९ ॥

( राग–परज. ताल–धुमाळी. चाल–स्वामिन्य अह्मासी. )

रात्रदिन राम गावूंरे ॥ पुत्रकलत्रसुख भ्रम पुरे पुरे ॥ रा० ॥ ध्रु० ॥ छत्र सुखासनिं माझा स्वामि ॥ अयोध्येचा राजा शोभे आजानुबाहुरे ॥ रा० ॥ वामांकी जानकीनार संमुख मारुति वीर ॥ दिसे सुंदर पाहुंरे ॥ रा० ॥ २ ॥ राम विष्णु पदीं चित्त ॥ ठेवी कृष्ण जगन्नाथ ॥ सुख अद्वैत लाहुंरे ॥ रा० ॥ ३ ॥

## ॥ पद ९० ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल–संतपदाची जो. )

तूं माझा यजमान रामा तूं माझा य० ॥ ध्रु० ॥ जननीजठरीं रक्षियेलें मज ॥ पोसुनि पंचहि प्राण ॥ रामा तूं० ॥ १ ॥ बाहेर निघतां मातेचे स्तनीं ॥ पय केलें निर्माण ॥ रामा तूं० ॥ २ ॥ ऐसें असतां या पोटाची ॥ कां करूं चिंता जाण ॥ रामा तूं० ॥ ॥ ३ ॥ मध्वमुनीश्वरस्वामि रमापति ॥ धरिं माझा अभिमान ॥ ॥ रामा तूं माझा यजमान ॥ ४ ॥

## पद ॥ ९१ ॥

( राग–देस. ताल–त्रिवट. )

देव तो हा दयाघन दशवदनारि रे ॥ राम तो हा दया० ध्रु० ॥ सद्रिपुकंदन श्रीरघुनंदन सुरकृतवंदन ॥ राम तो ॥ ध्रु० ॥ रत्नजडित मुगुट शिरीं ज्याच्या ॥ वामांकीं जानकी शोभे नारिरे ॥ जो भव भंजन मुनिमन रंजन नित्य निरंजन ॥ देव तो० ॥ १ ॥ शाम मनोहर सुं-

दरमूर्ति ॥ विलोकितां भवभय हरिरे ॥ अंबुजलोचन दुष्कृती-मोचन, विनतालोचन ॥ देव० ॥ २ ॥ लक्ष्मण भरत शत्रुघ्न मारुति॥भक्त विराजति सेवा करिरे॥वैष्णव साधन, कृष्णा राधन राम अबाधन ॥ देव तो० ॥ ३ ॥

पद ॥ ९२ ॥

( राग–खमाज. ताल–दादरा. चाल–येगौंऱ्हावेंसावधान. )

आठवितों रामा ॥ घडि घडि घडि चरण तुझे ॥ असनिं शयनिं भोजनिं गमनिं छंद तुझा आह्मां ॥ घडि घडि० ॥ ध्रु० ॥ हृदयतीत पूर्ण ब्रह्म ॥ नित्य निर्विकारा ॥ अंबुजदलनयन मुनी ॥ मानसीं विहारा ॥ १ ॥ सर्वसाक्षी सर्वोत्तम ॥ सर्वगुरूरुपा ॥ प्रेमियातें सौख्यसिंधु ॥ दशरथकुळदीपा ॥ घडि घडि० ॥२॥ तात मात भ्रात नाथ ॥ तुंचि येक पाही ॥ केशव ह्मणे करि दया ॥ शरण तुझ्या पाई ॥ ३ ॥

पद ॥ ९३ ॥

( राग–कल्काण. ताल–दादरा. चाल–धरवदवदत. )

जप तूं राम नाम किती मधुर मधुर मधुर मधुर ॥ ज० ॥ ध्रु० ॥ राम नाम ध्वनि उमटे ॥ तेथें लक्ष लावी नेटें ॥ ब्रह्मानंद सहज भेटे ॥ प्रचुर प्रचुर प्रचुर प्रचुर ॥ ज० ॥ १ ॥ दृश्य देखतांचि दिठीं देयीं द्रष्टेयासि मिठी ॥ आपुलें आपण सौख्य घोटीं ॥ न दुर न दुर न दुर नदुर ॥ ज० ॥ २ ॥ राम विष्णु कृष्ण ध्यान ॥ त्यासि दे मुकुंद ज्ञान ॥ जेणें होय समाधान ॥ चतुर चतुर चतुर चतुर ॥ ज० ॥ ३ ॥

पद ॥ ९४ ॥

( राग–संका. ताल–धुमाळी. चाल–अर्जुनातूजाण )

पूर्ण ब्रह्म राम गे ॥ वर्णूं त्यासी काय मे ॥ दशरथ तात ज्याचा ॥ कौसल्या ती माय गे॥१॥ब्रह्मांडाच्या कोटी गे ॥ सांठवितो पोटीं

गे॥भर्ग चाप भंगुनियां॥पर्णी सीते लागीं गे॥२॥ब्रह्म निर्विकार गे॥ नाहीं त्या आकार ॥ साकार होउनी रक्षीं ॥ पदीं नत दास गे ॥३॥ आहे अंतरज्ञानी गे ॥ जाणें सकळ ध्यामीं गे ॥ अनु-दिनीं ध्यान धरुनि ॥ प्रार्थितों मीं त्यासी गे ॥ ४ ॥

पद ॥ ९५ ॥

( राग—कल्याण. ताल—त्रिवट. चाल—क्षणभंगुरसंसार. )

निरधनको राम ॥ हमारो ॥ नि० ॥ ध्रु० ॥ खातन खर्चत चोरन लुटत ॥ सादे आवत काम ॥ हमारो० ॥ १ ॥ दिन दिन होत सवाई दिढी ॥ खरचत को नही दाम ॥ हमारो ॥ ॥ २ ॥ सुरदास प्रभू मुखमो आवत औरसको नहि काम ॥ हमारो ० ॥ ३ ॥

पद ॥ ९६ ॥

( राग,ताल,चाल,वरच्या पदा प्रमाणें. )

रघुनंदन राम भजावारे ॥ ध्रु० ॥ जाणशी तूं क्षणभंगूर वैभव ॥ जाणुनि बंधन जोवारे ॥ रघु० ॥ १ ॥ जाणशी ना रघु-नंदनगायन ॥ शरण जाऊं गुरुदेवारे ॥ रघु० ॥ २ ॥ गौरी पतिप्रती प्रीत धरावी ॥ थोर तयाचा भांवारे ॥ रघु० ॥३॥ अ-क्षयवैभवदायक राघव ॥ तारक मंत्र जपावारे ॥ रघुनंदन ॥४॥

पद ॥ ९७ ॥

[ राग—हमीरकल्याण ताल—त्रिवट. ]

राम पालय राम पालय राघवान्वयमौलीमंडणहिरका ॥ निजज-नतारका भवभयहारका ॥ ध्रु० ॥ दशरथात्मज दनुजमर्दन ॥ गाधिसुतमखपालना सीता ललना ॥ वारिधिकीलना ॥ १ ॥ मधु-मुरांतक मदनमोहन मकरकुंडलभूषणांचित॥ खरदूषणत्रिशिरनाशना ॥ २ ॥ मंद सदना कुंद रदन मुकुंदसद्गुरुमंदिरा ॥ जलधरसुंदरा हात धर कंदरा ॥ ३ ॥ साली शोधन सालीशबरी चारी पूरित वासना ॥ कश्यपशासना रुक्मशरासना ॥ ४ ॥

## पद ॥ ५८ ॥

[ राग–कानडा. ताल—त्रिवट. )

नमस्ते राघवा भवातूनि तार ॥ न कळे कैसा करिती साधु विचार ॥ नम० ॥ सच्चिदानंदस्वरूपीं मनहें धांवे आत्महेतु जो ॥ देह जगद्भ्रम वारुनि दे पदीं थार ॥ न० ॥ १ ॥ ध्येय ध्याता ध्यान अशा या त्रिपुटी ॥ नेणें मी तुझा ॥ सर्वहि एकचिपणें निश्चय सार ॥ न० ॥ २ ॥ विष्णु कृष्णजगन्नाथ तुझी ऐसी भावितो पूजा ॥ प्रार्थितसे कर जोडुनि वारंवार ॥ नम० ॥ ३ ॥

## ॥ पद ५९ ॥

( राग–बिभास.ताल–दीपचंदी. चाल–किती पहटेची वेळ.)

रघुविरा मनीं स्मरा निरयसौख्य ना धरा अघहरा पुढें स्वरा आहे काळ धरा ॥ ध्रु० ॥ व्यर्थ जाय मनुज काय धर्मराय ताडील ॥ हाय कराल धाय रडाल काय शीघ्र सुपथ आचरा॥भवहरा परात्परा भजुनि काम आवरा ॥रघु० ॥१॥ श्रीनिवास निराभ्यास प्रणीगुणास पालनास॥ हेचि आस रामदास करूनी मुक्त॥आसरा ईशवरा शिवशंकरा जन्ममरण नावरा ॥ २ ॥

## पद ॥ ६० ॥

( राग–कानडा. ताल–त्रिवट. चाल–मोठा कानडा गोविंद.)

और नही कछु कामके॥ मे भरोसी आपना रामके ॥ ध्रु० ॥ जो चाहे सो देत पदारथ॥ वारि जाउं समामके ॥ १ ॥ दो अछरसे सबकुल तारी ॥ अंतदेत सुरनामके ॥ २ ॥ तुलसिदासप्रभु रामदयाघन ॥ और देव सब धामके॥ और नही कछु कामके॥३॥

## पद ॥ ६१ ॥

( राग–कालंगडा ताल–धुमाळी. चाल–तोवरि तळमळे.)

ऐसे जे झाले पूर्ण निवाले ते ॥ नाहीं आले फिरोनीया ॥ ध्रु० टाकुनि कामा भजले रामा॥अंतरी प्रेमा धरोनियां ॥ १ ॥ हरिनाम

गर्जत श्रीराम स्मरत॥कंठ सद्गदित होवोनियां ॥ २ ॥ घाडि घाडि गर्जती गोडी॥अंतरी आवडी लागली तया ते नाहीं०॥ ३ ॥ विठ्ठल कामी भजले रामीं ।।केशव ह्मणें आह्मी वंदिलें तया॥ते नाहीं आले फिरोनि० ॥ ४ ॥

## ॥ पद ६२ ॥

( राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—दयाघन भक्ति आकळिला. )

श्रीरामनाम गारे आवडी ॥ वेगें संतसमागम जोडी ॥ धु० ॥ भवंडी विषय भुज॥कवडी न मिळे तुज॥चावडी सांडुनी घेई॥ स्वस्वरुपीं गोडी ॥१॥ गणित करूनियां जें॥ह्मणसी सकल माझें॥ कोणीच न पावे जेव्हां यम डोई फोडी ॥२॥ करितां संसारकाम॥ वाचे उच्चारावें नाम॥विष्णु कृष्णजगन्नाथदे॥हबुद्धि तोडी ॥३॥

## पद ॥ ६३ ॥

( राग—खमाज.ताल—दादरा.चाल—या हरिविणें कैसा. )

अंदाधुंद कारभार॥रामा फार तुझारे ॥ ध्रु० ॥ कौरवासि राज्य पंडुपुत्र भक्तराज ॥ त्यासि वनोवनी फिरविसी महाराज न कोठे थार॥फार तुझारे ॥ १ ॥ पतिव्रता द्रुपदात्मजेसी फार आपदा ॥ कुब्जेसि निजपदीं बसविसी ॥ चोर जार ॥ फार तुझारे ॥ २ ॥ नारद हनुमंत सेवकासि ॥ तूं श्रीमंत असुनि न मिळे वसन॥मतलब्यासी निधी अपार ॥ फार तुझारे ॥ ३ ॥ नाथ भुजंगदास, बोलतां नये उदास ॥ ह्मणोनी पतितपावन ज्योतिस्वरूपीं जबरा सरकार तुझारे ॥ ४

## पद ॥ ६४ ॥

( राग—कल्याण. ताल—दादरा. चाल—पवननय परम विनय. )

प्रिय धाम बहुत काम तुजसि राम फुकाचा॥कांरे नाठविसी तूं हा उपदेश सुखाचा ॥ ध्रु० ॥ ज्याचा पाय पडतां दगड दिव्यकाय जाहला ॥ वानु काय स्वसुखध्याय रघुराय तयाला ॥ १ ॥

ऋषिसंग धरुनि रंग धनुर्भंग करुनि अयोध्येस ॥ ये रमेश जनकजे-सवरुनिया॥२॥गेल्या वक्त हेचि तनु न मिळे नक्त॥दिल्यानें हरिसि फक्त अवडे भक्त बहु आसक्त मनानें ॥ प्रिय ॥ ३ ॥ येक जोड नाम गोड सकळ सोड मधासी ॥ होई राजारामीलीन प्रसादिक पदासी ॥ ४ ॥

॥ पद ६५ ॥

( राग—कल्याण.ताल—धुमाळी. चाल—तूं माझा यजमान रामा. )

रामकथारस पी पी पी प्राण्या॥ रामकथारस०॥ध्रु० ॥रामकथारस पीशिल जरि तूं॥काळ करिल मग जी जी जी॥ प्रा०॥१॥ संतति संपति जाय जिर्णे मग॥मीपण धरिसी छी छी छी प्रा०॥२॥ मध्वमुनिश्वर सांगतसे गुज॥दुष्ट जनाप्रति भी भी भी०॥प्रा०॥३॥

पद ॥ ६६ ॥

( राग—गौरी. ताल—त्रिवट. )

दाखवि पाय राघवा ॥ शांतवि हा भवअंबुधि देवा ॥ ध्रु० ॥ तूंचि जनकजननी कुळ गोत्र ॥ हे तारक मज केशवा ॥ १ ॥ सांभादिक अमरासि पाळिसी ॥ काय दीनाचा केवा ॥ २ ॥ युगायुगीं अवतरसी महीवर ॥ हननार्थ दानवा ॥ ३ ॥ हेचि अपेक्षित रामा द्यावी ॥ गणपति बाळा सेवा ॥ ४ ॥

पद ॥ ६७ ॥

( राग—पिलु—ताल—त्रिवट. )

आजुनि कां नये तो रघुराणा ॥ तो सजलजलदतनु मनिं आणा। ध्रु० ॥ मनबुद्धिवाचेपर ज्याचा ॥ पार न शास्त्रपुराणा ॥ तो अजराजतनय सुत झाला ॥ कौसल्येचा तान्हा ॥ १ ॥ बाळलीला अनुजासह दावि जो ॥ चापाच्या लघु लघु बाणा करीं धरुनि संधान भेदी जो ॥ मांडुनि शुद्ध ठाणा ॥ २ ॥ आत्मारामीं येक

अनेकीं ॥ रवी प्रतिबिंबें नाना ॥ घट मठ महदाकाशीं ॥ जैसा गोपाळ सकळ गति जाणा ॥ ३ ॥

पद ॥ ६८ ॥

(राग—बहिरवीं. ताल—त्रिवट.]

रविवंशाभरणा यावें हो ॥ रविवंशाभरणा हो यावें ॥ ध्रु० ॥ सत्यज्ञानानंतअकारा ॥ विगतविकारा जगदोद्धारा ॥ निगमागमसारा॥हो यावें ॥ रवि० ॥१ ॥ निर्गुण नित्य निरामयनामा ॥ अवाप्तकामा मंगलधामा ॥ मुनिजनविश्रामा ॥ हो यावें ॥ रविवंशा० ॥ २ ॥ विश्वविलासा श्रीजगदीशा ॥ पूर्णपरेशा निजरंगा अविनाशा ॥ हो यावें ॥ रवि० ॥ ३ ॥

पद ॥ ६९ ॥

( राग—बहिरवी. ताल—धुमाळी. )

धांव रे रामराया ॥ किती अंत पाहासी ॥ प्राणांत मांडिला हो ॥ नये करुणा कैसी ॥ ध्रु० ॥ पाहिन घडिभरी ॥ चरण झार्डान केशीं ॥ नयन शिणले बा ॥ आतां केधवां येशी ॥ धांव० ॥ १ ॥ मीपणअहंकारें ॥ अंगीं भरला ताठा ॥ विषय कर्दमांत ॥ लाज नाहीं लोळतां ॥ किळस उपजली ॥ ऐसें झालें बा आतां ॥ धांव रे० ॥ २ ॥ मारुतीस्कंदभागीं ॥ वेगें बैसुनि यावें ॥ राघव वैद्यराजें ॥ कृपाओषध द्यावें ॥ दयेचे पद्महस्त माझे शिरीं ठेवावे ॥धांवरे रा० ॥ ३ ॥ विनवी रामदास ॥ थोर पावतों व्यथा ॥ कौतुक पहातोसि ॥ काय जानकिच्या कांता ॥ दीनदयाळा दीन बंधू ॥ भक्तवत्सला आतां॥ धांव रे० ॥ ४ ॥

पद ॥ ७० ॥

( राग—हमिरकल्याण.ताल—त्रिवट. )

राम तव पदतामरसं त्वदि मे सदा निधेहि॥ राम नौमि मामवामरासिविराम् कामकाम मामनोरम ॥ राम त० ॥ ध्रु० ॥ इंदिरा

हृदयारविंदाहस्कर ॥ लीलाविधृतमंदिर ॥ मुनिमानसमंदिर ॥ रघुवीर ॥ किं दया न तात. ॥ सेवकहृद्दपारिजात ॥ जय रघुनंदनेंकुंदमंदहाससुनंदनंद्यवंद्य सुंदरानन ॥ राम त० ॥ १ ॥ अंगदार्चितधृतहेमांगद ॥ संरक्षितरुक्मांगद ॥ करुणापालितापांगद दाशरथेश ॥ रंगराजपाल ॥ नतशरभंग सत्यशील ॥ विधृतरथांगरंग मंगलांग वरदविहंगपुंगवांगसेव्य मृदुपद ॥ राम त० ॥ २ ॥ नीलकाय ॥ पंक्तिरथबालक ॥ माधव भक्तपालक ॥ धरणीश ॥ लोलसगुणशरण॥ तिंबनृपालविनुतचरण ॥ घन करुणालवालताळजाळदलनविशालनील शैलबालिकाग्रज ॥माम०॥ ३ ॥

॥ पद ७१ ॥

( राग—खमाज.ताल—धुमाळी. )

दाशरथे रामा ॥ येइं हो दाशरथे रामा ॥ध्रु०॥ सुगमसुधेसम नाम रसायण ॥ भवभय दूर करीं पामा ॥ येइं हो० ॥ १ ॥ कृष्णार्पण अहंकार दुरात्मा॥निवटुनि कंस कुमामा ॥ येइं हो०॥ २ ॥ अमृतप्रभु निर्दोषयशाचा ॥ गर्जत निगमदमामा॥ येइं हो० ॥ ३ ॥

# पदें मारुतिचीं.

## पद ॥ १ ॥

( ताल—त्रिवट. राग—भैरवी. )

कपिवर मारुति हा वंदा॥नसेपराक्रमि आणिक दुसरा॥नित्य निरंतर रामपदीं रत ॥ मा० ॥ ध्रु० ॥ गुरुकृपांजनिसुत हा ॥ गगनीं उडाला प्रबोध सूर्य मिळाया॥इंद्रादिक हें जाणुनि वर्णिति॥पावुनि आनंदा॥दृढ तरपा०॥ क०॥ नसे० ॥१ ॥ रामचि होवुनि राम उपासक॥केवळ निजात्मसौख्य कळाया॥ श्रीराम भजक जन त्या अनुकुल हरितो॥भव कंदा सत्वर॥रि० ॥ न० ॥ २ ॥ स-

हरुविष्णरूपें हा निश्चय ॥ कृष्णजगन्नाथासि कळला॥ वरद ह-स्त हनुमत्प्रभु चिंतुनि॥सकल करा धंदा॥अनंतर सक० ॥नसे० ३

पद ॥ २ संस्कृत० ॥

( राग कानडा. ताल-त्रिवट. )

वन्दे संतं श्रीहनुमंतम्॥रामदासममल बलवंतम् ॥ध्रु०॥रामकथामृत-मधुनि वसंतं ॥ परमप्रेमभरेण नटंतम् ॥१॥ प्रेमरुद्धगलमश्रुवहंतम्॥ पुलकांचितवपुषा विलसंतम् ॥ २ ॥ कदाचिदानंदेन हसंतम् ॥ क्वचित्कदाचिदपि प्ररुदंतम् ॥३॥सर्वं राममयं पश्यंतम्॥ रामराम इति सदा जपंतम् ॥ ४॥ सद्भक्तिपथं समुपदिशन्तम् ॥ विठ्ठलपन्तं प्रति ॥ सुखयन्तम् वन्देसंतं ॥५॥

पद ॥ ३ ॥

[ राग-कल्याण. ताल-एका. चाल-पवनतनय पर. ]

धन्य एक मारुति सेवक रामाचा ॥ अन्य नाहीं त्रिभुवनीं काया मनें वाचा ॥ ध्रु० ॥ देहलंकेमाजि शोधी ॥ जाणिवे सितेला ॥ जाणतां अशोकमूळीं ॥ भेटावया गेला ॥ धन्य० ॥ १ ॥ दाविय-ली खूण तिसी॥निज राममुद्रा ॥ पाहतां तन्मय झाली ॥आनंद समुद्रा ॥ धन्य० ॥ २ ॥ अद्वय होवुनि सीता॥रामिं लीन झाली॥ रामनामस्मरणाचा ॥ नित्य नेम ज्याला ॥ धन्य० ॥ ३ ॥ अभय वरदहस्त॥करूनिया ऊभा ॥वामकर कटीं ठेवुनि॥दावि दिव्य शो-भा ॥ धन्य० ॥ ४ ॥ मारुति संकटेंहरी॥राम भजकांचीं ॥ विष्णु कृष्णजगन्नाथा ॥उपयोगी साचा ॥ धन्य एक मारुति० ॥ ५ ॥

पद ॥ ४ ॥

( राग-कानडा. ताल-दादरा. )

पहा आला आला॥सखा मारुती॥राम राम राम अशी॥मंजुळध्वनि ऊठती ॥ ध्रु० ॥ मूर्तिमंत प्राण हा आमुचा ॥ येतो मनोगती ॥ पहा०॥१॥रविरश्मि-सन्निभ औषधी ॥ पहा झळकती॥ प०॥२॥

महाशैल हा द्रोण दिसतो ॥ कंदुकसा हातीं ॥ प० ॥ ३ ॥ तो हा संत लावो प्रभुचिये पदीं ॥ पंत विठ्ठलाची मती ॥ प० ॥४॥

॥ पद ५ ॥

[ राग-पिलु-ताल-दादरा. ]

भवजलधिमधिल भय हरिल सकल बलभीम हा मारुति ॥ ध्रु०॥ वांचविला ज्याणें लक्षुमण प्राणें॥वेगें नलगतां क्षण आणुनियां द्रोणाचल ॥ ब० ॥ १ ॥ अंजनिबाळक त्रैलोक्यचाळक ॥ जेणें लंकेमाजि केला॥रावणासि कल कल ॥ ब० ॥२॥ श्रीरामसेवक कल्याणकारक॥राम विष्णु कृष्णजगन्नाथ स्मरण अचल॥ब०॥३॥

पद ॥ ६ ॥

( राग-बहिरवी. ताल.-एका. )

केला कीं उपकार ॥मारुते केला कीं उपकार ॥ ध्रु० ॥ घेउनियां करि आणियेला गिरि ॥ औषधींचा संभार॥मारु० ॥ १ ॥ प्राणदाता तूं सौमित्राचा ॥ मेळविलें यश फार ॥ मारु०॥२॥ राघव मी परि रविवंशाचा ॥ वाढविला बडिवार ॥ मारु० ॥३॥अमृतप्रभु स्तुति कपिरायाचा॥करितसे वारंवार॥मारु॥०४॥

पद ॥ ७ ॥

( राग-जोगी ताल-धुमाळी. चाल-माझा भरत दोखवि. )

कपिवर्या मज खरेंचि सांग॥लक्ष्मण वांचलकीं ॥ ध्रु०॥ लक्ष्मण बंधु नेणतें बाळ॥परि उपवासें कंठित काळ॥ लंघुनि आलें रानो-माळ॥ जिविं हळ हळ वाटत कीं ॥ क० ॥ १ ॥ कोठें माझा सौमित्र-राय॥पुसेल मजला याची माय॥ वत्सासाठीं जैसी गाय॥मोकलिल धाय॥काय करुं ॥ क० ॥ २ ॥ अरे हा दीन दुर्बल फार॥तूं हो प्राणाचा दातार॥मजवर होइल कीं उपकार ॥वारंवार प्रार्थसख्या ॥ क० ॥ ३ ॥ ऐकुनि विनवी मारुति वीर ॥ रामा स्वस्थ करा मन स्थीर ॥ गेला वंदोनि जें रघुवीरा॥जैसा तीर धनु-

ध्यावा ॥ क० ॥ ४॥ धरुनी रूप अतिविक्राळ ॥ उडोनि मेला अंजनिबाळ॥साक्षात शंकर दीन दयाळ॥जीवनतनय सत्य ह्मणे५॥

पद ॥ ८ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल–तूं माझा यजमाना राम.)

कैवारी हनुमान ॥ आमुचा कै० ॥ ध्रु० ॥ पाठी असतां तो ज-गजेठी ॥ वरकड काय गुमान ॥ आमुचा ॥ कै० ॥ १ ॥ नित्य निरंतर रक्षी नानापरी ॥धरोनियां अभिमान ॥ आमुचा कै०॥२॥ दासानुदास हा भरवंसा॥वदतसे त्याची आण ॥ आमुचा कै०॥३॥

पद ॥ ९ ॥ अंजनीगीत.

( ताल–धुमाळी. )

लंकेहूनी अयोध्ये येतां ॥ राम लक्ष्मण सीता ॥ हनूमंतें अंजनि माता ॥ दाखविली रामा ॥ १ ॥ चौघे करिति नमस्कार ॥ काय बोले रघुवीर ॥ ह्मणे माते तुझिया कुमरें ॥ उपकार केला ॥ २ ॥ माते तुझिया उदरीं जाण ॥ हनुमंत जन्मलें रत्न ॥ माझें एवढें रामायण ॥ याचेनीयोगें ॥ ३ ॥ सीताशुद्धी येणें केली ॥ लक्ष्मणाची शक्ति हरिली ॥ लंका जाळुनि निर्दाळीली॥ राक्षसीसना ॥ ४ ॥ येणें अखयाकुमर वधिला ॥ सर्व राक्ष-साचा मेळा ॥ जंबुमाळी रगडिला ॥ निजपदातळीं ॥ ५ ॥ अ-हीरावण महीरावण ॥ घात करिती अमुच्या प्राणा ॥भवानीरूपें येऊनि याणें॥ आमुतें रक्षिलें ॥६॥ हा कां माझ्या उदरीं आला॥ गर्भीहुनि कां नाहि गळाला ॥ आपण असतां कष्टवीला ॥ कां स्वामी राम ॥ ७ ॥ माझ्या दुग्धाचि हे प्रौढी ॥ कळीकाळा-ची मुरडी नरडी ॥ रावणादिक बापुडी ॥ घुंघुरटी काय ॥ ८ ॥ असत्य वाटेल रामा बोली ॥ दुग्धधारा सोडीयेली ॥ पर्वत स्व-घोनें शिखरें पडलीं ॥ दूखंड पाही ॥ ९॥ अत्यंत जिवलगसखा हनुमंत भक्त नीका ॥ रामदास पाठीराखा ॥ महारुद्र जो॥१०॥

पद ॥ १० ॥ ✓

( राग—झिंझोटी. ताल—धुमाळी. )

अंजनिसुत हनुमंत महाबली ॥ वायुसुता हनुमंता रे ॥ ध्रु० ॥ हुकुम हुवा जब गया लंकमें॥अशोकबनमें पोचारे ॥शोक बिरहमें सीता माई ॥ उनकूं जाकर मीलारे ॥ १ ॥ जब बजरंगनें मुद्रा डारी ॥ देखन लागी सीतारे ॥ वोहि मुद्रिका मेरे रामकी॥ रोवन लागी माता ॥ २ ॥ सीतामाई पूछन लागी ॥ किसिका है तुम दूता हो ॥ कौन देससे आये तुम तो॥कौन तुमारी माता है ॥३॥ राम लछीमन दोनो भय्या॥उनका है हम दूता हो ॥उत्तर देससे आये हम हो॥अंजनी हमारी माता हो ॥ अंजनि० ॥४॥

पद ॥ ११ ॥

( राग—कल्याण. ताल—दादरा. चाल—पवनतनय परम. )

तो सदा स्मरावा हो ॥ मारुती भला हो ॥ ध्रु० ॥ सीताशुद्धी चें मीष केलें ॥ अशोकवनिके विध्वंसिलें ॥ जाळुनि लंका राम दर्शनासी॥शीघ्र पातला ॥ १ ॥ षड्रिपु घालूनि बाहिर ॥ राम-चरण चिंति अंतर ॥ ज्याचे स्मरणें पापें जळतीं ॥ त्यासि पाहुं चला ॥ २ ॥ रामकीर्तनपुराणश्रवणीं । समाधी तटस्थ मौनी ॥ भाविकलोका सुख दे । रवि जैसा कमळा ॥ ३ ॥ रामरूप करितां निजवृत्ति । रामानंदी परम निवृत्ति ॥ नाना सद्गुरुरूप पाहुनि॥तत्पदी दृढ रमला ॥ ३ ॥

पद ॥ १२ ॥ ✓

( राग—कल्याण. ताल—एका. भीमक बाळा म्हणे १० )

मारुतिराया वानरकाया मजवरी माया करुनि बरी ॥ दाखवि पाया तुजला ध्याया दे मति गाया वदनीं खरी ॥ ध्रु० ॥ तूं ज-गदीशा वनचरवेषा धरुनि परेशा अवनिवरी साह्य रमेशा कारे लंकेशा, सह विध्वंसा असुरकुळीं ॥ मारुति०॥१ ॥ प्रपंचरहाटीं

श्रम जगजेठी जन्मकोटी वनिताउदरी ॥ बा धूर्जेटी भय मज पोटी या संकष्टो कोण तारी ॥ मा० ॥ २ ॥ त्वत्पदप्राप्ती, व्हाया गणपति, सोडोनि स्थिति रति विषयभरी ॥ शरण तुज प्रति दाउनि रघुपति दे गति उत्तम हे बाहारी ॥ ३ ॥

पद ॥ १३ ॥

( राग–खमाज. ताल–झंपा. चाल–ऐक राया दे रघु. )

कपिवीर पवनज स्तवन परिसुनि हर्षभरें वाढला ॥ देखूनि रुप क्रूर, कापति शूर, कपिगण सूर, ठेउनि दूर, जलधि उलंघूं सजला ध्रु० ॥ त्राहाटुनि लांगूला सुपर्वतमस्तकीं आरुढला ॥ ऊडतां नग पूड, होय निनाद कडकड, ऐकुनि शशिचूड, डोलति शेष दडनी रसातळा॥कपिवी०॥ १ ॥ मार्गी मैनका सुखवुनि हर्षवि तैं नाका ॥ जिंकुनि मग सूरसासुरी ॥ आसी घे क्रुरसिंव्हिकेसी विदारुनि दशशीर नगरी पावला ॥ २ ॥ शतयोजन नदीपति ॥ उलंगुनि जाय त्वरे मारुति॥या पुढें अति गोड, हा भव मोड, नाशक चरितवर्णनि, देई मति, रामात्मजकविला ॥ क० ॥ ३ ॥

॥ पद १४ ॥

( राग–यमनकल्याण. ताल–धुमाळी. चाल–लावणीची. )

राम सुग्रीवाज्ञा घेउनियां वेगें उडे मारुती ॥ सीताशुद्धिची मुदि घेउनि निघे यमदिशेप्रती ॥ ध्रु० ॥ जांबुवंत अंगदादि संगें प्रतापी कपि जाती॥विपिनें पर्वत सर्व तसे पुर पट्टणें धांडोळिती ॥ कोठें न लभे जनकसुता मग घोर वनीं शिरती ॥ दंडकऋषीचा चंडशाप ज्या स्थळीं प्राणी ही नुरती ॥ ( चाल ) त्या दुर्धर वनीं वान्नर बहु श्रमले ॥ क्षुधातृषाविकळ सकळ भूमि श्रमले ॥ परि रामनामें अपाय सर्व टळले ॥फिरत फिरत ईशदयेनें विव्रर येक देखती॥ त्यांत सर्वही निर्भय कपी ते राम स्मरुनि रिघती ॥ १ शतयोजनामित कुहर लांबितें निबिडतमें भरले ॥ क्षुधार्तकपिचें

पंथ क्रमितां शौर्य वीर्य हरिलें॥विकळ प्राणगत त्रास स्मरण श्रीराम हे हि उरले ॥ परम भक्त मारुती जयाचें मात्र न मन भंगलें ॥ ( चाल ) पुच्छाग्रीं वाहुनी सर्व कपिभारा ॥ मुखीं मनीं धरुनी श्रीराम सुखागारा ॥ यापरी शतयोजन पंथ क्रमुनी पावे रम्य स्थल अति ॥ जेथ सरोवरीं पूर्ण वृक्षही फळभारें डोलती ॥ २ ॥ पाचारुनि पिता पवन कपिचमू सजिव मग करी ॥ सुवर्णमय आश्रमीं जलफळें पाहुनि नाचति हरी ॥ रामदूत आश्रमीं पाहुनि तपस्विनी शेष करी ॥ असे मारुति चरणीं लागुनी धन्य ह्मणे मी खरी ॥ ( चाल ) मग क्षुधा तृषा वारुनी सर्व कपिभारा ॥ सर्वेचि तिच्या करी उद्धारा ॥ प्रार्थुनि ह्मणती जावया दाखवि द्वारा ॥ तिनें सांगतां सर्व वानर नेत्रपाती लाविती ॥ नारायण कृपें नयन उघडितां सागरतिर पावती ॥ ३ ॥

॥ पद ॥ १५ ॥

( राग—मुलतानि. ताल—धुमाळी. चाल—गव्यानों कृष्ण गडी. )

घेउनियां वानरपरिवारा ॥ मारुति ये सागरतीरा ॥ ध्रु० ॥ सर्वहि विचारिति बुद्धी ॥ न लगे आजूनिया शुद्धी ॥ उरली अल्प कीं हो अवधी ॥ दुस्तर तरवेना उदधीं ॥ मरण सर्वांही येकसरा ॥ मारु० ॥ १ ॥ मग ते रामस्मरण करुनि ॥ रिघती अंबुधिच्या जिवनीं ॥ देखे संपाती दुरुनि ॥ सांगे सर्व वृत्त नमुनि ॥ ऐका विचार या ह्मोरा ॥ मारु० ॥ २ ॥ येथुनि शतयोजन दूरी ॥ लंके रावण राज्य करी ॥ त्याणें न्हेली सितासुंदरी ॥ आणितों सपक्ष होय जरी ॥ वदतां पंख फुटति त्याला ३ ऐकोनि हर्ष भरे उत्पती॥जयजयकारें नभ भरिती ॥ कोण लंघिल हा नदीपति ॥ सर्वी प्रार्थियला मारुती ॥ नारायण जोडितसे त्या करा ॥ ४ ॥

पद ॥ १६ ॥

(राग—आनंद बहिरवी. ताल—धुमाळी. मनुष्या तू शरण आई)

लघुवेष धरुनिया शोधी ॥ पवनतनय जनकसुतेला ॥ ध्रु० ॥ चालताचि लंकाभुवनीं ये क्रौंच्या राक्षसी खाया॥ जेवि मस्य गळातें मुलुनि गिळि तेवि महाकपिराया ॥ उदरांत शिरुनिया नखेरें कपि लागे मर्म चिराया॥( चाल )मुखीं नाकीं पुच्छ तो भवंढी ॥ तेणें राक्षसी झाली वेडी ॥ उरीं अंतरमाळा तोडी ॥ तिस वधुनि जाय लंकेला ॥ १ ॥ हुडकितां पुरीं चौहाटी न लेगीच सिता प्रभुजाया ॥ उद्विग्नचित्त होउनि तो मनिं ह्मणें धांव रघुराया ॥ मग युक्ति योजुनि लागे नगरांत कळी लावाया ॥ ( चाल ) येति नर नारी उदकासी ॥ अडवूनि पुच्छ पायासी पाडितां रडती आक्रोशी ॥ करि गुप्तपणें लीलेला ॥ २ ॥ राहुनी दूर स्थिति मांडी नगरांत कलह नृपद्वारीं ॥ थोर अमात्य सिबिकेमाजि बैसोनि येति दरबारी ॥ कर्णांत पुच्छ घालीतां दचकती भोइ चौपारी ॥ ( चाल ) पालखी भूमिवर पाडी ॥ कोपोनी सचिव त्या ताडी ॥ मनीं लज्जा झाली गाडी ॥ असे नेणों किति संख्येला ॥ ३ ॥ उत्पात असे बहु होता भय पावुनिया जन बोले ॥ रावणें सिता या लंके आणितांचि हें उद्भवलें ॥ लंकेंत जानकी आहे हें जाणुनियां कपि डोले ॥ ( चाल ) हनुमंतें निश्चय करुन ॥ देवारि ह्मणे गांजीन ॥ प्रभु नारायण भवतरुनी ॥ तो पुरवी दासाशेला ॥ ४ ॥

पद ॥ १७ ॥

( राग–जोगी–ताल–धुमाळी. )

कपि ये मंडोदरि सदनांत॥शोधित प्रभुदारा ॥ ध्रु० ॥ सभे पावुनिया अपमान॥रावण महालीं आला जाण॥लगबग उठोनि स्त्री सुजाण ॥ पूजी प्राणनाथासी ॥ १ ॥ ठेवित पतिचरणीं माथां कपींद्रा वाटलि हेचि सिता ॥ झाली वश कीं या अहिता ॥ वधूं आतां दोघांसी २॥ ऐसें चिंतुनिया हृदयांत॥ हनुमान कोपे जेवि

कृतांत ॥ परि करि क्रोध विचारें शांत॥काय अशांत ते बोले॥३ स्वामी आणुनि परदारा ॥ अशोकीं ठेविलें किं मम वरा ॥ पाहिलें दुष्ट स्वप्नीं हेरा ॥ स्मरिजे नारायण प्रभुसी ॥ ४ ॥

पद ॥ १८ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

सांग बा मारुति किं मजला॥कधीं भेटेल रघुपती ॥ ध्रु० ॥ साधुस छळिलें ॥ मज फळ आलें ॥ वनीं राक्षस गर्जती ॥ १ ॥ विन अपराधी ॥ वचनें निरंतर ॥ छळिला उन्मिळापती ॥ २ ॥ येका जनार्दनीं ॥ आश्रय तुमचा ॥ दे साधुचि संगती ॥ ३ ॥

पद ॥ १९ ॥

( राग—झिंजोटी. ताल—धुमाळी. चाल—हरिशी सततभ )

सिते जननि क्षुधित असे मी जाउं कसा उपवासी हो ॥ देइं कांहीं फळ मुळ खाया असेल जें तुजपासी ग ॥ ध्रु० ॥ ह्मणे सिता बा अंजनिसुता मी कैवळ हतभागीरे षड्रस भोजन न देववे तुज धिक्‌परवशता लोकांरे ॥ १ ॥ नाना जाती सुफलित तरु हे रक्षक राक्षस असतिरे ॥ भक्षितील तुज हस्त लाविता पडेन शोकावर्तीरे ॥ २॥ यास्तव तरुतळीं मळति फळें जीं खाउनी क्षुधेसि वारीरें ॥ श्रीरामाची आण असे तुज जरि चढसी तरुवरती रे ॥ ३ ॥ ऐसी आज्ञा होता मारुति आनंदें बहु नाचेरे॥तैसा नारायण गुण गाउनि दिनमणी कुलजनाचे हो ॥ ४॥

पद ॥ २० ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळी चाल—गब्बानों कृष्ण गडी.)

परिसुनि रविसुत वचनाला ॥ मारुति बाळरूप झाला ॥ ध्रु० ॥ दिव्य जो बाळ ब्रह्मचारी ॥ दश वर्षे वयस्वी कारी ॥ स्वर्णमय यज्ञोपवितधारी ॥ मौंजि नेटकी शोभति भारी ॥ स्वर्णमय कौपिन हो ज्याला ॥ १ ॥ नमितां उत्थरती ज्याला ॥ नमी तो

रामपदाब्जला ॥ मधुरोक्तिनें राघवाला॥स्तवुनि तोषवि लक्ष्मणा-ला ॥ पुसे मग कोण कोठुनि आला ॥ ॥ २ ॥ मी मारुतसुत मन्माता ॥ अंजनी सती जगविख्याता॥हनुमान्नामें मज आतां ॥ वंदिति जी तुह्मि कोठें जातां ॥ मग वदे राम बाळकाला ॥ ३ ॥

॥ पद २१ ॥

( राग—यमनकल्याण. ताल—धुमाळी. चाल—सगुण माया आलि. )

मारुतिराया॥नमितों मीं तुझिये पायां ॥ ध्रु ॥ जन्मुनि अंजनिचे कुसी ॥ साह्य केलें श्रीरामासी ॥ द्रोणागिरि आणुनि वाचविसी॥ लक्ष्मण काया न० ॥ १ ॥ शिक्षा लावुनि अहीमहीसी ॥ राघव सोडविसी॥मारुनि राक्षसकुळ सोडविसी॥राघव जाया॥न० ॥ २ ॥ ऐसा पुरुषार्थी तूं भला॥ह्मणउनि मी प्रार्थितसे तुजला॥ दे मति त्या बाळकृष्णकविला॥हरिचें यश महिमा गाया ॥न०॥३॥

पद ॥ २२ ॥

( राग—भैरवकालंगडा ताल—धुमाळी. चाल—कैशी मज सखी दमयंती. )

तो म्या प्रभुदास मारुती नमिला ॥कारि लंके लीला॥गुप्तपणें सर्वत्र फिरुनियां॥शोधितसे श्रीरामसतीला ॥ ध्रु० ॥ पाहतां राक्षस-गोपुरें सारीं ॥ घटकर्णमंदिरीं ॥ देखे विक्राळदेह तो भारी बहुनिद्राभरी ॥ नासिकास्वासगत स्वापदगण किंकाळती ॥ मनीं विस्मय कपिला बहु झाला॥ तो म्या०॥१॥ परते अंजनिसुत मग तेथुनि ये बिभिषणसदनीं॥तेथें हरिकीर्तनघोषध्वनी॥कपि नाचे रंगूनि॥अक्षय राज्यीं बिभिषण स्थापावा हा तेव्हां निश्चय हो वरिला ॥ २ ॥ ऐसा गज अश्व नाटकशाळा ॥ अतिचित्रविशाळा ॥ शोधी परी न मिळे ते नृपबाळा, जे धन्य सुशीळा॥येउनियां मग राजसभेप्रति दावित विक्रम राक्षसपतिला ॥ ३ ॥ बसल्या घन-दाट निशाचरपंक्ती, मधें शोभे नृपति ॥ दिपिका बहु लक्ष फांक-

ती ज्योती, सुर सेवें टपतो॥नारायणभजनाविण मारुति, मानितसे ला ॥ रावणसंगतिला तो म्यां प्रभुदा ॥ ४ ॥

पद ॥ २३ ॥

( राग–सिंधु. ताल–धुमाळी. चाल–भजोरे भय्या राम गो० )

मारुति हा श्रीरामाचा दास ॥ ध्यावा मनीं मारुति हा ॥ ध्रु०॥ कुंडलमंडित पितांबर कटी॥गर्भीहुनि सुवर्णाची कास॥ध्यावा० ॥ ॥ १ ॥ वान्नरवर्पे ह्या बळसागरें॥भेदियेलें सूर्यमंडळास॥ध्यावा० ॥२॥ अणिमादिक ह्या सिद्धी कर जोडुनि ॥आल्या यात्याची न मा हेरास॥ध्यावा ॥ ३॥ रामभजनपर दास निरंतर॥ सांभाळितो धराति कास॥ध्यावा मनीं ॥ ४ ॥

# पदें कृष्णाचीं.

पद ॥ १ ॥

(राग–केदार. ताल–एका.)

कंजनयन गोपाल ॥ भज भज भज सार्वकाल ॥ ध्रु० ॥ पिच्छोच्छलितावतंस ॥ गुंजगुच्छविलसदंस ॥ पिच्छिल तापिच्छ कंस ॥ कंसगिलनकाल ॥ कंज० ॥ १ ॥ हल्लक-नवपल्लव-पद ॥ मंदस्मितफुल्लगल्ल ॥ बल्लवकुलवल्लभ जो ॥ मल्लदमन सुभगभाल ॥ कंज० ॥ २॥ हट्ट त्यज धैर्य धरीं ॥ घट्ट संतपाय धरीं॥चट्ट दुरित गट्ट करिल ॥ पंत विठ्ठलाधिपाल ॥कंज०॥ ३ ॥

पद ॥ २ ॥

(राग–जोगी। ताल–धुमाळी. चाल–मजला वरिल सुभद्रा.)

कृष्णा कां मजवरि रुसलास॥सखया बोलाकीरे ॥ध्रु० ॥नाहीं मर्दियेले तव पाय ॥ दिधली नाहीं दुधाची साय ॥ सर्वहि क्षमा करुनि अन्याय ॥ आतां खाय पोटभरी ॥ कृष्णा० ॥ १ ॥ तुजला बांधियेलें उखळास ॥ दिधला निष्ठुरवचनें त्रास॥ दिधला

नाहीं मुखांतिल ग्रास ॥ म्हणोनि उदास झालासी ॥ कृष्णा० ॥ २ ॥ कैसा करूं हा संसार ॥ घालूं कोणावर हा भार ॥ तोडि कंठातील मणिहार ॥ दुःख अपार किती वर्णूं ॥ कृष्णा० ॥ ३ ॥

पद ॥ ३ ॥

( राग-झिंजोटी. ताल-दादरा. )

माझी लाज तुला यदुरायारे ॥ येई धांवत साह्य करायारे ॥ ध्रु० ॥ पडतो मी पाया चुकवि तूं अपाया ॥ येऊं दे या दिनाची मायारे माझी० ॥ १ ॥ प्रियसुतजाया मिळती गिळाया ॥ योजिती दुरितासि करायारे ॥ माझी० ॥ २ ॥ जन्मुनि वायां शिणविली काया ॥ मांडिले तव गुण गायारे ॥ माझी० ॥ ३ ॥

पद ॥ ४ ॥

( राग-जोगी. ताल-धुमाळी. चाल-मजला वरिल सुभद्रा काय. )

देवा भक्तवत्सला गा ॥ बारे यदुराया ॥ ध्रु० ॥ आलों गंगेच्या उदरास ॥ जरि मी याच चरणाचा दास ॥ तरि आजीच्या प्रसंगास ॥ धरविन स्वास चक्र करीं ॥ देवा० ॥ १ ॥ माझे केवळ शर हे-काळ ॥ हें तों पार्थ अल्पसें बाळ ॥ तूं तों भक्ताचा कनुवाळ ॥ करिं सांभाळ सर्वस्वें ॥ देवा० ॥ २ ॥ देवा आजिच्या समरांत ॥ घातला वत्स तुझे पदरांत ॥ आतां याचा जो कुशलार्थ ॥ धरिं चित्तांत पूर्णपणें ॥ देवा० ॥ ३ ॥ ऐसें वदतां भीष्म दुरंत ॥ कैसा काय होईल पंथ ॥ चित्तीं व्यग्र होय भगवंत ॥ विठ्ठलपंत शंतम जो ॥ देवा० ॥ ४ ॥

पद ॥ ५ ॥

( राग-देस. ताल-त्रिवट. ]

जयजय श्री बालमुकुंदा ॥ मै हऊं चरणरजबंदा ॥ ध्रु० ॥ देवकीके घर जन्मलियो जद ॥ छूटपरे सब बंद ॥ चरण० ॥ १ ॥ मथुरा त्यजे हरि गोकुल आये ॥ नाम धरे जदुनंद ॥ चर० ॥ २ ॥

जमुनातीर कुदपरो हे ॥ फनपर नृत्य करंद ॥ चर० ॥ ३ ॥ सूरदास प्रभु तुह्मारे दरसकुं ॥ तुम ही आनंदकंद ॥ च० ॥४॥

पद ॥ ६ ॥

( राग–जिल्हा. ताल–दादरा. ( नको नकोबांसंग-या चालीवर. )

कुंद दंत, मंदहास्य नंदकंद हे मुकुंद कंसकंदना ॥ धृ० ॥ वंदिता तुला लयास जाति यातना ॥ निगम असें गर्जतात हीच भावना ॥ धरुनि मनीं बुधजन तव करिति पूजना ॥ गाती, ध्याती, स्तविती, सकल पूर्ति सगुणमूर्ति रुचिर कीर्ति हे दयाघना ॥१॥ कुंद० ॥ व्यसनवन्हि जाळितसे आमुच्या मना ॥ चिंतोदधि खवळुनि ने धुवुनि बल धना ॥ परवशता वायु हरी प्राणबंधना ॥ गेली, हरली, अस्मन्मति, सद्गुणतति, सकलनीति ॥ काय या क्षणा ॥ २ ॥ गोपसख्या कोपं टाक पाहिं नतजनां ॥ कोण तुझ्यावीण करिल पूर्ण कामना॥ कृपादृष्टि सतत ठेवि ह्मणुनि याचना ॥ करितों, धरितों, स्मरतों, तव चरणां, हे करुणा–जळवरुणा, पतितपावना ॥ ३ ॥

पद ॥ ७ ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. चाल–भजोरेभयाराम. )

कृष्ण मेरे नजरोंके आगे॥ठाडे आगे रहोरे ॥ धृ० ॥ मै जो बुरी श्याम अंदर भलाहै ॥ भली की बुरी मोरे शब्दमो सारे ॥ ठाडे० ॥१॥ प्रीतको पैंडों बहोत कठिणहे ॥ चार कही दस आवर कहोरे ॥ ठाडे ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरधरनागर ॥ प्रीत करे तो मेरा बोल सहोरे ॥ ठाडे० ॥ ३ ॥

पद ॥ ८ ॥

( राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. चाल–जामकोजीवमनीं आला गे. )

सांवळा नंदाचा मूल खोटागे ॥ अहोबाई० ॥ धृ० ॥ मिळुनियां गौळणी मथुरेसी जाता ॥ आडवूनि धरितो चारि वाटा गे॥अ०१

दाई दुधलो णी चोरूनि खातो ॥ काय याच्या नगरा आला तोटा ग ॥ अ० ॥ २ ॥ दिनरजनीं याला हाचि हो धंदा ॥ आ-म्हांलागी याचा जाच मोठागे ॥ अहोबाई० ॥ सावळा० ॥ ३ ॥

## पद ॥ ९

(राग—कल्याण. ताल—एका. चाल—संतपदाची जोड०)

किसनजी पैरे मोतनका तुरा ॥ ध्रु० ॥ भक्तवत्सल तुमे क-रुनासागर हो ॥ कृपा करे मुजकूं पैया थारा ॥ मै हुजुरा तेरा ॥ तुं प्रभु मेरा ॥ १ ॥ अंबऋषीका गर्व जो घारा ॥ देवकी सुख-किनो दैत्य संहारा ॥ दुर्जन मारा भक्तन तारा ॥ २ ॥ लंका नाथजी प्रौढ जो भया हो ॥ राम अवतार ले रावन मारा ॥ अहिल्या तारा बिभीखन तुरा ॥ ३ ॥ गोकुळ म्यानें गजबज उठले हो ॥ कृष्णानें वधिलें कंस चाणुरा ॥ द्रौपदी कैवारा ॥ कुबजा उद्धारा ॥ ४ ॥ पंढरिनाथका दास लागे पैया हो ॥ कृपा करे तुज पैया थारा ॥ मै तेरा छोरा ॥ लेव मेरा मुजरा ॥ ५ ॥

## पद ॥ १० ॥

(राग—पिलु. ताल—दादरा. चाल—भज भज भवजल.)

कशि मोहनी घातली नंदाचे काना ॥ ध्रु० ॥ तुझा कान्हा पहा आहे निसंग ॥ मी न धरी तयाचा संग॥ गोकुळांत उडवितो रंग ॥ सांवळी मूर्त पहाना ॥ १ ॥ गवळणी जाती यमुने तिरीं ॥ वाटे मध्यें आडवूनि धरी ॥ रंग भरुनि मारी पिचकारी ॥ चुंबन घे-ऊन सोडीना ॥ २ ॥ भुलवुनि आणि गौळयाच्या पोरी ॥ यमुना किनारी खेळे होरी ॥ धरुन करी आमुची मस्करी ॥ करितो धिंगाणा ॥ ३ ॥ येशोदेशीं करिती वीनंती ॥ आता नाहीं आ-मुची गती सोडूं गोकुळ सत्वरगती ॥ दास लागे चरणा ॥ ४ ॥

## ॥ पद ११ ॥

(राग—मुलतानी. ताल—धुमाळी. चाल—दिंडिची.)

कृष्णरत्न हातींचें कोणें नेलें रे ॥ नेणों कोणतें हें कर्म आड आलें रे ॥ स्वर्गीं देव गंधर्व रडतातीरे॥पशु पक्षी ही वनीं लोळतातीरे॥ १ ॥ कैसें जावें येथुनि गोकुळांतरे ॥ जेथें नाहीं माझी कीं कृष्णनाथरे ॥ धावे धावे माधवा भेट देईरे ॥ दासाकडे तूं कृपादृष्टी पहोरे ॥ कृष्ण० ॥ २ ॥

पद ॥ १२ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. बोबडा. )

कुतना थमालले थमाल आपुल्या गाई॥आह्मी दातोले आपुल्या घलासी दातों भाई ॥ येथें लायाता आमता इलाद नाहीं ॥ तुजी थंगतले थंगत कलली भाई ॥१॥कुतना थमालले आपुल्या गाई॥ धृ० ॥ तुह्मी थोलल्या पातलाचे लेंक ॥मला ह्मनतां ले जाई गाई राख ॥ किती मी धांउं ले कांता लागला पाई ॥ लागला पाइ कु० ॥ २ ॥ काली पीवली ले गाई आहे तानेली ॥ या या गवल्याची धवली गाय पलाली ॥ मदला बघून ले गवली तो माला माली ॥ कानी कामली हिलून घेतली साली ॥ घेतली साली॥कुतना० ॥ ३ काल भलाचि ले भलाचि खलवस केला ॥ तुह्मी अवघ्यांनीं फाल फाल घेतला॥मी नीपजत ले ह्मणुनि थोलका दिला॥ तूं ह्मनसील ले याला कलत नाहीं कांहीं॥कलत नाहीं काही॥कुतना० ॥ ४ ॥ यमुना तीलीं ले नित कलिती आंघोली ॥ मजला ह्मनतां ले जाई आनि सीदोली॥कईची आनु ले वलन आनि भाकली॥ माजा लवलाले काम आइकतो भाई ॥ आईकतो भाई ॥ कुतना० ॥ ५ ॥ कृष्णह्मणे रे उगा राहिं बोबड्या ॥ तुझ्या गाईरे मीच वळवितों गड्या ॥ नाहीं तरि धाडिनरे गोपाळांच्या जोड्या ॥ नामा ह्मणे रे गोष्ट रोखडी पाहीं ॥ रोखडी पाहीं॥कुतना६ ॥

पद ॥ १३ ॥

( राग—यमनबिलावर. ताल—त्रिवट. )

श्री किसननें मुरली बजाई ॥ ग्वाल बाल सब मोही ॥ ध्रु० ॥ मथुरा नगरमें ग्वालन मिलके गोरस बेचन आई ॥ कृष्ण येई गोरस खाई ॥ थट्टा करुनिया जाई ॥ श्रीकीस० ॥ १॥ ग्वालन उठके धुंडे गोकुल कहीं पत्ता लगता नहीं ॥ जाऊन सांगे यशोवदे पाशीं ॥ आतां त्या समयीं ॥ श्री० ॥ २ ॥ मीरा कहे गिरीधरनागर ॥ प्रभुके चरणा चित्त ठाई ॥ लगता रखना मात्र भक्तिसें इससें धन्यता होई ॥ श्री० ॥ ३ ॥

पद ॥ १४ ॥

( राग–कल्याण. ताल–एका. चाल–संतपदाची जोड. )

नेऊं नको यदुवीर ॥ अक्रुरा नेऊं नको य० ॥ ध्रु० ॥ नंदज सोमती भाकिति करुणा ॥ बाल्यदशा नाहीं थोर ॥ अक्रुरा० ॥ १ ॥ कंस दुरत्यय निशिदिनीं जपतो ॥ घातकी तो निष्ठुर ॥ अ० ॥ २ ॥ अक्रुर नाम तुझें जगीं बोलति ॥ परि करणी दिसे क्रूर ॥ ३० ॥ अमृतमतिनें पाहुनिया अक्रूर ॥ प्रेमें बैसला स्थीर ॥ ४ ॥

पद ॥ १५ ॥

( राग–जिल्हा ताल–त्रिवट. चाल–बन्सीवालायार )

यशोदे तुझा कृष्ण हरि ॥ गोकुळांत फंद करि ॥ गवळणीच्या जाउनी घरीं ॥ दहीं दूध याची चोरि करी ॥ ध्रु० ॥ मिळवुनि गौळणीचा थाट ॥ चढती यमुनेचा घाट ॥ आडवितो आमूची वाट ॥ करितो गेहा मस्करी ॥ १ ॥ संगे घेऊनियां गोपाळ ॥ हिंडतसे हा रानोमाळ ॥ करितो आमुचे बहु हाल ॥ सोसावे हो कोठवरी ॥ ३ ॥ गुण त्याचे मी सांगूं किती ॥ सांगतां मसी वाटे भीती ॥ वाईट आहे त्याची रीती ॥ ऐसा ब्रह्मचारि ह्मणती ॥ ३ ॥ गवळणी होऊनियां लीन ॥ जाती हरिलागीं शरण ॥ क्षमा करिजे मनमोहनें ॥ दास चरण ते धरी ॥ ४ ॥

पद ॥ १६ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. चाल–माझा कृष्ण देखिला काय. )

माधवा योग्य तुला हें काय ॥ सखया बोलकीरे ॥ ध्रु० ॥ वेदिंति ब्रह्मादिक तव पाय ॥ तो तूं मत्पदीं लिन हें काय ॥ ह्मणती तुजला हे सुरराय ॥ दैन्य गाय मीं झालों कीं ॥ माधवा० ॥ १ ॥ उठ आतां बहु झाला वेळ ॥ बापा तुझाचि सारा खेळ ॥ भेटे मन करूनि उतावेळ ॥ न करीं हेलना माझी ॥ मा० ॥ २ ॥ देवा करि इतका उपकार ॥ काढी चरणावरचा भार ॥ लाज वाटते दयाळा फार ॥ करि भवपार येथुनिया ॥ माधवा० ॥ ३ ॥

पद ॥ १७ ॥

(राग–पूर्वी ताल–त्रिवट.)

शाम मुरली बजाई ॥ कुंजनमो ॥ ध्रु० ॥ रामकली गुजरीगांधारी ॥ लाला बिलावल भयरोमें ॥ मुरली सुनत मोरी सुदबुद खोई ॥ भूल पडी घरदारोमें ॥ १ ॥ मीरांके प्रभु गिरिधरनागर ॥ वारि जाऊं तोरे चरननमो ॥ शाम० ॥ २ ॥

पद ॥ १८ ॥

(राग–झिंझोटी. ताल–धुमाळी. चाल–अंजनीगीत.)

मुक्ताफळ नथ नाकीं ॥ चरणीं ल्याली वाळे वांकी ॥ पीतांबरें अंग झाकी ॥ कृष्णायी माजी ॥ ध्रु० ॥ खांद्यावरी घावळी ॥ पांयघोळ लांबली ॥ पांघरली कांबळी ॥ कृष्णा० ॥ १ ॥ गाई पाठीं लागली ॥ पळतां नाहीं भागली ॥ मायबहिण चांगली ॥ कृष्णा० ॥ २ ॥ देहुडा पावली ॥ उभी माझी माउली ॥ विश्रांतीची साउली ॥ कृष्णा० ॥ ३ ॥ उभा नीट विटेवरी ॥ उभा भिवरेचे तीरीं ॥ नामयाची कैवारी ॥ कृष्णायी माझी० ॥ ४ ॥

॥ पद १९ ॥

(राग–जोगी. ताल–धुमाळी. चाल–माधवा योग्य०)

माधवा राहे निजसदनीं ॥ तुजला सांगु किती ॥ ध्रु० ॥ देत्यें मधुपय दधि नवनीत ॥ ऐकवित्यें मी सुस्वर गीत ॥ कथित्यें तुज

वडिलांची रीत ॥ ऐसें विपरीत करूं नको ॥ माध० ॥ १ ॥ एक ह्मणती फोडिला माठ ॥ एक ह्मणती पोर अचाट ॥ सर्वहि सांगताति बोभाट ॥ पाहत्ये वाट नंदाची ॥ माध०॥२ ॥ जरि कां एक हें तव तात ॥ मारिल फारचीं बांधुनि हात ॥ नेउनि कोंडील तळघरांत ॥ मोठा घात करतिल बा ॥ माध० ॥ ३ ॥ऐसा झाला व्याकुळ प्राण ॥ पाहुनि बोले कृष्ण सुजाण ॥ आतां न करि खरेंचि जाण ॥ वाहतों आण पायांची ॥ माध० ॥ ४ ॥

पद ॥ २० ॥

( राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. चाल–राहि राही मानवा गुरु. )

राहिं राहिं माधवा घरीं राहिरे ॥ ध्रु० ॥ तुज आवडे ज तें मी देईनरे ॥ तुज वांचुनि मज कोणी नाहींरे ॥ राहि राहिरे०॥ १॥ अर्धक्षण जरि तुज न पाहिलें ॥ मग मज गोड न लागे कांहिरे ॥राहि राहिरे० ॥ २ ॥ पोटीं धरूनि ह्मणे रडूं नको आतां॥हास्य करूनि मजलागीं पाहिरे ॥ राहि राहि० ॥ ३ ॥ दास तुझे हे गोकुळवासी ॥ यांस सुख देईगा लवलाहिरे ॥ राहि० ॥ ४ ॥

पद ॥ २१ ॥

[ राग–झिंजोटी. ताल–त्रिवट.चाल–जलभरन जात. ]

काना कुबज्या संग रिझोरे ॥ काना मेरे कारि कामरियां ॥ध्रु० ॥ मै जमुनाजल भरन जात रामा ॥मेरे सिरपर घागरियां ॥१॥ मै जी पेहरी चटक चुनरिया ॥ नाक नथनिया बेसरीया ॥ का० ॥ २ ॥ बिंद्राबनके जो कुंज गलिनमो ॥ घेर लियो सब ग्वालनिया ॥ का० ॥ ३ ॥ जमुनाके निरतीर धेनु चरावे ॥ नाक नथ नीचे बेसरीया ॥ ४ ॥ सूरदासप्रभु तुह्मारे दरसनकु ॥ चरण कमल चित धरियां॥काना० ॥ ५ ॥

॥ पद २२ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. चाल–माझा भरत देखिला काय. )

माझा शाम देखिला काय ॥ कोणितरी सांगाहो ॥ ध्रु० ॥ आंगणीं खेळत होतें मूल ॥ त्याच्या हाति दिधलें म्या फूल ॥ सासुबाई सारविन होत्ये चूल ॥ पडली भूल मजलागीं ॥ माझा शा० ॥ १ ॥ गाई रडत आले गोपाळ ॥ बाळ खेळे आळो आळ ॥ गळा वैजयंतीमाळ ॥ कोठें पाहूं मूळ मुळ मुळ ॥ माझा शा० ॥ २ ॥ भाळीं शोभे पिंपळपान ॥ आंगीं मध्यें त्याचें वान ॥ त्यासीं ह्मणती श्रीभगवान ॥ उठली हूल हुल हूल ॥ माझा शा० ॥ ३ ॥ तयासि धुंडित असे माय॥मागें परतोनियां पाहे ॥ दास वंदि त्याचे पाय ॥ केशव चरणीं राह्य ॥ माझा शा० ॥ ४ ॥

पद ॥ २३ ॥ गुजराथी

[राग-पिलु ताल-त्रिवट. चाल-भजोरेभैया राम.]

कनयां सामळो मारी वात ॥ ध्रु० ॥ नंदका छोरा दधि दूध खावत ॥ मटकी लेकर हात ॥ कनया० ॥ १ ॥ गोधन चारत गोधन धूवत ॥ मुरली लेकर हात ॥ कनया० ॥ २ ॥ मोरमुकुट पितांबर शोभे ॥ हमसें करत नाच ॥ कन० ॥ ३ ॥ कहे तुकाराम नंदका छोरा॥बासरी बाजे दिनरात ॥ कनया० ॥ ४ ॥

पद ॥ २४ ॥

(राग-पिलु. ताल-त्रिवट. चाल-भजोरेभया राम.)

माते मजला गौळणी ह्यागे ॥ छळितानी फार ॥ध्रु० ॥ सातें पांच मिळुनि भवंनाल्या माझ्या ॥ आडवुनि लाविति द्वार ॥ १ ॥ मग ह्मणतानी थोर अससी तूं जरी ॥ होना बहु बरवा विचार ॥ मजला० ॥२॥ माणिकप्रभु ह्मणें या गौळणीसी ॥ लीला दावि विश्वाधार ॥ मजला० ॥ ३ ॥

पद ॥ २५ ॥

[राग-मुलतानि. ताल-त्रिवट.]

गडेहो कृष्ण गडी आपुला ॥ राजा मथुरेचा झाला ॥ ध्रु० ॥

टांकुनि काळा कांबळा ॥ कासे पितांबर कसिला ॥ टांकुनि मयूरपिच्छाला॥जडित मुकुट शिरीं घातला ॥ आतां काय वळखिल आपुल्याला ॥ राजा० ॥ १ ॥ काढिली गुंजाची दाटी ॥ घातला कौस्तुभ श्रीकंठी ॥ टाकुनि मुरली वेताटी ॥ हातीं घे आयुधें मोमटीं ॥ आतां काय बागुलभय त्याला ॥ राजा० ॥ २ ॥ गोधनें चारूं विसरला ॥ आतां तो नृपामध्यें शिरला ॥ नारींनीं उरीं धरुनि चुरिला ॥ आतां तो कुब्जेनें वरिला ॥ देतसे निजपद प्रेम्याला ॥राजा०॥ गडेहो कृष्णगडी आपुला ॥३

## पद ॥ २६ ॥

[ राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–अष्टमूर्ति परमेश सदा. ]

नायबा कुत्ना तूं एकला दा ॥ आह्मी नाय येत तुज थंगेले ॥ ध्रु० ॥ अतेत एकदां गौल्याघलीं ॥ झिंगली गाय व्याली ले ॥ थाल्या पोलांलां लयलय खलवस ॥मलाच थोला दिल्याति ले ॥ ना० ॥ १ ॥ कुत्ना अतेत एकदां यमुनातीर्लीं ॥ हुतुतु खेलत होतों ले ॥ ॥ साल्या पोलांनीं एकमत कलून ॥ मादाच पेंकात मोल्यानि ले ॥ ना० ॥ २ ॥ अतेत एकदां गौल्याघलीं ॥ चोली कलाया गेलों ले ॥ थाले पोल पलून गेले ॥ मादाच तालक्यां फोलल्यानि ले ॥ ३॥ अतेत एकदां यमुनातीलीं ॥ केलाया गेलों ले॥थाल्या पोलांनीं एकमत कलून॥ मलाच धकलुन दिल्यानि ले ॥ ना०॥ ४ ॥

## पद ॥ २७ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. ]

गोविंदा गोपाळा कृष्णा गोपीजननाथा ॥ गोवर्द्धन-धर गोरसरसिका गोड तुझ्या गाथा ॥ ध्रु० ॥ अहिपतिशयना अंबुज-नयना अपारगुणराशी ॥ असुरविदारा अमरोद्धारा अखिलांतरवासी ॥ अद्भुततेजोरासि देवा लागो पायांसी ॥ गोविंदा० ॥ १

पापविनाशक पावन-नामा पालित-निजदासा ॥ पामर-जनपरिपालनचतुरा पंकजिनी हंसा ॥ तारिं मला भव-पाश विदारुनि तूं पय मी मासा ॥ गो० २॥ माधवराया मानुष-वेषा मुनि-मानस हंसा ॥ माझे सर्व मनोरथ पुरवीं मोहमदध्वंसा ॥ मागितला आनंदमुनें वर यदु-कुल-अवतंसा ॥ गोविंदा० ॥ ३ ॥

पद ॥ २८ ॥

( राग—कालंगडा. ताल—त्रिवट. )

माई मैंने गोविंद लीन्हा मोल॥ध्रु०॥कोई कहे हलका कोई कहे भारी ॥ लिया हे तराजु तोल॥मा०॥१॥कोई कहे ससता कोई कहे महेगा॥कोई कहे अनमोल ॥मा०॥२॥ बींद्राबनके जो कुंजगलीनमो॥लीयाहै बजाके ढोल ॥मा०॥३॥मीराके प्रभु गिरधरनागर ॥ पुरब जनमके बोल ॥ माई मैने० ॥ ४ ॥

पद ॥ २९ ॥

( राग—कालंगडा. ताल—त्रिवट. चाल—दत्तात्रयाश्रिपाद. )

चल जाऊं साजणी श्रीहरिकडे ॥ कां इकडे तिकडे गडे गमसि चहुंकडे दडसि वेडे ॥ ध्रु० ॥ मुरलीधर मुरलिच्या नादें भरी वृंदावन करि पदपावन ॥ बससि काय यदुरायपाय मज माय दाखविं चागिन मृदु पेढे ॥ चल० ॥ १ ॥ सासू काय करि नणंद जाव नरि दीर मला उंदीर गमतसे ॥ धीर धरुनि चल नीरज-नयनें उसिर होतसे भिसी काय वेडे ॥ चल० ॥ २ ॥ आसपास जन हांसति ह्मणवुनि रासमंडळी विलास विवर्जिसी ॥ कासयासि हे चारु कुसुमशर मार फार मज नावडति विठ्ठल विभु चेडे ॥ चल० ॥ ३ ॥

पद ॥ ३० ॥

( राग—पिलु. ताल—त्रिवट. चाल—भजोरेभया. )

गोविंदा पल्लव आमुचा सोड ॥ ध्रु० ॥ आमुच्या वाटे जाऊं न-

को तूं ॥ न करीं ओढाओढ ॥ गो० ॥ १ ॥ काय मागसी तें तुज देऊं ॥ दहिं दुग्ध गोरस गोड ॥ गो० ॥ २ ॥ यावरि आतां सो डिसी ना ॥ तरि मोडूं बा तुझी खोड ॥ गो० ॥ ३ ॥ उद्धवसुत ह्मणे दान तुं देई ॥ देहीं ताठा मोड ॥ गो० ॥ ४ ॥

पद ॥ ३१ ॥

( राग–ब्याहाग. ताल–त्रिवट. )

राधा प्यारे दे डारोजी बन्सि हमारी॥ध्रु०॥ ये बन्सीमे मेरा प्रान बसतहै ॥तो बन्सी गई चोरी ॥१॥ ना सोनेकी बन्सी ना रुपेकी ॥ हरे हरे बांसकी पेरी ॥ २ ॥ घडि एक मुखमे घडि एक करमे ॥ घडिएक अधर धरी ॥ ३ ॥ मीराके प्रभु गिरधरनागर॥ चरनकमलपरवारी ॥ राधाप्यारे दे० ॥ ४ ॥

॥ पद ३२ ॥

( राग–अडाणा. ताल–त्रिवट. )

मी जोडिन हरिसहवास ॥ व्रजवास त्यजुनि वनवास करिन कवणास न पुसतां ॥ मी० ॥ ध्रु० ॥ श्रवण सतत मुरलीरवयुत करि मानसहतगत मतिसहित तई पतिसहित जन शिकविति हित किती वंदु विपरित ॥ मी जो०॥ १ ॥ गृहीं कलकल करिति सकल तनुसकल सकल मन मदन विकल–मतिस–पटलतम करि तरि हे विठ्ठलवरद निरंतर ॥ मी जोडिन० ॥ २ ॥

पद ॥ ३३ ॥

[ राग–देस. ताल–त्रिवट. )

अक्रुरा नको मधुवना नेऊं ॥ आमुचा भगवान ॥ ध्रु० ॥ घात करुं इच्छी कंसासुर हा ॥ कोमळ मूर्ति लहान हरिची कोमळ मूर्ति लहान ॥ अक्रु०॥ १॥ मायबाप हंबरडा फोडिती ॥ हरणी धेनुसमान ॥ काननीं हरणी धेनुसमान ॥ अक्रु० ॥ २ ॥ अक्रुर अक्रुर अकांत करिती ॥ गोपी मागती दान ॥ दयाळा गोपी० ॥

अक्रु० ॥ ३ ॥ जयरामजयसुत गुप्तचि येउनि ॥ वदतसे हनु-
मान ॥ अक्रुरा० ॥ ४ ॥

पद ॥ ३४ ॥

[राग–कल्याण. ताल–धुमाळी. चाल–ते मज निरवधि आवडति.]

भक्ति आकळिला कृपाघन ॥ भक्ति आकळिला ॥ ध्रु० ॥ गोकु-
ळीं संकटीं स्वमुखें ज्याणें ॥ दावाग्नि गिळिला ॥ कृ० ॥ १ ॥
त्या भीमकिनें तुळसिदळानें ॥ गिरिधरप्रभु तुळिला ॥ कृ० ॥
२ ॥ अर्जुनरथीं सारथ्य करी हरी ॥ निज–पद दे बळिला ॥
कृ० ॥ ३ ॥ द्रौपदिसंकटीं धावुनि आला ॥ भीष्मानें पाहिला
॥ कृ० ॥ ४ ॥ विदुराचे गृहीं कण्या स्वयें भक्षी ॥ त्याला
तो विकला ॥ कृ० ॥ ५ ॥ व्यंकटसुत ह्मणे पाहुनि डोळां ॥
साधुचरणीं लागला ॥ कृ० ॥ ६ ॥

पद ॥ ३५ ॥

[राग–झिंझोटी. ताल–त्रिवट. चाल–रवे हा गोविंद राधे तुझ्या पदीं नेई.)

पदरीं धरुनी हरि आणागे बाई पदरी० ॥ ध्रु० ॥ शिरीं बांधि-
येला चिरा॥खोंवी मोतियाचा तुरा ॥ वरी झळकतो हिरा॥अमो-
लिक दाणागे ॥ प० ॥ १ ॥ येउनियां यमुनेस्थळीं ॥ खेळतसे-
चेंडुफळी॥तोचि तोहा हरि वनमाळी॥चतुर ही शाहाणा गे ॥ प०
॥ २ ॥ मत्स्य कूर्म नाना परी ॥ दशविध रूपें धरी ॥ अमृताचा
साह्राहारी ॥ सांगतसे खुणा हो ॥ प० ॥ ३ ॥

पद ॥ ३६ ॥

(राग–परज. ताल–त्रिवट. चाल–हमतो बैरागी बैरागी.)

बाई परिसावें हो २॥त्या तनयासि पुसावेंहो॥क्षणभरि स्वस्थ बसावें
हो॥ध्रु०॥ एक ह्मणें प्रति रूपें घेऊनि ॥ निजला हा शेजारींरे ॥
बाई० ॥१॥ निबिड अंधारी क्रिडत असतां॥मम कन्या जांवा-
ईगे ॥ सर्वजनासि दाखविलें तें ॥ लावुनियां हावाईगे ॥

बाई० ॥ २ ॥ आह्मीं उभयतां निद्रिस्त असतां ॥ अद्भुत विनोद केला गे ॥शेंडी वेणीशिं दृढ बांधुनिया॥आपण मारितसे हाके लागे ॥ बाई० ॥ ३ ॥एक ह्मणे माझें देवाजवळी ॥ करित-से लघुशंकेला गे ॥ बाई० ॥ ४ ॥ बाई यशोदे कोण मुहूर्ती प्रसवलीस तनयातें गे ॥ सांगावें किति बोलावें मारावें किति याला गे ॥ बाई० ॥ ५ ॥ भलतेंच वेळीं वत्सें सोडितो ॥ लघु मुलांस रडवितो गे ॥ दहिंदुध घेउनि मथुरेसि जातां ॥ लघु मुलास आडवितोगे ॥ ० ॥ बाई० ॥ ६ ॥ नानापरिचे त्रास देउनि ॥ आह्मीं रडतां हांसतो गे ॥ जसें याला कांहीं ठाउक नाहीं ॥ आतां हा दीन दिसतो गे ॥ बाई० ॥ ७ ॥

## पद ॥ ३७ ॥

( राग–मुलतानि. ताल–धुमाळी. )

गडे हो कृष्ण गडी आपुला ॥ यमुनाडोहीं बुडाला ॥धु० ॥ काळिया डसेल कृष्णाला ॥ होईल विषबाधा हरिला ॥ हाका मारिल आपुल्याला ॥ तुह्मी तरि स्वस्थपणें बसलां ॥ आतां कोण काढिलरे त्याला ॥ यमुना डोहीं बुडाला ॥ १ ॥ गाई त्याविण हंबरती ॥ वासरें स्तनपान न करिती ॥ यापरि गोप सर्व रडती ॥ मुखानें कृष्ण कृष्ण ह्मणती ॥ आतां काय भेटेल आंपुल्याला ॥ यमुना० ॥ २ ॥ यशोदा पुसेल जरि हरिला ॥ सांगो काय तरि तिजला ॥ नंद मज ह्मणेल त्वां मेला॥हलधर मा-रिल तो मजला ॥ आतां काय जावें गोकुळाला ॥ यमुनाडो० ॥ ३ ॥ दहीं दूध लोणी म्या हरिलें ॥ हरिला ताक बळें दिध-लें ॥ घेइना ह्मणोनि करिं धरिलें ॥ वृक्षीं बळकट बांधिलें ॥ ह्मणोनि मजवरी तो रुसला ॥ यमुना० ॥ काळिया धावुनियां आला ॥ बळकट कृष्णाला डसला ॥ त्याचे पाठीवर बसला ॥ ओझें झालें बहु त्याला ॥ ह्मणुनि पळत पळत आला ॥ भेटला

प्रेमाबाईला ॥ गडेहो कृष्णगडि आपुला ॥ यमुना० ॥ ९ ॥

पद ॥ ३८ ॥

(राग–झालंमजा. ताल–त्रिवट. चाल–अष्टमूर्ति परमेशा.)

पाउला–पाउलीं निज मनिं आंळवा सांवळा हो ॥धाळा त्या गोपाळा हृदयीं कवळा वेळोंवेळां हो ॥ ध्रु० ॥ दारा धन मति सारा मग तुझीं ताराया संसारा हो ॥ नारायण–सुख–सारा वांचुनि ॥वारा न करा थारा हो ॥ पा० ॥ १॥ भंगा कलिमल संगा हृदयीं ॥ आलिंगा श्रीरंगा हो ॥ रंगा मनिं भवसंगा टाकुनि ॥ अंगा काल विहंगा हो० ॥ पा० ॥ २ ॥ तूं धाया मतिमंदा त्यजुनि निंदा कुश्चल धंदा हो ॥ वंदा या आनंदात्मज सुखकंदा–नंद–नंदा हो० ॥ पा० ॥ ३ ॥

पद ३९ ॥

(राग–पिलु. ताल–त्रिवट. चाल–भजारे भय्यां रामगो.)

हममत छोडो कनया ॥ कनया लागु तेरे पैया ॥ ध्रु० ॥ मन मोहन धेनु चराये ॥ गला वैजयंती माला ॥ बिंद्रावनमें धूम मचावे ॥ गोपिका मतवाल ॥ १ ॥ सब सखीयन मिल ॥ पानियां भरन गई ॥ व्हांको मिले गिरिधारी ॥ परनारीना पालव पकडे ॥ क्याकरे मनवाबिचारी ॥ २ ॥ आसपास गोपाल खडे है ॥ बीच ठांड गिरिधारी ॥ मधूबनमें जाके किसनजी ॥ छेड मवालन सारी ॥ ३ ॥ तुलसिदास प्रभु आव क्या जैये ॥ आन मिली व्रजनारी ॥ गोकुलका है पालन हारा॥देखो मदन मुरारी ४

पद ॥ ४० ॥

[राग–बिभास. ताल–भजनी. चाल–रामकृष्ण नगरी.)

गोविंदाचे गोविंदाचे येरे बा गोविंदा ॥ लवकर धांव तूं स्कंदा ॥ धरून त्याचे चरण वंदा ॥ १ ॥ गोविंदा दिनाचा कृपाळु ॥ संगें गोपाळांचा मेळू ॥ गाई म्हैशी आणिल्या वळू ॥ २ ॥ कुंज

वनांत वाजवी वेणू ॥ ऐकुन मोहित झाल्या धेनू ॥ माई चारितो तेथें कानू ॥ ३ ॥ धन्य गोकुळिचा धनी ॥ खेळतसे वृंदावनीं ॥ दास लागे तुझ्या चरणीं ॥ गोविंदा० ॥ ४ ॥

पद ॥ ४१ ॥

[ राग कल्याण. ताल त्रिवट. चाल—रामकथारस पी पी. ]

अजुनि कां नये बोल सये हरि॥आजुनि कां नये बोल ॥बोलसि बोल सखोल ते बोलसि॥झाले सर्वहि फोल ॥ ध्रु० ॥ तो तुजलागीं कदापि न सोडी ॥ सुललित—वक्र—कपोल ॥ तुंच वदत होतिस पहा पहा॥तुझि आणि त्याची झोल० ॥ सये० ॥ १ ॥ शृंगारुनि मुख॥सुरुचिरतर नग॥लेवविलोसि अमोल ॥ नंद—नंद—मुकुंद—पदा—विण॥गमति मला काकोल ॥ सये० ॥ २ ॥ सये म्या तुझिया वचनीं दिधला ॥ दृढ सर्वस्वें डोल ॥ कार्य घडोनि मम कां वांजना ॥ विठ्ठलवचनीं ढोल ॥ सये आजुनि कां नये॥३॥

पद ॥ ४२ ॥

( राग—जिल्हा. ताल— त्रिवट. चाल—बन्सीवाला यार. )

नको छंद घेउं कृष्णा ॥ आलारे बागुल बावा ॥ ध्रु० ॥ दशभुज पंच मुखें माथां मोठा जटाभार ॥ गजचर्म पांघुरला कंठीं वेष्टि व्याघ्रांबर ॥ विभूति चर्चिली आंगीं नीलकंठ दिगांबर ॥ त्रिलोचन उग्ररूप भयंकर आ बा बा बा. ॥ नको० ॥ १ ॥ घर धणी येति आतां भोजना सत्वरि घरीं॥पाकनिष्पत्ति जे त्वरें केलि पाहिजे कीं बरी ॥ जिलिब्या दळिया मांडे दुधपाक शिरा पुरी ॥ ताताचिये तार्टि जेवीं संगीं बैसुनीयां बाबा ॥नको०॥२॥ उगा उगा नाहीं तरी बोलवितें बागुलाला॥ येईरे बागुला ह्मणतां गौरिवर द्वारीं आला ॥ डुगु डुगु डुगु डमरू शिंगी—नाद आंगणांत केला ॥ आरूढला नंदिवरी अर्द्धांगीं ते जगदंबा ॥ नको० ॥ ३ ॥ कृष्णा घेऊनियां कडिये यशुमति द्वारीं आली॥

होईल जोग्याची दृष्टी बाळासि ह्मणुनि म्याली ॥ लपविला कृष्ण अंचळ वस्त्र मुखावरीं घाली ॥ भियेल कीं उग्ररूप देखोनि लावण्यगाभा ॥ नको० ॥ ४ ॥ जोगी ह्मणे कांहो बहु रुदतो हा तुझा बाळ ॥ दृष्टी झाली झाली ह्मणुनी घेत असे बहु आळ ॥ विभूति घेउनि हस्तीं मंत्रितसे पशुपाळ ॥ लावुनियां भाळीं कृष्णा ॥ ह्मणे रुदतोसि कां बा ॥ नको० ॥ ५ ॥ तदां बहु हर्षे हास्य केलें बालमुकुंदानें ॥ येशोदाही वोसंडीली संतोषें आनंदानें जोगीयासी पुजायेला प्रिती भावें बहू मानें ॥ ह्मणे माझ्या बाळा देई दर्शन तूं नित्य ये बा ॥ न० ॥ ६ ॥ श्रीराम शिवाचे हृदयीं विष्णुच्या हृदयीं शिव ॥ शिव विष्णु एकरूप नसे कांहीं द्वैत भाव ॥ शिवाप्रिती गोपाळासी गोपाळक प्रिती सांवा ॥ नको छंद घेउं कृष्णा आलारे बागुलबावा ॥ ७ ॥

## पद ॥ ४३ ॥

( राग—ताल—चाल—वरल्या पदाप्रमाणें. )

कान्हा बनसरि बजाय गिरधारि॥तोरि बनसरि लागी मोकों प्यारी॥दहींदुधबेचनें जाती जमुना ॥ कानानें घागर फोरी॥काना०॥१
सिरपर घट घटपर झारी ॥ उस्कूं उतार मुरारी ॥ काना०॥२॥
सास बुरीरे ननंद हटेली ॥ देवर देवे मोकों गारी ॥ काना०॥३॥
मीरा कहे प्रभु गिरिधरनागर ॥ चरणकमळबलहारी॥ काना॥४॥

## पद ॥ ४४ ॥

( राग—झिंजोटी. ताल—दादरा. चाल—सुंदर मुख तुंदिल. )

हे मुकुंद इंदुवदन इंदिरावरा ॥ पीतवसन मेघवर्ण भुवनसुंदरा ॥ ध्रु० ॥ दानवखलदर्पहरा दैत्यमर्दना ॥ नाम तुझें पतित तारि पतितपावना ॥ दर्शन तव पाप हरी पापनाशना ॥ गातों ध्यातों । नमितों । रूपगणां । अघहरणा । तव चरणा । श्यामसुंदरा ॥ हे मुकुंद ॥ १ ॥ विनति विभो करितों तुज हे प्रा-

त्परा ॥ सन्मार्गी सकळ जना लावि ईश्वरा ॥ पांडवजनसाह्यकारि होसि तूं खरा ॥ देवा। धांवा। पावा। अघवंता। रघुनाथा कृष्णसुता। निगममंदिरा ॥ हे मुकुंद० ॥ २ ॥

पद ॥ ४५ ॥

( राग–कालिंगडा. ताल–त्रिवट.)

नमूं भवाब्धीतारक ईश्वरू ॥ तो देवकीनंदन श्रीगुरु ॥ध्रु० ॥
जो मुनिजनहृदयीं क्रीडतो ॥ जो नंदगृहांतरीं रांगतो ॥ न० १
जो वेदवनातें पाळितो ॥ जो गोपवधूंसी खेळतो ॥ न० ॥ २ ॥
जो मदमयातें नाशिता ॥ जो आवडता पंडिता ॥ न० ॥ ३ ॥
जो काळभुजंगा दंडिता ॥ जो कर्मतरूतें खंडिता ॥ न० ॥४ ॥
जो शांतिरमावर चांगला ॥ जो अर्जुनसारथि जाहला ॥ न० ॥ ५ ॥जो आत्मसुखाचा पुतळा॥जो जीवन्मुक्त भेटला॥न०॥६॥

पद ॥ ४६ ॥

( राग–ताल–वरच्या पदां प्रमाणें )

मोरी लय लगी गोपालमें ॥ध्रु॥मेरा काज कोन करेगा॥ मेरे चित नंदनलाल छे ॥ १ ॥ मोरमुगुट पीतांबर शोभे ॥ गला मोतनके माळ छे॥२॥ मीराके प्रभु गिरिधरनागर॥तुट गई जंजाळ छे॥३॥

पद ॥ ४७ ॥

( राग–मुलतान. ताल–भजनी. चाल–गोविंदा रामा हो गोपाळा.)

कृष्णा राहीरे उगला ॥ नाहीं तरि सांगेन त्या बागुला ॥ घुसळणाला रुशिर झाला रवी सोड गोविंदा ॥ ध्रु ॥पहिला बागुल तो ऐसा ॥ त्याचें नाव ह्मणतिं मासा ॥ शंखासुर वधिला कैसा॥ चारि वेद आणियले ॥१॥ दुसरा बागुल बोलती ॥ त्याचें नाव कच्छ ह्मणती ॥ त्याणें पृथ्वी धरीली पृष्ठी ॥ पाय पोटीं धरियेले ॥ २ ॥ तिसरा बागुल बोलती ॥ त्याचें नाव वराह ह्मणती ॥

त्याणें पृथ्वी धरिली दंतीं ॥ दैत्या फार वधियेलें॥३॥चौथा बागुल नरहरी ॥ तो तर खांबांतं गुरगुरी ॥ दैत्य वधितां जानूवरी ॥ भक्त प्रल्हाद रक्षिला ॥ ४ ॥ पांचवा बागुल ब्रह्मचारी॥तो तर उभा बळाचे द्वारीं॥भिक्षा मागुनि निर्धारी॥बळिचें द्वार रक्षियलें॥५॥ सहावा बागुल बोलती ॥ त्या परशुराम ह्मणती ॥ त्याणें वधिलें माते प्रति ॥ पितृवचन मानुनिया ॥६॥ सातवा बागुल सत्वाचा ॥ राम ह्मणतीं दशरथाचा ॥ रावण वधिला दशमुखाचा ॥ त्यानें जानकी सोडविली ॥ ७ ॥ आठवा बागुल बोलती ॥ तो तर गोकुळीं ह्मणती॥त्याणें वधिलें कंसा प्रती ॥ देव सुखी केले कीं॥ ८ ॥ नववा बागुल बोलती ॥ त्याचे नाव बौद्धय ह्मणती॥त्याची कळत नाहीं स्थिती ॥ उभा विटे राहिला ॥ ९ ॥ दहावा बागुल बोलती ॥ त्याचे नांव कलंकी ह्मणती ॥त्याची कळत नाहीं स्थिती ॥ पुढें काय होईल तें ॥ १० ॥

## पद ॥ ४८ ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. )

दीजो हो चुनरिया हमारी ॥ किसनजि मे कन्या कुमारी ॥ ध्रु ॥ गौलन सब मिल पानियां भरन जाती ॥ व्हाको करत बल जोरी ॥ १ ॥ परनारीना पल्लव पकडे ॥ क्या करे मनवा बिचारा ॥ २ ॥ बिंद्रा बानके कुंजबनमो ॥ मार रंगकी पिचकारी ॥ ३ जाके कहिती यशवदा मयां ॥ होगी फजीती तुह्मारी ॥ ३ ॥ मीराके प्रभु गिरीधरनागर ॥ भक्तनके है लहरी ॥ ४ ॥

## पद ॥ ४९ ॥

( चाल–लावणीची, ताल–धुमाळी. )

कटावरी ठेवुनियां कर ॥ सांवळी मुहूर्त मनोहर ॥विठू भक्तांसी प्रियकर ॥ गिरिवरधारी नंदकुमार ॥ ध्रु० ॥ आषाढीं यात्रा बहु फार ॥ दिंडी पताकाची बाहार ॥ साधुअंकित शारंगधर ॥

विटेवरी उभा कटी कर ॥ दीनदयाळु अवतरला ॥ भूवैकुंठीं मरला ॥ १ ॥ सकळां आवड पंढरीची ॥ सेवा करिति तिच्या पतिची ॥ सगुण हे मूर्ति द्वारकेची ॥ लुगडीं धुतो जनाईचीं ॥ पत्रिका पाहुनि रुक्मिणिची ॥ कसी गत झाली रुक्मयाची ॥ नवे अवतारीं बौध्य झाला ॥ भूवैकुंठीं पंढरिला ॥ २ ॥ बुका तुळसिची आवड मोठी ॥ कौस्तुभमणि शोभे कंठीं ॥ भाजीचें पान खाऊनि तार्टी ॥ बोरें भिल्लिणीचीं उष्टीं ॥ पुतना अंतरींची खोटी ॥ तिशीं उद्धरिलें उठाउठीं ॥ झाला आनंद त्रैलोक्याला ॥ भूवैकुंठ पंढरिला ॥ ३ ॥ कलियुगांत नाम सार ॥ भक्त उद्धरिले अपार ॥ नामदेव शिंपी सोनार ॥ नरहरी गोरा कुंभार ॥ बाळ प्रल्हाद सकुमार ॥ त्यासी उद्धरिलें गिरिधर ॥ झाला आनंद दामाजीला भूवैकुंठ पंढरिला ॥ ४ ॥

पद ॥ ५० ॥

( राग–पिलु. ताल–धुमाळी. )

अहा कृष्णा विसर कसा हा चित्तिं तुझे पडला ॥ वचन दिलें जें स्मरतें किंवा नाहीं तें तुजला ॥ ध्रु० ॥ हलधर कन्या स्वचित्तचि मी तव देइन अभिमन्यूला ॥ वदुनि असें तूं आतां कैसें ठकाविसि मजला ॥ तुह्मी दोघे बंधु मजवरि निष्ठुर कां झाला ॥ दुःखाग्रीं निज भग्निनी कैसी लोटाया सजला ॥ अहा० ॥ १ ॥

पद ॥ ५१ ॥

( राग–गौरी. ताल धुमाळी. अहाहे कृष्ण मुकुंदा० या० चा० )

मुररिपु हे गोपाला ॥ दुस्तर पाशा गोवीलें मजला ॥ ध्रु० ॥ अपराध का तंव घडला ॥ छळ मम ऐसा ह्मणुनि मांडिला ॥ सेवा तव हा चुकला ॥ पापाचरणीं कां रत झाला ॥ कीं तंव प्रेमा सरला ॥ भक्तांवर कां रुष्ट जहाला ॥ लांछन तंव बीदाला ॥ दीनोद्धारण ह्मणति तुजला ॥ मुररिपु० ॥ १ ॥

पद ॥ ९२ ॥

( राग–भैरवी. ताल–त्रिवट. )

हातकि बिडिया लेव मोरे बालम ॥ मोरे बालम साजनवा ॥ ध्रु० ॥ काथ चुना लवंग सुपारी ॥ बिडी बनाऊ गहिरी ॥ केसरका तो रंग खुलाहे ॥ मारो पिचकारीरे ॥ १ ॥ पके पानका बिडी बनाऊं ॥ लेवो मोरे बालमजी ॥ हास हासके बाता बोलो ॥ पडदा खोलोजी ॥२॥ मीराके प्रभु गिरधरनागर ॥ बोलत है प्यारी ॥ अंतर बालम मतकरयारो ॥ दासी है तेरी ॥३॥

पद ॥ ९३ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. )

माझ्या मनिंचें हितगुज सारें ठाउक कृष्णाला ॥ ऐसें असुनी दुःखावरतीं देतो डागाला ॥ ध्रु० ॥ अर्जुनजीला मज द्यावी हें आपणची वदला ॥ आशा मज बहू दाउनि ऐसा घात करूं सजला ॥ जैसा वरती दिसतो काळा आंतुनही झाला ॥ तारिल ह्मणुनी धरिलें ज्याला बुडवी तो मजला ॥ माझ्या० ॥ १ ॥

पद ॥ ५४ ॥

( राग–मुलतानि. ताल–धुमाळी. चाल–सख्यानों कृष्णमजी )

सख्यानों आपुल्या कृष्णाला ॥ अक्रूर नेतो मथुरेला ॥ ध्रु० ॥ दोघे रथावरी बसती ॥ येशोदानंद गोप रडती ॥ अक्रुराशि तइं सर्वे नमिती ॥ त्याच्या दया नये चित्तीं ॥ ह्मणवुनि जाऊं मारूं त्याला ॥ अक्रुर नेतो मथुरेला ॥१॥ गोपी फाराचि तळमळती ॥ करानें वक्ष भाळ पिटिती ॥ हरिला जाऊं नको ह्मणती ॥ अश्रुनें सर्वांगि भिजती ॥ दूर तो गेला यमुनेला ॥ नेतो अक्रुर मथुरेला ॥ २ ॥ ऐकुनि गोप सर्व म्याले ॥ धाउनि हरिजवळीं आले ॥ मूर्च्छित रथाजवळीं पडिले ॥ हरिनें हृदयीं कवळिले ॥ देव मग फाराचि गहिवरला ॥ अक्रुर० ॥ ३ ॥ तुजविण आह्मां नाहीं

कोणी ॥ ह्मणूनि सर्व जाऊं मरुनी ॥ परि ये चिंता एकं मनीं ॥ कंस तुज बा नेईल धरुनी ॥ तैं कोणी नाहीं बा तुजला ॥ अक्रुर ॥ ४ ॥

पद ॥ ९५ ॥

( राग-कल्याण. ताल-दादरा. ( ध्याई ध्याईरे शंभुच्या पदा ) या चा० )

धांव धांवगा रुक्मिणीवरा ॥ ध्रु० ॥ चरणकमळ धरिन सबळ न करि वेळ मरणकाळ नजिक पातला ॥ सोडवी अशा दीनपामरा ॥ धांव धांवगा० ॥ १ ॥ सत्य धर्म करूनि हा अधर्म निंद्य वर्म प्रगटलें जगीं ॥ हे प्रभो तरी दोष हा हरा ॥ धांव धांव० ॥ २ ॥ शंख लिखित भाग्यवंत बसुनि शांत कृपावंत पाहती मजा ॥ दाखवि तुझें ब्रीद ह्या नरा ॥ धाव धांव० ॥ ३ ॥ फुकट दोष धरुनि रोष बहुत क्लेश कां विशेष. देतसे पिता ॥ तूंच रक्षिसी रमावरा ॥ धांव धांव० ॥ ४ ॥ संकटांत धरुनि भ्रांत व्यर्थ अंत कां निशांत पाहसी हरी ॥ कार्य आपुलें कोणतें स्मरा ॥ धांव ॥ ५ ॥

पद ॥ ९६ ॥ ✓

( राग-जोगी. ताल-धुमाळी. चाल-मजला सोडवा आतां. )

माझा निरोप येशोदेसी ॥ कोणी तरि सांगा हो ॥ ध्रु० ॥ कृष्ण तुझा नावडता बाळ ॥ क्षुधित द्वारीं जो गोपाळ ॥ त्यावरि होउनि पूर्ण कृपाळ ॥ आपुलें बाळ ह्मणशील कैं ॥ माझा० ॥ १ ॥ येशोदा तुझि परि नोहे माय ॥ शिऊं नको ह्मणतो बंधूराय ॥ कोण देईल दहिं तूप साय ॥ यासि उपाय काय करूं ॥ मा० ॥ २ ॥ ॥ नाहीं मागत तुप साखर ॥ दे मज कोरडीच भाकर ॥ तुझा ह्मणवितसें चाकर ॥ कांहीं निकर करूं नको ॥ मा० ॥ ३ ॥ ऐकोनि हांक यशोदा माय ॥ आली धांवत जैशी गाय ॥ वत्सा विपरित वदसी काय ॥ हंबरे धाय मोकलुनी ॥ मा० ॥ ४ ॥ कृष्णा वाहात्ये तुझीच आण ॥ तूं सुत माझा गुणनिधान ॥ तुजवरिन. उतरुन सांडिन प्राण ॥ अमृतासमान मज वाटे ॥ मा० ॥ ५ ॥

पद ॥ ५७ ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. चाल–भजोरेभयारामगोविंद. )

बस मोरे आखनमो नंदलाल ॥ ध्रु ॥ मोहनि मूरत सावरी सूरत ॥ राजीवनैनविशाल ॥ १ ॥ अधरसुधारस मुरली विराजे ॥ और बैजयंती माल ॥२॥ सीर मुगुट मकराकृति कुंडल ॥कस्तुरि न तीलक भाल ॥ ३ ॥ छुद्र घंटिका कटपर बिराजत ॥ ऊपर शब्द रसाल ॥ ४ ॥ गोकुलस्वामी सुखको सागर ॥ भक्तवत्सल प्रतिपाळ ॥ ५ ॥

पद ॥ ५८ ॥

(राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. चाल–हरिशीं सतत भजावें मनुजा०)

नको हरी निशिं बाहेर जाऊं । गवळणि तुज धरूं टपल्यारे ॥ नको० ॥ ध्रु० ॥ गाऱ्हाणीं किती ऐकूं तरि मीं ॥ थकल्यें समजुति करितांरे ॥ जाशि जरि तरि आज निश्चयें माराया तुज टपल्यारे ॥ नको० ॥ १ ॥ मालक तूं या असुनि व्रजाचा ॥ हीन कर्म कां आचरशिरे ॥ मागशील तें तुज देइन कान्हा ॥ काय कमी गृहिं आपुल्यारे ॥ नको० ॥ २ ॥ गोरस हा न समाये सदनीं ॥ करिशी कां व्रजीं चोरीरे ॥ मारुनि तुजला शिणले कर हे ॥ खोडि तुझ्या तुज खपल्यारे ॥ नको० ॥ ३ ॥

पद ॥ ५९ ॥

( राग–गौरी. ताल–धुमाळी. चाल–कैवारी हनुमान आमुचा )

कैवारी यदुराज आमुचा ॥ कैवारी० ॥ ध्रु० ॥ वस्त्राहरणीं पुरउनि वसनें ॥ रक्षिली भगिनीलाज ॥ आमुचा कै० ॥ १ ॥ कौरव पंक्ती चतुर्भुज करुनी ॥ हरिला दुर्जनमाज ॥ आमुचा कै० ॥२॥ दुर्योधन दुःशासन शकुनी ॥ यांचा मोडिल माज ॥आमुचा कै० ॥ ३ अत्रिनंदन छळणा आला ॥ फजीत होईल आज ॥ आमुचा कै० ॥ ४

पद ॥ ६० ॥

(राग, ताल, चाल वरल्या पदाप्रमाणें.)

झुलत राधासंग ॥ गिरिधर ॥ ध्रु० ॥ अबीर गुलालकि धुम मचाई ॥ मारी पिचकारी रंग ॥ गिरि०॥१॥ लाल मई बिंद्राबन जमुना ॥ केशर चुवा तरंग ॥ गिरि० ॥ २ ॥ नाचत ताले आधार सुरभार ॥ धिम धिम बाजे मृदंग ॥ गिरि० ॥ ३ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ चरनकमलकूं दंग ॥ गिरिधर झुलत ॥ ४ ॥

## पद ॥ ६१ ॥

(राग–धनाश्री जिल्हा. ताल–धुमाळी. चाल–कृष्णगर्डी आपुला.)

नहि कौंसन घर जय्ये ॥ किसनजी ॥ ध्रु० ॥ उनके घरकी रसुइ न लिये ॥ अपनें हात पकाय्ये ॥ किसनजी०॥ १ ॥ काज तिहारो ॥ दधि माखन सब ॥ हम इह भोग लगाय्ये ॥ कि० ॥ २॥ तुम बिन हमको कोई नहि पूछे ॥ हम गरीब समजय्यें ॥ कि० ॥ ३ ॥ सुरदास प्रभू एहि बसत है ॥ ब्रिजकी लाज निभाय्यें ॥ किसनजी० ॥ ४ ॥

## पद ॥ ६२ ॥

( राग–भैरवी ताल–त्रिवट. )

धाउनि मजला मारीं आतां कृष्णा ॥ स्वर्गी जाईन सह परिवारी ॥ ध्रु० ॥ कमलाहुनि तव मृदु पाउलें ॥ त्यासि श्रमविलें भारीं ॥ आता० ॥ १ ॥ खळसंगातिनें बहु मळलों मीं ॥ त्या दुरितासि निवारी ॥ आतां ॥ २ ॥ जन्म सफळ हें आज करींबा ॥ या जगीं कितीं उभारीं ॥ आतां० ॥३॥ हे करुणाघन हे मनमोहन ॥ भक्तकाजकैवारी ॥ आतां० ॥ ४ ॥

## पद ॥ ६३ ॥

[ राग–झिंजोटी ताल–त्रिवट सुंदर मुख तुंबिल तनु ॥ याचा० ]

शेषशयन कनकवसन सिंधुजावरा ॥ क्षीरजलधीं वससि नित्य निगममंदिरा ॥ ध्रु० ॥ शंख चक्र पद्म गदा करिं विकासिती ॥ वायुतनय .वैनतेय हस्त जोडिती ॥ नारदमुनि गातो तुज धरूनि

सन्मति ॥ विशालभाल नीलवर्ण मूर्ति सांवळी ॥ वैजयंतिमाळ सुखद मुक्तफळतुरा ॥ शेष० ॥ १ ॥

पद ॥ ६४ ॥

[ राग–जोगी. ताल–धुमाळी. चाल–मजला वरिल सुभद्रा. ]

हरिला सरेंच नेइल काय ॥ कोणी तरि सांगाहो ॥ ध्रु० ॥ रडती गायी आणि गोपाळ ॥ करिती सर्वहि ते हळहाळ ॥ आला अक्रुर हा काळ ॥ माझा बाळ खायाला ॥ ह० ॥ १ ॥ म्हणती जन याला अक्रूर ॥ परि हा फारचि दिसतो क्रूर ॥ नेतो हरिला मेला दूर ॥ ही हुरहूर सर्वांला ॥ २ ॥ कोमळ बाळक लहान फार ॥ नाहीं गेला यमुने पार ॥ फिरेल कोठें दारोदार ॥ नाहीं थार दोघांला ॥ ह० ॥ ३ ॥ त्याला म्हणति यशोदानंद ॥ मथुरे नको नेउं गोविंद ॥ तेथें करील नाना छंद ॥ नाहीं बंद कोणाचा ॥ ह० ॥ ४ ॥ कृष्णा वांचुनि जे संसार ॥ करितिल सर्वही ते निःसार ॥ जरि हरि आहे चोर जार ॥ करि भवपार प्रेमेला ॥ ह० ॥ ५ ॥

पद ॥ ६५ ॥

( राग–बहिरवी . ताल–त्रिवट. )

कैशि जाउं कुंजवनीं आहे शाम ॥ ध्रु० ॥ गोरस घेउनि मथुरेसि जातां ॥ अडउनि मागेल दाम ॥ कै० ॥ १ ॥ नवयौवन मीं कुलवधू नेटकी ॥ आहे हरि बहुत उद्दाम ॥ २ ॥ निबिडतरुंवरी जाऊनि बैसतो ॥ न तया दुसरें काम ॥ कै० ॥ ३ ॥ जयराम जयसुत अंकित म्हणे प्रभु ॥ मज दाखवि निजधाम ॥ कै० ॥ ४ ॥

पद ॥ ६६ ॥

[ राग–पिलु. ताल–त्रिवट. )

हरि तुम कायकुं प्रीत लगाई ॥ ध्रु० ॥ प्रीत लगाई पर दुःख दीयो ॥ कैशि लाज न आई ॥ ह० ॥ २ ॥ गोकुळ छांड मथु

राके जंयु ॥ वामें कौन बढाई ॥ ह० ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ तुमकुं नंद दुवाई ॥ हरि० ॥ ३ ॥

पद ॥ ६७ ॥

( राग–काफी. जिल्हा. ताल–दादरा. पावता वामना–याचा० )

पूतनाकंदना या दिना ने तव चरणीं रमांतररंजना ॥ ध्रु० ॥ श्रीकमलाअसूसुतोषका, गदारदरधर वामना ॥ ने० ॥ वेदा वनीं धरी मत्स्यरूपा ॥ मत्तशंखासूरभंजना ॥ ने० ॥ २ ॥ भो ईशा बाळदास रक्षा, हरुनि भवभयबंधना ॥ ने० ॥ ३ ॥

पद ॥ ६८ ॥

( राग–बहिरवी. ताल–त्रिवट. )

नको नेऊं भगवान ॥ आमुचा अक्रुरा ॥ ध्रु० ॥ वृंदावनींच्या सकळजनाशीं ॥ दे येवढें जीवदान ॥ अक्रुरा० ॥ १ ॥ मायबापही हंबर फोडिती ॥ हरणाधेनुसमान ॥ अक्रुरा ० ॥ २ ॥ घात करूं इछी कंसासुर ॥ केवळ मूर्ति लहान ॥ अक्रुरा० ॥ ३ ॥ कर जोडुनि विनवी जीवनसुत ॥ करिं वचनाशीं मान ॥ अक्रूरा० ॥ ४ ॥

पद ॥ ६९ ॥

( राग, ताल,चाल वरच्यापदाप्रमाणें)

तुमबिन मेरि कोन खबरले ॥ गोवर्धन गिरिधारी रे ॥ ध्रु० ॥ मोरमुगुट पितांबर शोभे ॥ कुंडलकीं छबन्यारी रे ॥ तुम० ॥ १ ॥ भरी सभामो द्रौपदी ठारी ॥ राखो लाज हमारी रे ॥ तुम० ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ चरनकमलबलहारी रे॥तुमबिन०॥३॥

पद ॥ ७० ॥

( राग, ताल, चाल वरच्या पदाप्रमाणें )

श्रीहरि सखया कां रुसलासी ॥ टाकुनि गोकुळ मथुरेला जाशी ॥ ध्रु० ॥ अक्रुर भासे क्रूर जनासि ॥ घेउनि जातो बा मधुसूद-

नासि ॥ श्री० ॥ १ ॥ दहीं दूध साय लोणी मजपाशीं ॥ मागे ल कोण आतां हृषीकेशी ॥ श्री० ॥ २ ॥ गोपि गोधनें गोप जनाशी ॥ लाउनि ममता कां टाकितोसि ॥ श्री० ॥ ३ ॥

पद ॥ ७१ ॥

( राग, ताल, चाल वरच्या पदाप्रमाणें )

हरि धांवे पावे मजलारे ॥ आठवितों तुजला रे ॥ हरि०॥ ध्रु०॥ कामादिक हे जाचिती भारीं ॥ दंभ मनीं सजला रे॥ह०॥ १ ॥ ध्यान भजन मीं कांहींच नेणें ॥ आळस हा घडला रे ॥ह०॥२॥ नाथात्मज प्रभु अंतरयामि ॥ नारायण अडला रे ॥ हरि० ॥३॥

पद ॥ ७२ ॥

( राग-परज. ताल. त्रिवट )

धाउन मज तारि आतां श्री कृष्णा ॥ किती आळवूं तुजला भा-रि ॥आतां कृष्णा ॥ ध्रु० ॥दुष्ट नष्ट खळ कटु वचनाची ॥ करिती मज भडमारि॥आतां कृष्णा ॥ धा० ॥ १ ॥ सबळहि पति परि दैवगतीनें ॥ जाहलों रंक भिकारी आतां॥कृष्णा॥धा० ॥ २॥ हे मनमोहन हे मनरंजना॥येबा धांव मुरारी ॥ आतां धा०॥३॥ मज दीनातें अभय द्यावया ॥ये बा धांव मुरारी ॥आतां धा०॥ ४

॥ पद ७३ ॥

( राग-मुलतानि. ताल-धुमाळी.)

जलमें तुम मत जाय्यें ॥ किसनजी ॥ ध्रु० ॥ नंदजसोदा हलधरके आगे ॥ हरिकी खबर क्या कहिये ॥ किसन ० ॥ १ ॥ हम पतीत हीन दीन अग्यानी ॥ ठेर सूरत क्यौ नहिये ॥ किस-नजी० ॥ २ ॥ ग्वालबाल और बनचर गैये ॥ धाय धाय करो-य्ये ॥ किसनजी० ॥ ३ ॥ जीवनसुत प्रभु लाज हमारी ॥ तुज बिन कोन निभय्ये ॥ किसनजी जलमें तुम मत जयों ॥ कि० ४ ॥

## पद ॥ ७४ ॥

(राग—भैरवी ताल—त्रिवट.)

धरि हरि चरण तरि तरि॥ होईल गति तुज बरी॥तराया मानवा ॥ ध्रु० ॥ यावीण सारा व्यर्थ पसारा ॥ कसें तरि करिं भवाचे भय हरीं ॥ फजिति संसारीं कशाला २ ॥मानवा॥ धरिं० ॥ १ ॥ भजशिल काळा अहारे कपाळा ॥ पोटासाठीं चोरी करिशि काय थोरी ॥ पोशिसी रांडा पोरी कोणाची गाढवा २॥ धरि ह०॥ २॥ लटकी हे माया पुस कविराया ॥ दिवसही च्यारी भरशि काय भरि ॥ कारेशी नित्य घरीं दिवाळी पाडवा २॥ धरि हरि ०॥ ३॥

## पद ॥ ७५ ॥

(राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—तूं माझा यजमान.)

कृष्ण करो जजमान ॥ प्रभु तुम ॥ कृ० ॥ ध्रु० ॥ ज्याकी कीरत बेद बखानत ॥ साखी देत पुरान ॥ प्रभु० ॥ १ ॥ मोरमुगुट पीतांबर सोहत ॥ कुंडल झलकत कान ॥ प्रभु० ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ दे दर्शनको दान ॥ प्रभु० ॥ ३ ॥

## पद ॥ ७६ ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—यशोदे गोपी ठालगणा.)

यशोदे गोपी महाठकल्या ॥ गोपी महा ठक लोपीति भाव निरोपिसी तूं भज ॥ ह्मणति घरीं जाउंरे चल मुला ॥ गोष्टी यांच्या सांगुं मी काय तुला ॥ ध्रु० ॥ स्वगृहीं मज नेऊनि बैसविती ॥ सभोंवत्या आपणही बसति ह्या ॥ होसी पति काय ऐसें पुसती ॥ आलिंगुनि उंच स्वस्वरें हांसती ॥ १ ॥ ह्मणति कृष्णा शीघ्र करि करुणा ॥ येकांती होइं प्रिय तरुणा ॥ क्षणोक्षणीं लागति मच्चरणा ॥ किति वंदु जारिणी आचरणा ॥ यशोदे० ॥ २ ॥ विसर्जुनि कंचुकी कां लुगडीं ॥ स्मराळ्या सांढुनिया तुगडी ॥ धरुनी मज घालिती फुगडी ॥ ह्म-

पति तूंचि आमुचा प्राणगडी ॥ य० ॥ ३ ॥ गरतीजन हो-
ऊनियां फिरती ॥ कुचेष्टा दाटुनिया करिती ॥ करें आपुल्या बु-
लिर्ते धरिती ॥ विठ्ठल जाणें काय कसें करिती ॥यशोदे ॥ ४ ॥

पद ॥ ७७ ॥

( आनंद भैरवी.ताल–त्रिवट )

तो केला व्रजवर गडी गडी तो केला० ॥ जो गव्या नेत परतडी
तो केला ॥ ध्रु० ॥ शाकपत्र येकमात्र असुनि त्या द्रौपदिची
आवडी॥ गुप्त तृप्त अघमर्षणिं करि मुनि अनुपम रसपरवडी ॥१॥
धर्मयज्ञ नृपराजयज्ञतमीं जलदधिघृतपयवडी ॥ गुप्त तृप्त संतुष्ट
करुनि मग द्विजउचिष्टें सावडी ॥ २ ॥ इंद्र चंद्र अमरेंद्रही
वंदिति नेणुनि गोवळमुली॥उभा उभा घननीळ उभा करुनि मग॥
हिरोनि घेति घोंगडी ॥ ३ ॥ शौर्यसदन रतिचौर्यमिसें त्या ॥
गोठणी मारी दडी ॥ तो गिवसुनि गुणी बांधिती गौळणी॥त्राह-
टी वृक्ष भासुडी ॥४॥ गजगणिका द्विज अजामिलादि ध्रुव कुब्जा
कुवडी ॥ अचळरदाप्रति आदिनारायण॥ पोहोचविलि ने सुडी४॥

॥ पद ७८ ॥

[ राग जोगी ताल–झुमाळी चाल–गाहो गाहो रामाची नामें ]

येरे येरे गोविंदा रामा येरे ॥ ध्रु० ॥ विकचवारिजातमंद-
मधुरहासा रे ॥ सजलजलदभव्यदिव्यनीलभासा रे ॥ उडु-
पति मुखी, जननि वदती ॥ घुडु घुडु गति झडकरि ये ॥ १ ॥
विविधभुषणादिगोपरामबाळा रे ॥ निबिड कोमलालकाभिराम
गोपबाळा रे ॥ त्रिजगपोषणाघशोषणाकृपाळा रे ॥ त्रिभुवन-
पति, तुजचि जपति, विधि सुरपति अनुदिनि॥ये ॥ २ ॥ निजा-
नंदपणें तूंचि पूर्णठेवा रे ॥ व्रजानंददाई पालका शेषशयन देवा रे ॥
करि भावे आनंदतनय सेवा रे ॥ नमुनि चरण ह्मणत शरण सुख-
वितरण करि मज येरे ॥ येरे गोविंदा रामारे ॥ ३ ॥

## पद ॥ ७९ ॥

( राग—जिल्हा. ताल—धुमाळी. चाल—लक्षयोनि हिंडता.)

आजि कृष्ण राधिके ग न्हे तुझ्या घरीं ॥ ध्रु० ॥ आलिंगि अरवाळी करितो गे मला ॥काम धाम कांहीं करुं नेदी हा मला ॥ काय किती खोडी याच्या सांगु मी तुला ॥उमा राहे सांगितल्या ऐकना जरा ॥ १ ॥ गेला हाटा आजि तुझा कांत सुंदरी॥ दुजे नसुनि येकलिच दिससी तू बरी॥श्रीकृष्ण खेळउ तूं जाणसी बरी तुला पाहतांची उगा राहिला खरा॥ २॥दिला कृष्ण येशोदेनें राधिके करीं ॥ हर्षयुक्त घेउनि गेली आपुले घरीं ॥ सदानंदस्वरुपें पूर्ण झाली मंदिरीं॥ नमुनि भजन मागे शिवराम सुंदरीं ॥ ३ ॥

## पद ॥ ८० ॥

(राग—कानडा. ताल—धुमाळी. चाल—पाउला पाउली निज.)

उद्धवा माधवा देवा हा निरोप सांगावा हो ॥ तुज वांचुनिया गावा दावानळ वाटे लागावा हो ॥ ध्रु० ॥ नक्रध्वजनुत चक्रायुध नक्राते निर्वक्रा हो ॥ मानुनि सेवीति आक्रमितसे न जेवी न सेवी तक्राहो ॥ १॥ मानुनि कारासम घरदारा माराच्या शरमारा हो ॥ माराच्या शरमारा घोरा त्याते धीरा वाराहो ॥२॥ अबळा त्या गोकुळीचा सकळां तत्व द्विरहानें विकळा हो काळ व्याळ-विकाळही परि तो न देई स्वकुळा गरळा हो ॥३॥ तारा साऱ्या कुज जनद्वारा करुणापारावारा हो ॥ जारा पौलस्तीचा नारायण सुखवर दाताराहो ॥ ४ ॥

## पद ॥ ८१ ॥

( राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—प्रसुत झाली बा )

ते स्वरूप वासुदेवाचें॥माझें आंतरिं बिंबलें साचें ॥ ध्रु०॥ चहुं देहाचें झालें चूर्ण ॥ मग सहजचि उरलें पूर्ण॥ तें पूर्ण न्हवे अपूर्ण॥ ॥ पूर्णांतित ब्राह्य संपूर्ण ॥ १ ॥ नामरुपातीत असंड ॥ तें

गुह्याचे गुह्य उदंड ॥ जेथे हारपलें पिंडब्रह्मांड ॥कांहीं नुरेची माये चे भरें॥ते स्वरु०॥ २ ॥ सूर्यापरीस अति सोज्वळ ते चंद्राहुनि-शीतळ ॥ जे निष्कामनीया निर्मळ ॥ जात निवाले मन समुळ ॥३॥ जनि न होनि संचले जनीं॥ज्याच्या स्वरुपि रतले मुनि॥जेथ हारपले जिव शिव दोनी॥केशव ह्मणे तत्वदर्शनी॥ते स्वरुप ॥ ४ ॥

पद ॥ ८२ ॥

(राग–बहिरवी ताल–दादरा)

तन मन धन करि तु भजन ॥ देवकीसुत गारे ॥ ध्रु ॥ मथुरेचा त्याग करोनि ॥ द्वारकांही नुतन रचुनि॥ जरासंधासि त्रासऊनी ॥ घोज करी तो पहारे ॥ १ ॥ कंसचाणुरादि असुर॥वधुनि सर्व केलेंस्थीर॥ऐसा तो धीर वीर॥हृदयीं तुह्मी स्मरारे ॥ २ ॥ भक्त उद्धरावयासि ॥ दगदग करुनिया वनासी ॥ आति प्रीतिनें मुच कुंदासि ॥ मुक्ति दीधली पाहारे ॥ ३ ॥ रामदासतीर्थवासि ॥ वनवि संत सज्जनासि ॥ ऐशा मज पामरासि॥उत्धरिलें पहारे॥४॥

पद ८३ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. )

कित्ना थंबालले थंबाल आपुल्या गाई ॥ ध्रु० ॥ तूह्मी थोलल्या पातलाचे लेक॥ तुह्मामदि ले मी गलिब बापुला येक ॥ कल्मातलिले खेलतां थकलिक॥मदला ह्मनतोसे जाई गाई लाख ॥ किति धाऊले काता लामला पाई लागला पाई ॥ १ ॥ आह्मी आपुलाल्या घलाला जातो भाई ॥ तुजि थंगतले थंगत पदली पाई ॥ २ ॥ आमुचा लायाचा येथे इलाज नाहीं ॥ ३ ॥

॥ पद ८४ ॥

राग–कालंगडा–ताळ. धुमाळी.

शामरंग श्रीरंग धांवे माये हो ॥ ध्रु० ॥ दुष्ट दुरात्मा कौरव नाथ ॥ पांडवा जिंकुनि केलें अनाथ ॥ दुःशासन ह्मणे धाडि त्यांत

हरिणी आणिली व्याघ्रवनांत ॥ द्रौपदबाळी पांचाळी मोकळी जाय हो ॥ १ ॥ दुर्योधन ह्मणे ये अंकावर बसविले घन या ममकार ॥ सोडूनि द्या पांडव लोकांस॥द्रौपदी आघगे अवलोकास॥ भीष्म द्रोणा न साहे शब्द काय हो ॥ २ ॥ श्राप देतांक्षणि जाणोनि त्रास ॥ आला कौरवपुत्रास ॥ ह्मणे झडकरि फेडी वस्त्रास तेव्हां कृष्णाचे स्मरे पाय हो ॥ ३ ॥

## पद ॥ ८५ ॥

( राग–श्रीराम– ताल–धुमाळी चाल–बोलणे फोल झालें हो )

एकमीच प्रियकर ज्याला॥माझेहो आयुष्य त्याला॥ध्रु०॥कृष्ण बोले अर्जुनाते ॥ माझे मद्भक्तासी नाते॥जैसा मच्छ जळि जीवनाते॥ जिवे भावें न विसंबे येकों ॥ १ ॥ मज वेगळे दुजें कांहीं ॥ त्रिभुवनिं जयासि उरलें नाहीं ॥ त्याविण लव पळ मजला पाही ॥ उदास अनंत ब्रह्मांडें ॥ २ ॥ इंद्रपदीचे जे उपभोग ॥ त्याचे दृष्टी ते क्षयरोग ॥ माझे स्वरुपि अखंड योग ॥ वियोग नाहीं मज त्यासी ॥ ३ ॥ रिद्धिसिद्धी मुक्तीचारी ॥ द्वारी वोळगती कामारी ॥ देखोनि वांजिचे परी अखंड राहाती गुरु भजनि॥ ४ ॥ काया वाचा मने चित्तें॥ अनन्य भावे भजती माते॥ त्यांचा सर्वही म्या अच्युतें ॥ योगक्षेम वाहावा॥ ५॥ विश्वात्माचे आत्मे झाले॥ सहज निज रंगीं रंगलें ॥त्यासि ह्मणति मेले गेले॥ ते भ्रांतिचे शिरोमणी ॥ ६ ॥

## पद ॥ ८६ ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट चाल–कुणभगिनिकांत. )

धरुं नको पदरीं अरे हरी ॥ किती कपट कट करिसि निकर दधि पूर्णघट फुटले फुटेल फुकट फुकट ॥ ध्रु ॥ जनि तुज चाट ह्मणति आचाट त्यजुनिया हाट सोडी सोडी वाट चोरा ब्रज मधळणी विहिणी बहिणी असति साजणी बसति जपुनि घरी घर घणी ॥ १ ॥ गांजिला पति बुडविलासी विपरितपणि दाविसी

किती तोरा ॥ तोरा नको करुं मज मदन श्रमदे कुंद विशद कोर करंद विठ्ठल वरद नमी नमी पद धरून ॥ २ ॥

॥ पद. ८७ ॥

( राग–कापी ताल–त्रिवट चाल–तारि तारि रामराया. )

खेळतो श्रीहरि जाण ॥ गोपिकाचे घरी रें ॥ ध्रु० ॥ मस्तकि मयुरपिछे रूप तें सुंदर साचे ॥ गळा शोभे वनमाळा॥ कासे पीतांबररे ॥ खेळ ॥ १ ॥ संगें घे गौळ्याचीं पोरें ॥ बहुत लोण्याचे चोर॥धन्य धन्य गोपी भाग्य थोर॥दिनानाथ द्वारी रे॥२॥नित्यजो आनंदे तृप्त॥पूर्ण तो वैकुंठनाथ ॥ शांतरुपी निज भावे गोपी धरिति उरीरें ॥ ३ ॥

पद ॥ ८८ ॥

( राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. )

मनमोहन वाजवि वेणू ॥ मन ॥ ध्रु० ॥ कुंजवनीं ध्वनि ऐकुनि कानीं ॥ मोहित झाल्या धेनूरे ॥ मन ॥ १ ॥ रंजविल्या व्रजसुंदरि सर्वहि ॥ पार तयाचा नणूंरे ॥ २ ॥ कल्पद्रुमातळीं मध्वमुनेश्वर ॥ वंदि पदांबुज रेणूरे ॥ ३ ॥

पद ॥ ८९ ॥

( राग–झिंजोटी. ताल–दादरा. चाल–माझ्यारामाला आणि कोणि)

याचे हातींचा वेणु कोणि घ्यागे ॥ ध्रु० ॥ गृहीं आपुल्या मी करित होत्ये धंदा ॥ वेणू वाजविला नंदाचिया नंदा॥ तल्लीनजाले या मुरलीच्या नादा नादा ॥ याचे हातींचा०॥ १ ॥ याचा नवलावा सांगु मी काई॥चित्तवृत्ती वेधिल्या याणें बाई॥संसृती ठाव उरला नाहीं नाहीं ॥ २ ॥ गृहीं सासुरवास मला भारी ॥ जावा नणदा गांजिती परोपरी ॥ याचे मुरलिनें ठकविल्या पोरी पोरी ॥ ३ ॥ तानें बालक टाकुनि आल्ये घरा ॥ गृ-

हीं सासूसासरा महातारा ॥ तेणें केला या जीविचा किंवा वारा वारा ॥ ४ ॥ वेणु नोहे हें वीष मला वाटे॥ नाद ऐकूनि कामहा हृदयीं दाटे ॥ मध्वनाथाचे मूर्ति हृदयीं भेटे भेटे॥याचे०॥ ५ ॥

पद ॥ ९० ॥

( राग–देस ताल–त्रिवट.स्वामी दत्त निरंन या चालीवर )

कारटा यशोदे कान्हा ॥ निशिदिनीं छळितो तव तान्हा ॥ कटिवरी बरवा दिसतो तुझिये, साधु पहा बाई हा गे ॥ नवपन्नीं लघुशंका करुनी, अंगणीं आमुच्या हागे ॥ का० ॥ कंचुकी सोडुनी हात कुचांवरी ठेवितसे हा भारी ॥ फेडुनी लुगडीं नग्न करी ह्मणे "फुगडी घाल" मुरारी ॥ का० ॥ नवनित गोरस चोरुनी खातो, अतिवस आवडिनें हा ॥ दहिदुध मटकीं फोडुनी टाकी, येउनी माझ्या गेहा ॥ का० ॥ रात्रीं पतिसेजेसी निजतां, चोरुनी मंदिरीं येतो ॥ दाढीसंगें वेणी बांधुनि बळकट ग्रंथी देतो ॥ का० ॥ गोपवधू गाऱ्हाणीं करिती, यापरि हरिची करणी ॥ माधवसुत बह्न लीन सदोदित, होइ तयाच्या चरणी ॥

॥ पद ९१ ॥

[ राग–कालंगडा. ताल–त्रिवट. ]

नंदसुंदरी तव बालस्य ॥ श्रुणु गोकुल वृतं ॥ नं० ॥ गोपालईसह तिप्रवेशति गेहं लुठती गोरसनिकरं कुरु सादरचित्तं ॥ नं० ॥१॥ अनिवारोयं तनयोजातःहा भवती कुरु ताडनमेनं ॥ नं० ॥ २ ॥

पद ॥ ९२ ॥

( राग– भैरवी ताल–त्रिवट.)

कृष्णा कांरे मुरली वाजविली॥ कृष्णा० ॥ यमुनेच्या पाण्या जात मी होतें ॥ डोईवर घागर पाझरली ॥ कृष्णा० ॥ मुरलिच्या नादें तल्लिन मी झालें॥अंगीं कंचुकी तटतटली॥कृष्णा॥२ ॥ मध्वनाथ ह्मणे जोडुनि पाणी ॥ राधा गवळण घाबरली ॥ ३ ॥

पद ॥ ९३ ॥

(राग–बिभास. ताल–एका.)

आला भगवंत शुभांगे तुला वराया ॥ विबुधो ज्ञान वसंत ॥ ध्रु० ॥
पत्र तुझे पाहतां घाबरला ॥ क्षणभरि नाहीं उसंत ॥ १ ॥
पैल पहा गरुडध्वज झळके ॥ त्रिभुवनिचा श्रीमंत ॥ २ ॥
वरिल तुला जगदीश्वर इन्हां ॥ ऋषिसनकादिक संत ॥ ३ ॥
नाभि नाभि तूं स्वप्नीं जल्पे ॥ त्र्यंबकप्रभृति महंत ॥ आला० ॥ ४ ॥

पद ॥ ९४ ॥

(राग–परज. ताल—त्रिवट.)

किंने देखा कानया प्यारा कि मुरलीवाला ॥ ध्रु० ॥ जमुनाके नीरतीर गवा चरावे ॥ खांदे कंबरिया काला ॥ १ ॥ मोरमुकुट पीतांबर शोभे ॥ कुंडल झलकत हीरा ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरीधर नागर ॥ चरन कमलबलहारा ॥ ३ ॥

पद ॥ ९५ ॥

(राग–परज. ताल–त्रिवट.)

बाइ मी न जाईगे कुंजवना ॥ बा० रळि हरिची सोसेना॥ध्रु०॥ धरोनि हा कां चोळी ॥ माझे अवयव हा कां चोळी ॥ बा०॥१॥ अधरमधूच्या पानें ॥ केल्या विकल सुमनचापानें ॥ बा० ॥ २ ॥ मररामावसनातें ॥ फेडी लाउनि बहुवसनातें ॥ बा० ॥ ३ ॥ केशव चरणा लागे ॥ गोपी बोलवित्या अनुरागें ॥ बाइ० ॥ ४ ॥

पद ॥ ९६ ॥ ✓

(राग—कालंगडा ताल—त्रिवट.)

क्षुधित वनीं गोविंद बाइगे ॥ क्षुधि० ॥ रवितनयेतटीं शिशु सहसा व्रज ॥ चारित गोधनवृंद ॥ १ ॥ ऋषि पत्न्या तुह्मि प्रेमळ सात्विक ॥ तोषवास गुण मुकुंद ॥ २ ॥ एका जनार्दनीं अन्न समर्पितां ॥ एकी स्वागत नंद ॥ बाइगे क्षुधित वनीं०. ॥ ३ ॥

## पद ॥ ९७ ॥

( राग–जिल्हा. ताल–दादरा. )

नंदाजिची राणि ह्मणे विश्वजीवना ॥ हंबरताति सोडि गायी जाउं दे वना ॥ नंद ॥ध्रु०॥ किलबिलती पक्षि हरी पहांट झाली रें ॥ अरुणोदय झाला गोपी बाळें आलीं रें ॥ दूधभातवाटि भरुनि सिद्ध केली रें ॥चाल॥ ऊठ कृष्णा मूख धुवी उष्णजीवना ॥नंद०॥१॥ नंदजिनें धोवियल्या सर्व गायी रें ॥ मंथनाचे वेळीं उठे माझी आई रें ॥ बळीराम ऊठला तो भाक्षि सायिरे ॥ चाल ॥ अशी कशी नीज तुझी जगज्जीवना ॥ नंदजीची ॥ २ ॥ वेणु मोरी ॥ आणि घेई काठी कांबळी ॥ गाई नेई चारी यमुनेचिये तिरीं ऊठला श्रीकृष्ण देऊनिया जांभई ॥ चाल ॥ नित्य नेम सारुनिया मागे भोजना ॥ नंद० ॥ ॥ ३ ॥ रामकृष्ण गोपियेसी खूप नटले ॥ नऊ लक्ष गोधनाचे भार सूटले ॥ सातशे गोपाळ सर्वें एक वटले ॥ चाल ॥ काष्ट रेणु रंग रेणु एक भावना ॥ ॥ नंद० ॥ हंबरताति सोडी ॥ ४ ॥

## पद ॥ ९८ ॥

( राग–मुलतानि. ताल–धुमाळी. )

हरि मजला चालवेना ॥ मी अजुनि कोमल ॥ तुह्मी कठीण गोपाल ॥ मज कसे सोसती हे हाल ॥ ह० ॥ध्रु०॥ माझे चरण दुखति पायीं खडे रुतती मजकडे बघुनि तरि ॥ह०॥ १ ॥ काय चेटुक केलेस ॥ किती दुःख दिलेंस निर्दया अससी तूं काय ॥ आले पती त्यजुनि निःसंग होवुनि वलवंत सख्यारम वाह ॥ २ ॥

## पद ॥ ९९ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. )

असतां मी मंदिरी तुझा मधुर मधुर वेणुनाद जाच करी ॥ मी ॥ध्रु०॥ पतिचरणाची सोडुनि सेवा ॥ आलें वनीं तुजसाठीं देवा ॥ घ-

रूनी मनी मी रतीसुखहेवा ॥ त्यजुंनि चरण आलें शरण न वारी हरी ॥ अ० ॥ १ ॥ यमुनेवरि वसनास चोरूनी ॥ बैसले कदंबी बा नाद करून ॥ काय बोलला ते मनीं धरून ॥ स————करूनियां मज तारी ॥ अ० ॥ २ ॥ हार तुरे गजरे सुमनाच ॥ घेवुनि शमन करी मदनाचे ॥ संकठ वारी या दिनाचें ॥ बलवंत तुझा संत दीन यातें तारी हरी ॥ आ० ॥ ३ ॥

पद ॥ १०० ॥

( राग–झिंजोटी. ताल–त्रिवट. )

ऐक सखे शिशुची ते करणी सांगावया मम लाजत वाणी ॥ ऐ० ध्रु०॥ कांत पलंगीं निद्रित असतां ॥ त्यावेळीं मी शुद्धित नसतां ॥ उतरोनि काढिली साणी गे मम बांधिली दाढीस वेणी ॥ ऐ० ॥ खोट्या बोलती या वृजसुंदरी ॥ जाऊं कशाला त्याचे मी मंदिरीं ॥ असती या असत्य खाणी गे ॥ मज पहाती चोरावाणी ॥ २ ॥

॥ पद १०१ ॥ ✓

राग०झींजोटी ताल–धुमाळी

विधीमुख सुरनुत यदुकुल पंडितमंडन मंडित अघहारि ॥ वि० ॥ द्वारावती सदनांत विराजे भक्तराज सुरसुखकारी ॥ ध्रु० ॥ रत्नखचित मंडपी सुशोभित ॥ सिंहासनी बैसला हरीं कनकमंचकीं विस्तीर्ण सभेवती ॥ यादव वर झुलतात वरी ॥ सुंदर सेवक बहुत उभे ते छत्र चामरें धरूनि वाजत गाजत माधव शोभे ॥ बलवंताचा कैवारी ॥ वि० ॥ १ ॥

पद ॥ १०२ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. )

नयनी पाहिन केधवा ॥ मन्मथसुंदर कांत युवा ॥ यमुना तटीं वृंदावनी खेळे ॥ गोकुलसह रात्रदीवा ॥ मधुनी मधुनी मुरलीरव करितां ॥ परि न दिसे तो मेघ नवा ॥ न० ॥ औं-

सनी भोजनी शयनी ध्यानी ॥ कृष्णसखा मजला करवा ॥ क- पटी सवत मुरली ही सांगे काय करूं भुलवित जीवा ॥ न० ॥ ॥ २ ॥ दर्शन देणें नाहीं जरि तुज यमाची करवा ॥ फुकट निक- ट आणाया केलें ॥ बलवंता कां वेणुरवा ॥ न ॥ ३ ॥

पद ॥ १०३ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. )

हरी पुरे करी बासरिती ॥ मी पडत झडत भय त्यजुनि पळत ॥ ह०॥ध्रु०॥ कळुन येते या वै कळलें ॥ कामशरें तनु व्याकुळ करि ॥ हरि ॥ १ ॥ सासु सासरा दीर जावा नणंदा ॥ ह्मणतील घरीं काय करती ॥ २ ॥ मेली केव्हां उठून गेली ॥ बलवंत जनतर्क करी लहरी हरी ॥

पद ॥ १०४ ॥

( राग–कर्नाटकी. ताल–त्रिवट. )

नंद सुंदरी केळ मात मग ननीन हेळताई ॥ दालगडवी वंदु सा- दु ये नयी वन छंदु सालदु ती रगो बंदरे नोडु व देनु सिह बंदी तूं भाल ताई ॥ नं० ॥१॥ताई हो गलीह्ला ईवरद मनी यनोडली- ह्ला ई वरद व्हरग हाक यह्ला ग वणी सुलेर कडी गे नावड देनु ईवर मात सुळताई ॥ २ ॥

## भक्तिज्ञानवैराग्यपर पदें.

पद ॥ १ ॥

( राग–अडाणा. ताल–त्रिवट. )

वंदियला भगवंत ॥ तो म्या वंदियला भगवंत ॥ ध्रु० ॥ भव- सिंधुतारक निजसुखकारक ॥ सकळां आदीं अंत ॥ तोम्या० ॥ १ ॥ सज्जनरंजन अलखनिरंजन ॥ भक्तजना कृपावंत ॥ तोम्या० ॥ २ ॥ वेद झाले मुके शेष न स्तवुं शके ॥ ज्याचे

स्वरूप अनंत ॥ तो म्या० ॥ ३ ॥ ज्ञानें सोहिरा अनुभवें पाहणें ॥ चित्सुखवनवसंत ॥ तो म्या वंदियला भगवंत० ॥ ४ ॥

पद ॥ २ ॥

( राग–संदर. ताल–दादरा. )

हरिचें नाम गारे श्रीहरिचें नामगा ॥ सुखद गा कीं फुकट फुकट ॥ दवडिसि वय कळकळ कसि ॥ न धरिसि मनिं कांहीं कांहीं ॥ ध्रु० ॥ परम विहित मलविरहित भक्तिविरहित दायी विदित ॥ मुनि वदति मनिं विवरुनि पाहीं पाहीं ॥ हरिचें ॥ १ ॥ कळुनि कळुनि विष कवळुनि ॥ विषयिं विजित जितचिं फजित ॥ घडि घडि पल पळ होसी ठायीं ठायीं ॥ हरिचें ॥ २ ॥ स्वहितकरण करीं विवारण ॥ दुस्तरभवजलधितरण ॥ श्रीहरिनामस्मृतिविण नाहीं नाहीं ॥ हरिचें ॥ ३ ॥

पद ॥ ३ ॥

( राग–कालंगडा. ताल–एका. चाल–कवण तुह्मि कवणाचे. ]

सावध होउनि बाई आत्मा पाहि आपुला डोळांगे ॥ ध्रु० ॥ प्रत्यक्ष गुरुचे साक्षी चक्षु ॥ लक्षीं घनसांवळा गे ॥ त्रिकुटगिरीचे शिखरीं क्रीडा ॥ करितो नाना परीगे ॥ रसनेविण रस चाखे अलक्ष नांदे सर्वांतरी गे ॥ सा० ॥ जागृती स्वप्न सुषुप्तीं तूर्या भोगिती उन्मनी नारीरे ॥ चालक चिन्मय आत्मा नांदे ईंद्रियांचे द्वारी गे ॥ होउनिया अनुभवी विश्वी वर्ते विश्वाकारी गे ॥ अनुहात नाद न साहे आहे गगनाचेभीतरी गे ॥ सा० ॥ २ ॥ प्रत्यक्ष अनुभव असे जैसा ॥ अमलक हस्तावरी गे ॥ संतांशरण जाईं ते तुज दाविती आपुल्या करी गे ॥ कुंकुममंदिर शूभ्र स्फटिका महीगिरीवरी गे ॥ श्यामसुनीळ वर्तुळ इंद्रनीळाचे कुसरी गे ॥ सा० ॥ ३ ॥ झळझळझळके स्वरूप पाहे अंतरीचे अंतरींगे ॥ गुरुविण जो कानिगुरा प्राणि पडिला दुरिच्या दुरि गे ॥ गुरुविण जब हा प्राणी

शब्द संताचे गोफाटी ग ॥ दिसे तितुकें नाशे ऐशा सांगति श्रमिष्ट गोष्टि ग ॥ आत्मा कळला नाहीं जपतप तीर्थें साधनें खोटी गे॥ ज्ञानदेव ह्मणे न सुटे तया संसाराच्या गांठी गे ॥ सा० ॥ ४ ॥

पद ॥ ४॥

( राग–कालंगडा. ताल त्रिवट ( धिमा )

पुरे तें एक आह्मां साचें ॥ सुमंगल नाम अनंताचें॥ ध्रु० ॥ तीर्थ व्रतें प्रतिमा अर्चन देहदंडन हवनादी॥ असार बाहीं सारीं साधनें लागूं नका या नादीं ॥ पुरे० ॥ १ ॥

पद ॥ ५ ॥

(राग–कालंगडा ताल–धुमाळी. तोवरि तळमळरे. या चालिवर )

कोणा काय ह्मणूं ॥ उगाच मी ॥ ध्रु० ॥ ब्रह्मविलोकन हा खेळ कैसा ॥ जगदाभासकनु ॥ उ० ॥ सच्चित्सुख हे मुळींच असतां॥ कैचा भेद गणूं ॥ उ० ॥२ ॥ अमृतसमुद्रीं या द्वैताचा॥ कोठें कूप खणु० ॥ ३ ॥

पद ॥ ६ ॥

( राग–कल्याण ताल–धुमाळी. चाल–क्षणभंगुरससंार• )

श्रीहरि मागें पुढें दाटला ॥ ध्रु० ॥ जिकडे तिकडे आपणचि झाला ॥ स्वयें सदोदित थाटला ॥ श्री० ॥ १ । पाहुनियां निजरूप गुरूचें ॥ संशय समुळि आटला ॥ श्री० ॥ २ ॥ मान पुरीला अनुभव झाला॥ जन्ममरण रोखा फाटला ॥श्रीहरि०३ ॥

पद ॥ ७ ॥

( राग–कालंगडा ताल–त्रिवट. )

नयनांत बाई चंद्र उगवला ॥ अनंत भानु प्रकाश दाटला ॥ध्रु०॥ सोहं शिंगी वाजती निशाणी ॥ त्याणीं तिचा नाद ऐकिला श्रवणीं ॥ १ ॥ हिरवे पिवळे लाल शुभ्र काळे ॥ चिन्मय जोत मारिती झळाळे ॥ लय वो लक्ष त्रिकुटावरती ॥ पाहूं आतां

हिल्लाल दिसती ॥ नय० ॥ २ ॥ धनुष्यबाण लाविली कसोटी॥ भेदलीं बाई मासोळी उफराटी ॥ नारायणाचे मालो चरण धरी॥ संजिवनी विद्या नेत्राचे अधरी ॥ नय० ॥ ३ ॥

## पद ॥ ८ ॥

(राग—कालंगडा ताल—त्रिवट.)

आलों द्वारीं दाता ॥ नका फिरवूं हो ॥ ध्रु० ॥ भक्तीश्री द्या पतित अनाथा ॥ अन्यसदनीं मिळे न हें दान ॥ आलों०॥ १ ॥

## पद ॥ ९ ॥

(राग—झिंजोटी. ताल—त्रिवट.)

मनमोहन यादवराया रे ॥ म० ॥ ध्रु० ॥ वामन होउनि दान तूं मागसि ॥ लहान मानवि कायारे ॥ म० ॥ १ ॥ दंडक मंडलु मंडितसे तनु ॥ पूजितसे नृपजाया रे ॥ २ ॥ यमुनाजळामाजी खेळ तूं खेळसी ॥ चेटकी नाटकि माया रे ॥ ३ ॥ कीर्ति सदोदित मध्वमुनेश्वर॥ मागतसे गुणगाया रे ॥ मन० ॥४॥

## पद ॥ १० ॥

(राग—ललत. ताल—चौताल.)

अरेमन तूंहीऽऽऽ भजरेऽऽ भजरेऽऽ साहेबके नाम ध्रु०॥ज्याकारन तुजको॥ प्रभुनें रचोहै ॥ सो तूं नहीं करतहै काम ॥ अ०॥१॥

## पद ॥ ११ ॥

(राग—कालंगडा. ताल—त्रिवट.)

जगजीवन दीनदयाळारे ॥ ध्रु० ॥ नित्यनिरंजन सज्जनरंजन ॥ भक्तजनप्रतिपाळा रे ॥ जग० ॥ १ ॥ दीन तुझें तुमजे मज साधन ॥ अंगीकारि निज बाळारे ॥ जग० ॥ २ ॥ दुस्तर हा भवसागर पामर ॥ दंशितसे यमकाळा रे ॥ जग० ॥ ३ ॥ दीन तशा विनवी करजोडुनी ॥ नामसार जगपाळारे ॥ जगजीवन० ४

## पद ॥ १२ ॥

( राग-जिल्हापिलू. ताल-त्रिवट. )

चिंता सर्वांची हरिला ॥ ध्रु० ॥ पक्ष्या पदरीं संचय कैचा ॥ चारा पुरवि तयाला ॥ चिंता० ॥ १ ॥ किडी मुंगी कांहीं मागत नाहीं ॥ सास्वर देई तयांला ॥ चिंता० ॥ २ ॥ अमृत ह्मणे हरि घरीं काय उणें॥जो मागे देई तयाला ॥चिंता सर्वांची ॥३॥

## पद ॥ १३ ॥

( जिल्हा काफी ताल-त्रिवट. )

आनंदें शरण रिघा जनहो ॥ तारक श्रीजगदीश्वर जाणुनि ॥ ध्रु० ॥ दीनसखा वरदायक तो प्रभु ॥ नाशिल सकलें अघा ॥ जनहो० ॥ १ ॥ भावबळें मन सुस्थिर करुनी ॥ गा प्रेमें अनघा ॥ जनहो० ॥ २ ॥ विहित संतोषीं मंगलध्यानीं ॥ धुवा मनोमळ अवघा ॥ जनहो० ॥ ३ ॥ नित्य सुखास्तंव अनुदिनसेवा ॥ नामामृत कामदुघा ॥ जनहो० ॥ ४ ॥

## पद ॥ १४ ॥

( राग पिलुजोगिया. ताल धुमाळी. चाल लावणीची. )

कहाणी ऐकुनि शहाणि जाहलें मसि आजि कुणि बोलू नका॥घरांत जातें उघडून पाहाते ह्मणुनि कुणासी सांगू नका ॥ ध्रु० ॥ आंगणि बसते चोरुन खातें ॥ रहाते माजघरीं ॥ तीहीस रुसतें चौथीस हांसतें केवढे नवल परी ॥ तिच्या बळानें चडता जातां पांचवी धरी पदरीं ॥ मनाचें मनपण हारपुन गेलें परपुरुषा उदरीं ॥ पुरुष पाहून हर्षये झाला पाही टकमका घरांत० ॥ १ ॥ नवाचे वरते दाहाचे खालते चिमण्या गुजगुजती ॥ घरात चांदणे चांदण्यांत आंगण वीखरलें मोती ॥ मोर येऊन खाऊन जाती पुढे उभे रहाती ॥ पुच्छें पसरुनि जिकडे तिकडे डोळे दाखविती ॥ घालून सडे मी जातसे पुढें माझ्यासंगें कोणी येउं नका ॥ घ-

रांत० ॥ २ ॥ माझें घर अंधारांत आटकलुन पडलें ॥ सावध होतां उघडून पाहातां कडकडकड कडलें ॥ जीव धडकला ज्वाळा भडकल्या कसी गतगे पुढली ॥ गुरुचे चिंतन करितां सहजचि समाधि सांपडली ॥ समाधि ह्मणतां मौन्यच झालें दूर झालीसें का ॥ घरांत० ॥ ३ ॥ जोतींत जोती परम जोती भिन्नता नाहीं ॥ सुखात सुख तें परमसुख म्यां देखियलें बाई ॥ कहानी सरली शाहाणी विसरली सद्गुरुचे पाई ॥ भलीच केली मात त्वां नरदेहीं आगे बाई ॥ गुंडा स्मरणें वीरा विराला फिरसी वणवणका ॥ घरांत० ॥ ४ ॥

## पद ॥ १९ ॥

( राग–गौरी. ताल–ताल–त्रिवट. )

रामाहो जयरामा हो ॥ पतितपावन पूर्णकामा हो ॥ ध्रु० ॥ नाथाहो दीननाथाहो ॥ तुझिया चरणीं राहो माथा हो ॥ रामा० १ बंधूहो दीनबंधूहो ॥ रामदास ह्मणें कृपासिंधू हो ॥ देवाहो० २

## पद ॥ १६ ॥

( राग–कालंगडा. ताल–एका )

मना सावध सावध सावध त्राणारे ॥ ध्रु० ॥ क्षणिक सुखाचा लोभ धरुनियां ॥ न विसरीं त्रिभुवनराणा रे ॥ मना० ॥ १ ॥ होउनि निश्चल अनुदिनि भावें ॥ करीं मंगलगुणगाना रे ॥ मना० ॥ २ ॥ नित्य सुखावरि देउनि दृष्टि ॥ तुच्छ करीं धनमाना रे ॥ मना० ॥ ३ ॥ यानरतनुचें सार्थक करिं बा ॥ आठवीं पुरुष पुराणा रे ॥ मना० ॥ ४ ॥

## पद ॥ १७ ॥

( राग–खमाज. ताल–त्रिवट. )

देव करील दया ॥ तयावरी देव करील दया ॥ ध्रु० ॥ स्वपर ह्मणुनि मति न धरि चराचरीं ॥ निर्मळभाव जया ॥ तया० ॥ १ ॥

॥ रक्षक तो सकळा कमलापति ॥ जाणुनि न धरि भया ॥ तया ०॥२॥ आनंदतनय ह्मणे हरिकीर्तनीं ॥ मानि प्रयाग मया॥३॥

पद ॥ १८ ॥

( राग, ताल वरच्या पदाप्रमाणें. )

करुणासागर प्रेम भरेंगा रे ॥ ध्रु ॥विषयसुखें हीं घातुकि चोरें ॥ भुलविति जेविं पारधि मृगा रे ॥ करुणा० ॥ १ ॥ धर्माधर्म न कळुनि वर्म ॥ आचरितां कर्म पावसी दगा रे ॥ करुणा० ॥ २॥ रामावांचुनि देहीं वांचुनि॥व्यर्थचि वाचुनियां पुस्तकढिगा रे॥ ३ ॥

पद ॥ १९ ॥ ✓

( राग-मालकंस .ताल- त्रिवट. )

तोंवरि तळमळरे तळमळरे ॥ नाहीं भक्ति बळ रे ॥ ध्रु० ॥ विवेक जागा करिना॥जोंवरि दृढ शांति जिवीं धरिना॥ तों०॥१॥ उदंड करितां कर्म॥ चुकला परब्रह्मींचें वर्म ॥ तों० ॥ २ ॥ दास ह्मणे प्रभु पायीं ॥ जोंवरि मन हें मुरलें नाहीं ॥ तोंवरि ॥ ३॥

पद ॥ २० ॥ ✓

( राग-सोहनी ताल-त्रिवट )

ब्रह्मसुखें सुखरूप ॥ असावें ब्रह्मसुखें सुखरूप ॥ ध्रु० ॥ आदिम गुरुवरदान कृपेचें ॥ बळ हृदयांत अमूप ॥ असावें ॥ १ ॥ गुण दोषास्तव अधरकपाटीं ॥ दृढतर मौन कुलूप ॥ असावें० ॥ २ ॥ हरिगुणकीर्तन दृढभाव किल्ली॥ दास धरी अपरूप॥ असावें॥ ३॥

पद ॥ २१ ॥

( राग-बेहाग ताल-चौताल. )

देवा करिती हीं दुर्बळ बाळें आज्ञाभंग ॥कृपा करीं परि बापा ॥ ध्रु० ॥ गांजिती अरि अनिवार ह्या वेगें॥ सदया नको पाहूं अंत॥ हरे भगवंता पा ॥ देवा करिती० ॥ १ ॥

पद ॥ २२ ॥

(राग–परज–ताल त्रिवट)

देइं दयानिधी बापा ॥ दर्शन देइं हरि भवतापा ॥ ध्रु०॥ अहनिश दुःखें होई ॥ हृदय विदीर्ण॥किती करूं विलापा॥देइं० ॥१॥ सन्निध जरि परि ॥ दिससी न दासा ॥ कशी न करिशी कृपा ॥ देइं ॥ २ ॥ तव गुज हें न कळे ॥ जडमति दीना ॥ नुजळासि कांचिद्दीपा ॥ देइं० ॥ ३ ॥ सतत मारी हाका ॥ नच फळ कांहीं ॥ हरिसी कधीं मम पापा ॥ देइं० ॥ ४ ॥ बहु शिणलों देवा ॥ बुडतोंचि पाहीं ॥ न करि कृपाघन कोपा ॥ देइं ॥ ५ ॥ सुविनत भावें शरण मीं आलों ॥ धे पदरीं सद्रूपा ॥ देइं ॥ ६ ॥

पद ॥ २३ ॥

(राग–परज ताल–एका)

मना कांहीं तुला नाहिं पाहा लाज कशी रे॥ धु०॥ अभिलाषिसि परधनासि ॥ विविध विषय साधनासि ॥ जपसि टपसि मांजरसा न कळुनियां पडसि फशी रे ॥ मना० ॥ १ ॥ शुद्धसत्य त्यजुनि मति॥ वरिशी स्वाहितार्थ कुमति॥मृत्यु भिडेल ते समयीं॥पडसिल मग अमरवसीं रे. ॥ मना० ॥ २ ॥ तिळभरि तरि भूतदया॥ बाणेना जरि हृदया॥ तरि केंवि निज सखया॥ श्रीहरिला आवडसि रे॥मना॥३ ॥ धरुनि सद्दढ संतसंग॥श्रीहरि नामींच रंग॥आयुर्व्यय व्यर्थ करुनि॥उत्तम संधि दवडीसि रे॥मना०॥४॥

पद ॥ २४ ॥

(राग–ताल धुमाळी. चाल–नामरामसे जादाभाईना.)

गगनके बीच निशानाहे ॥ बाबा० ॥ ध्रु० ॥ बाहो चंदा डावा सूरज ॥ दोनोके बीच छुपनाहे ॥ बाबा० ॥ ध्रु० ॥ १ ॥ सूरत सवागन सेज बिछिहे ॥ उपर चंदर तानाहे ॥ बाबा० ॥ २ कहेकबीर सुनभाईसाधु ॥ जीनदे खाकन मानाहे ॥ बाबा० ॥३

पद ॥ २५ ॥

( राग–झिल्हामाझ. ताल–त्रिवट. )

वत्सला करुणानिधे ॥ धांव येईं संकटीं ॥ हेंचि मागोंरे ॥ ध्रु० ॥ तव किंकर हे ॥ दीन पहा बुडों ॥ ह्या भवसिंधु मधीं ॥ सांवरीं आह्मांरे ॥ वत्सला० ॥ १ ॥ तुजविण कोणा ॥ येइ दया सख्या ॥ सांग विभो विमला ॥ अंत न पाहींरे ॥ वत्सला० ॥ २ ॥ जरि त्यागिसी तूं ॥ जाऊं कोठें कोणा ॥ द्वारीं मिळे आसरा ॥ त्यागूं नकोरे ॥ वत्सला० ॥ ३ ॥ चिरकाल तुझी ॥ भक्ति घडो कदा॥आस नसो विषयीं॥हेंचि देईंरें॥वत्सला०॥ ४॥

॥ पद ॥ २६ ॥

[ राग–पिलु. ताल–त्रिवट. )

पिहुकी बोलिन बोल पपैय्या॥ध्रु०॥तै खोलना मेरा जीय डरतहै॥ तनमन डावा डोल ॥ पपैया० ॥ १ ॥ तोरे विना मोकूं पीर अवतहै ॥ जीयरा करुंगी मै मोल ॥ पपैया० ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरधरनागर ॥ कामनी करतकी लोल ॥ पप्पैया० ॥ ३ ॥

पद ॥ २७ ॥

[ राग–छायानट. ताल–त्रिवट. )

कृपाघना तुज कां नये करुणा॥ शुकसनकादिक वंदिति चरणा॥ ध्रु० ॥ उत्कंठा मनी पाय पहाया ॥ लागली निशिदिनीं जगदाभरणा ॥ कृपाघना० ॥ १ ॥ अंतरिंचा तूं जाणसि आशय ॥ पूर्ण करिशी कधीं अघसंहरणा॥कृपाघना० ॥ २ ॥ ध्यान भजन मी कांहींच नेणें॥दास ह्मणवितों पतितोद्धरणा॥कृपा०॥३॥

पद ॥ २८ ॥

( राग–तोडी. ताल–चौताल. ]

देवा सर्व ॥ भरंसा तुझे ठायीं॥जी तूं माझी गत करिशी ती मज मान्य ॥ ध्रु० ॥ तुं अनंत समर्थ ॥ तूं जाणशी समग्र दयाळ तूंचि माय बाप न अन्य ॥ देवा० ॥ १ ॥

॥ पद २९ ॥

[ राग–कानडा ताल–धुमाळी. चाल–लावणीची. ]

काळरूपि ह्या प्रपंचाचे भय वाटे फार ॥ अपार दुःखे साहुनि देवा कैसा धरूं धीर ॥ निशिदिनी लागो हरिनामाचा छंद निरंतर ॥ ह्या भवसिंधुपासुनि देवा तारी लौकर ॥ १ ॥ धांव धांव बा पंढरिराया किती मी वाट पाहूं ॥ धांव धांव बा सद्गुरुराया किती मी वाट पाहूं ॥ शिणले माझे नेत्र सख्यारे नको निष्ठुर होऊं ॥ ॥ ध्रु० ॥ काम क्रोधहे षड्रिपु मजला बसले फसवाया ॥ माझें माझें ह्मणुनि आटविली व्यर्थचि हे काया ॥ ही जगीं पसरिली याहो दुस्तर श्रीहरिची माया ॥ होऊन सावध रिघावें सद्गुरुच्या पांया ॥ धांव धांव बा० ॥ २ ॥ जन्ममृत्युचे फेरे घेतां श्रम झाले फार ॥ विनविते कर जोडुनि देवा तुज मी पामर ॥ आतां दिनावरी दया करावी जाणुनियां अंतर ॥ ठेविं सदोदित तुझिया चरणाशी निरंतर ॥ धांव धांव बा० ॥ ३ ॥ निशिदिनीं लागो हरिनामाचा हा निजध्यास ॥ करुणासागर ह्मणविशि तूं बा पुरवीं माझी आस ॥ ऐसें जाणुनि देवा माझें तोडी तूं भवपाश ॥ आतां निरंतर तुटी नसावी तुझिया चरणास ॥ धांव धांव बा० ॥ ४ ॥

पद ॥ ३० ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. चाल–भजोरे भयाराम गोविं० )

चरणरजमहिमा मै जानी ॥ ध्रु० ॥ याहि चरणसें गंगा प्रगटी ॥ भगिरथकुल तारी ॥ चरण० ॥ १ ॥ याहि चरणसे बिप्र सुदामा ॥ हरि कंचनधाम दिन्ही ॥ च० ॥ २ ॥ याहि चरणसे अहिल्या उधारी ॥ गौतमघरकी पट्टरानी ॥ च० ॥ ३ ॥ मीराके प्रभु गिरधरनागर ॥ चरणकमलसे लपटानी ॥ ४ ॥ चरण० ॥

पद ॥ ३१ ॥

( राग–गौरी. ताल–एका. )

उठाजि मायबापा कशी लागली झोंप ॥ हुजुर जाऊनियां येवढी चुकवा

रे खेप ॥ध्रु०॥ रात्रंदिवस तुह्मीं सावध असा ॥ तुमच्या नगरीचा॥ नाहीं आह्मा भरंवसा ॥ उजेड पडतानां गळी पडेल फांसा ॥ १ ॥ तुमची नांदणूक आह्मा दिसेना बरी ॥ तुमचा शेजारी हो मूळ एक वादकरी ॥ उठा० ॥ २॥ हिंडतां देशांतरी लक्षचौऱ्यायशी जागा ॥ अजुन न आठवे आला मुळच्या मार्गी ॥ माहेरच्या बोलण्याचा तुह्मा येईल राग ॥उठाजि०॥३॥ मागल्या ठेवण्याचा काय ऐवज काढा ॥ त्याचे सत्तेनें आह्मी बोलूं धडधडा ॥ एकाजनार्दनीं धरा बळकट मेढा ॥ उठा०॥ ४ ॥

पद ॥ ३२ ॥

( राग–माल्कौंस ताल–त्रिवट–क्षिव शिद शंभोगा० )

सब पैसेके भाई ॥ अपना साथी नहि कोई ॥ ध्रु० ॥ अपने पलांमे पैसा होयतो, सबहि खुशामत करते ॥ जब अपने पर बखत पडेगा ॥ तब कोई नहिं साथी चलते ॥ सब पै० ॥ १ ॥ मायबाप भाई जोरू अवर बहिनहि साले ॥ जिसका यारो भला किया है वोहि मिठा ना बोले॥सब पै० ॥ २ ॥ अपने हात पांव रह गये यारो लडका नजिक न आवे ॥ बडा प्यार जोरू पर वो-बी, दुरसें पानि बताने॥ सबपै०॥३॥ कहत कबीरा सुन भई सा-धू, करो बिचार पुरता॥सुनना होयतो सुनले प्यारे, नहिं तो खावे-गा गोता ॥ सब पै० ॥ ४ ॥

पद ॥ ३३ ॥

[ राग–पिलुजिल्हा ताल–धुमाळी. ]

कसें रे बोटानें दाखवूं तुला ॥ पदा अनुभवें गुरुच्या मुला ॥ध्रु०॥ नको सोडु देटीच्या मुळा ॥ सोड अजुंळि अपुल्या कुळा ॥ १ ॥ किति पाहसिलपा भोंवते ॥ येतां जातां संगें आंसतें ॥ तुझ्या पाठीपां वागतें ॥ तुझ्या लोचनीं चमकतें ॥२॥ ही खुण त्वां वळखुन घ्यावी ॥ गुरु पुत्रा जावुनि पूसावी ॥ तो नेउन तुज दाखवी ॥ ज्ञानदेवें सांगीतली ॥ तेणें मुक्ती ही जोडिली ॥ ३ ॥

## पद ॥ ३४ ॥

( राग–पिलुजोगिया. ताल–एका. चाल–सगुण चरित्रें.]

या संसारीं येउनि प्राण्या दुःख परोपरी ॥ निराश होऊनि हरी नामीं रत व्हावें तूं झडकरीं ॥ ध्रु० ॥ मिथ्या ऐशी दुस्तर बेडी पडली हो पायीं ॥ अखंड तळमळ वाटे चित्ता क्षणभर सुख नाहीं ॥ या संसारी ॥ १ ॥ या नरदेहीं येउनि प्राणी अहंमतीं भुलला ॥ विन्मुख होउनि हरिनामाला भवसागरीं बुडला ॥ या संसारी० ॥ २ ॥ अज्ञानाची विवशी कैशी जडली हो देहीं ॥ माझें माझें माझें ह्मणुनि सर्व हि जाती नाडोनी ॥ या संसारी० ॥ ३ ॥ नाही प्रपंच ना परमार्थ साधियला कांहीं ॥ वायां गेलें आयुष्य हरिच्या पडली पायीं ॥ या संसारीं ॥ ४ ॥ ऐसें जाणुनि सोडुनि देईं निंदेची वार्ता ॥ रामरसेंहें अमृत जिव्हे करी प्राशन आतां ॥ या संसारी ॥ ५ ॥ मिथ्या माया ह्मणुनि धरावा अनुताप पोटीं ॥ निरीच्छ होउनि शरण रिघावें सद्गुरुच्या भेटी ॥ ६ ॥ या संसारी क्षणभंगुर हा देह जाणुनी ॥ व्हावें सावध हरि चरणी प्रबोध मंचकीं पहुडुनि घ्यावी निद्रा सुखशयनी० ॥ या संसारी० ॥ ७ ॥ प्रपंच ममता टाकुनि वेगें शरण तया जावें ॥ संतसमागम पाहुनि सत्वर मन हें अर्पावें ॥ या संसारी० ॥ ८ ॥ अवघा प्रपंच व्यर्थचि आहे ऐसें जाणोनी ॥ तन्मय होउनि अखंड रहावें सद्गुरुच्या चरणीं ॥ या संसारी० ॥ ९ ॥ तुजविण मजला कोण तारिल सांग विठाबाई ॥ अखंड ठेवी बाळ कन्येचें प्रेम तुझ्या पायीं ॥ या संसारी ॥ १० ॥

## ॥ पद ३५ ॥

( राग–देस. ताल–दीपचंदी. चाल–रापरखे वैसा० )

चंदा झलके सब घटमाही ॥ आदि आखा सुजे कछु नही ॥ ध्रु० ॥ घटहामे झिल मिल जोत उजायारा ॥ दृष्ट बिना दिसे

आंधि यारा ॥ १ ॥ घट ही मे आनु हाद घुरे निशाना ॥ भय-
रा शब्द सुने नही काना ॥ २ ॥ घट ही मे झीर मिर बरसे
खडा हें हजुरा ॥ चंदा ॥ ३ ॥ कहे कबीर गुरु दया सोपाई
ये ॥ खोल कपाट दिदार देखाई ये ॥ चंदा झलक० ॥ ४ ॥

पद ॥ ३६ ॥

[ राग–कल्याण. ताल–त्रिवट. चाल–तुज अर्जुनि कांरे करुणा. )

निज बोधें मी जी धाल्यें ॥ बैरागन की झाले ॥ ध्रु० ॥ पाहु
नियां निजरूप गुरूचें ॥ चरणांमृत न्हाले रे ॥ १ ॥ ज्ञान मे-
खळा निर्गुण सैली ॥ भाव बळें मी न्याले रे ॥ २ ॥ मानपुरी
गुरुनाथप्रसादें मुळच्या ठाया आले रे ॥ निजबो०॥ ३ ॥

पद ॥ ३७ ॥

(राग–पिलु. जोगिया. ताल–एका. चाल–या संसारी येउनि प्रा. )

नित्य नवा कीर्तनी जैसा ओढवला रंग ॥ श्रोता आणि वक्ता
स्वयें झाला श्रीरंग॥ध्रु०॥अल्ला देव वैष्णव करिती नामाचा घोष॥
हरिनाम गर्जती गगनीं नमाये हर्ष ॥१ ॥पदोपदीं कीर्तनी निवेदिति
आहे जनवान॥आवडी भुकेली तिणे गिळिलें गगन॥२॥एक जना-
र्दनि नित्य हरीचें कीर्तन॥निमालें इंद्रिय विषया विसरलें काम॥३॥

पद ॥ ३८ ॥

( राग–झिंजोटी. ताल–एका. कुणि दावा नयनी कंसा. )

हरिसी सतत भजावे मनुजा ॥ हरिसी सतत भजावे रे ॥ध्रु० ॥
दुर्लभ हा नरदेहाचि जाणुनि क्रोधादिक वरजावे रे ॥ निसि
दिनी सुजन पंथासि धरुनिया मुक्तिपदावर जावेरे ॥ हरिसी०
॥ १ ॥ दृश्य सकळ हें व्यर्थाचि जाणुनि सच्चित्सुख समजावें
रे ॥ कोण मी कैचा कोठुनि आलो हेंचि मनि उमजावे रे ॥
हरि ॥ २ ॥ दीनदयाघनचरिताचि गाउनी ॥ प्रेमामृतें भिजवा-

वे रें ॥ गुरुवचनीं विश्वास ठेवुनिया दुर्जनसंग त्यजावे हो०॥ हरिशी० ॥ ३ ॥

पद ॥ ३९ ॥

( राग—कालंगडा ताल—दादरा. )

आवड तुला बेलाची॥आवड तुला बेलाची शंकरा ॥ध्रु०॥ अर्धांगीं पार्वती मस्तकीं गंगा ॥ ललाटीं उटी भस्माची ॥आवड०॥ १ ॥ ऐसा शंभू भोळा, रुंड माळा ॥ भूषणें नागाचीं ॥ आवड ॥ २॥

पद ॥ ४० ॥✓

( राग—पिलु. ताल—त्रिवट. )

भजो रे भय्या राम गोविंद हरी ॥ भजो० ॥ ध्रु० ॥ जपतपसाधन कछु नहि लागत ॥ खरचत नाहिं गठरी ॥ भजो रे भया०॥ १ संतति संपति सुखके कारन ॥ जासें भूलपरी ॥ भजो रे भया० ॥ २ ॥ कहत कबीरा जिस मुख राम नहिंया ॥ ओ मुख भुलपरी ॥ भजो रे भय्या० ॥ ३ ॥

पद ॥ ४१ ॥

(राग—तोडी. ताल—त्रिवट. चाल—अरे अरे कांहि तरि सोय धरि.)

हे वय नासुनि जाईल मनुजा कांहीं तरि बा सोय धरि रे॥ ध्रु० ज्याच्या योगें बोलसि चालसि ॥ त्याचा तरि बा शोध करी रे ॥ हें वय० ॥ १ ॥ मीं माझें हे ह्मणसि जनातें ॥ ते तुज गांचिती परोपरी रे ॥ हें वय० ॥ २ ॥ यमसदना जाती त्या पाहासी ॥ तथापि बससि निसुर घरीं रे ॥ हें वय० ॥ ३ ॥ करुणाघन हा दीनजनास्तव ॥ नांदतसे हा चराचरि रे ॥ हें वय० ॥४॥

॥ पद ४२ ॥

(राग—गौरी. ताल—धुमाळी. चाल—शिव शिव किति चुकलों.)

प्रपंच हा घोर दुस्तर दुःखाचे डोंगर॥ बहुत सोसले हे भार कुठें नसे मज थार॥ आतां येईं बा लवकर संकट जाणुनि थोर ॥१

॥ हर हर सांपडलों, सांप०॥ दाट्टुनि फांशींपडलों ॥ ध्रु०॥ नाहीं आयुष्य हे स्थिर काळचि उभा जवळ ॥ जन हे अज्ञान नेणति तुझा पार ॥ धांउनि येई बा सत्वर लावी नच उशिर ॥ हर हर सांपडलों० ॥ २ ॥ खोटा जाणोनि संसार व्यर्थचि अहंकार ॥ अनाहित आपुलें होईल ऐसा नाहीं विचार ॥ केव्हां दाविशी बा नरहरी चरण तुझे सुकुमार ॥ हरहर सांप० ॥ ३ ॥ मजला वाटतसे भय थोर भवसिंधु दुस्तर ॥ कैसा तरावा सागर आतां दया करीं मजवर ॥ कर जोडुन विनवितें तुझ्या चरणीं सादर ॥ हर हर सांप० ॥ ४ ॥

## पद ॥ ४३ ॥

[ राग–गौरी. ताल–धुमाळी. चाल–बकवा मतकरना बेटा. )

ऐसा भेष बनायारे ॥ फुकट जन्म गमायारे ॥ ध्रु० ॥ बैरागीको भेष बनाया ॥ अंतर नही बैरागी ॥ व्याघ्रांबरधर लोक भुलावे ॥ घी रोटी सो बांधी ॥ १ ॥ कानधरे तुलसिके मुद्रा ॥ भाल लगावे टीका॥दर्पन लेकर देखो चेहेरो॥ जोग गमायो फिका॥२॥ यह भेषसो कछु नही होता ॥ येसो पंथ न न्यारा ॥ कहे अखंडा नंद सुमिरो मिलगये सद्गुरू पूरा० ॥ ऐसा भेष०॥ ३ ॥

## पद ॥ ४४ ॥

( राग–पिलु. ताल–धुमाळी. चाल–सगुण चरित्रें परम. )

वैष्णवसद्गुरु जनक जगीं मज साद्दिया तें आयी रे॥ ध्यान मिषें तनुभान अखिल अभिमान नुरे ज्या ठांयींरे ॥ वैष्णव० ॥ ध्रु० ॥ जावुनि दृढ धरिं पाय उणें मग ॥ काय तुला जगिं पाहींरे ॥ वै० ॥ १ ॥ नाम हृदयीं जप काय अन्य तप॥ तरशिल याचि उपायीं रे ॥ वै० ॥ २ ॥ तो मीं ब्रह्म अशा अभ्यासे ॥ दृश्य नुरे बा कांहीं रे ॥३॥साधन या रीति करितां विस्मृति सांडुनि स्वरूपीं रा-

हरिरे ॥ वै०४ ॥ कृष्णजगन्नाथात्मज याचें साधन आणिक नाहींरे ॥ वै० ॥ ५ ॥

पद ॥ ४५ ॥

(राग—गौरी. ताल—धुमाळी. संगत सतनकी करले.)

दयाधरम नहिं मनमो ॥ मुखडा क्या देखे दरपनमो ॥ ध्रु० ॥ जबलग फूल रहे फुलबाडी ॥ बासरहे निज फुलमो ॥ एकदिन ऐसी हो जावगी घान उडेगी तनमो ॥ मुखडा० ॥ १ ॥ चूवाचंदन अबिर अरगजा सोभे गेरे तनमो ॥ धन जोबन डोंगरका पानी ढल जावेगा खिनमो ॥ मुखडा० ॥ २ ॥ नदियां गहिरी नाव पुरानी उतरो चाहे संगममो ॥ गुरुमुख होयसो पार उतारो नुगरा डूबे मनमो ॥ मुख० ॥ ३ ॥ कवडी कवडी माया जोडी सुरत हरी निजधनमो ॥ दस दरवाजे घेरलिये जब रहगयी मनके मनमो ॥ मुख० ॥ ४ ॥ पगिया बांधे पग सवारे तेल झुलाझुलपेमो ॥ कहत कबीरा सुनभइ साधु ये क्या लड रहे मनमो ॥५॥

पद ॥ ४६ ॥

( राग—झिंजोटी.ताल—दादरा. चाल—रामनामाची गती. )

साधुसंतां मागणें हेंचि आतां रे ॥ प्रीति लागो गोविंदगुण गातां रे ॥ ध्रु० ॥ वृत्ति शून्य जाहलि या संसारा ॥ संतचरणीं आह्मीं घेतला थारा ॥ साधू० ॥ १ ॥ आशा तृष्णा उरल्या नाहीं कांहींरे ॥ देह प्रारब्ध भोगितां भय नाहींरे ॥ साधु० ॥ २ गोड ध्याऊं आठवूं कृष्ण हरिरे ॥ दास ह्मणें सप्रेम निरंतरीं रे ३॥

पद ॥ ४७ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—कवण तुह्मी. )

फकर मकर नही हम् समजते ॥ सीना साफ फकीरीहै ॥ अलकनाम आल्लाका आशका ॥ आवर सरफ मंजुरीहै ॥ ध्रु० ॥ लकीर ऊपर सनद फकीरी ॥ नुक्ते अंदर मुरशदहै ॥ आरश कु-

रश दीदार झोरा ॥ महेरम मेरा दिखताहै ॥ फकर० ॥ १ ॥ मोहंमहंमद दिलके अंदर ॥ जो देखे सो सच्चाहै ॥ अयन अली चस्मोके अंदर ॥ नुरनबीका बरस्तांहै फ० ॥ २ ॥ आपताप महीताप ज्योतमे ॥ दम्परदम् ये गुजरताहै ॥ बेचुन बेचगुन शुभा ॥ बे नमन बे भारीहै ॥ दास नवलका सलाम सिदा लाक लाम हाजुरीहै ॥ फकर मकर० ॥ ३ ॥

पद ॥ ४८ ॥

[ राग–झिंजोटी. ताल–धुमाळी. ]

भलाई करते बुराइ होती ॥ तोबी भलाई करना॥ बाल बालकी झडती यारो ॥ आंग आंगसें देना ॥ ध्रु० ॥ एक पलंग पर दोनो बैठे ॥ एक जागे एक सोये ॥ अनूहातका नौबत बाजे ॥ चोर कांहांसें आवे ॥१॥ शहरम्याने तेजी चूटा ॥ कसबू हो पूकारा॥ दस दरवाजे बंद रहे तो बी॥ निकलगया अस्वार ॥२॥ मा कयेती मेरा मेरा ॥ बाप कहे तेरा ॥ कहत कबीरा सुन भई साधु ॥ नहि घर तेरा मेरा ॥ ३ ॥ भलाई० ॥

पद ॥ ४९ ॥

( राग–बिभास. ताल–आडा चौताल. )

तुजविण कोण वारी रें मनोवेदना ॥ अन्य कोण कुठें असे भव तरणसाधना ॥ ध्रु० ॥ उत्कंठित भयाकुल अनुक्षणीं असे हृदय ॥ संतानीं करुणा करीं देईं प्रभो अभयदाना ॥ तुज० ॥ १ ॥

पद ॥ ५० ॥

[ राग–सोरट. ताल–त्रिवट. चाल–हरि मला बहुत घरि जाच. )

कां हो तुह्मी निर्मळ हरिगुण गाना ॥ नाचत आनंदरूपें पंढरिसी जाना ॥ ध्रु० ॥ काय गणिकेचो याती अधिकार मोठा ॥ पापी अजामिळ तो ही नेला वैकुंठा ॥ १ ॥ काय नेणों तरले किती अंबज अपार ॥ पंचमहादोषी त्याच्या पापा नाहीं पार ॥२॥

पुत्राचिया मिसें नष्ट ह्मणे नारायण ॥ कोण हें कर्तव्य तुका ह्मणें त्याचें पुण्य ॥ कां हो० ॥ ३ ॥

पद ॥ ९१ ॥

( राग–भूपकल्याण. ताल–भजनी. )

रामकृष्ण नरहरे ॥ स्वामिन् ॥ रा० हरे ॥ कधिं करशिल बा दया दयाळा ॥ गर्भवास हा पुरे ॥ ध्रु० ॥ काय करूं मी बरें ॥ सांगावा ॥ काय० ॥ कळो येति मम माझे दोष गुण ॥ चित्त परी नावरे ॥ १ ॥ विषयीं मन नावरे ॥ सदोदित ॥ विष० ॥ काम क्रोध हे चोर लुटति मज ॥ प्राण होति घाबरे ॥ २ ॥ धांव धांव धांवरे ॥ सत्वर ॥ धा० ॥ बुडतो भवसागरीं दीन हा ॥ उद्धरिं आपुल्या करें ॥ ३ ॥ विचार मज न स्फुरे ॥ कांहीं ॥ वि० ॥ केविं गति होईल ह्मणुनियां ॥ जिव हा अंतरिं झुरे॥४॥ प्रार्थितसें आदरें ॥ आतां येक ॥ प्रा० ॥ असें करीं तव नाम निरंतर ॥ पंत विठ्ठल स्मरे ॥ राम० ॥ ५ ॥

पद ॥ ९२ ॥

[ राग–आडाणा. ताल–दादरा. चाल–हरिचें नाम गारे. )

करिं अति त्वरा ॥ घडि घडि घडि पल पल जप ॥ अमृतधाम रामनाम धरुनि आदरा ॥ ध्रु० ॥ अंतसमय परम घोर ॥ दोषत्रय करिति जोर ॥ घुरु घुरु घुरु कंठ होय ॥ भरिल भ्रम हरिल स्मृति ॥ करिल घाबरा ॥ करि० ॥ १ ॥ अतिदुर्धर अपरिहर ॥ येथिल जंव तुजसि जरा ॥ लट लट लट हलल मान ॥ धनुसमान तनु पुमान होत बावरा ॥ करि० ॥ २ ॥ जो इंद्रियसंघ दक्ष ॥ तो निजकल्याण दक्ष ॥ त्यज वट वट खटपट उगि ॥ झटपट करि कपटरहित ॥ भज रमावरा ॥ करि० ॥ ३ ॥ विनवि पंत विठ्ठलशर्म ॥ किमपि धरी विरम विरम ॥ विषयिं नरम अमर महित चरमतनू परम धाम॥न करिं मातिरा॥४॥

पद ॥ ९३ ॥

([राग—काफी. ताल—एका. चाल—गाफिलमतरह.)

जमका अजप तडाका बे तूं क्या जाने लडका बे ॥ ध्रु० ॥ बडे मिजाजी कठडे बैठे तक्यां बिजाईत साजा ॥ मार झपट कर जमले जावे जैसा खबुत्तर बुजा ॥ जमका० ॥ १ ॥ नवबी मर गये दसबी मर गय मरगय सहस्र अठ्यांशी ॥ तेहतीस कोटी देवता मर गय पडे कालके फाशी ॥ जम० ॥ २ ॥ पीर मरे पेगांबर मरगये मरगये जींदा जोगी ॥ जपी तपी संन्याशी मरगये मरगये हकीम रोगी ॥ जम० ॥ ३ ॥ तीन लोक पर छत्र बिराजे लुटा कुंजबिहारी ॥ कहत कबीरा पाखर यारो रय्यत कौन बिचारी ॥ जम० ॥ ४ ॥

पद ॥ ९४ ॥

( राग—कल्याण. ताल—त्रिवट. चाल—संतपदाची जोड. या चालीवर. )

हरिची नाम शर्करा गोड ॥ सोडवि दुर्मतिखोड ॥ ध्रु० ॥ दुष्ट धृष्ट परिपुष्ट अहंकृति,— महिष होतसे रोड ॥ हरि० ॥ १ ॥ हरउनि संशय सकल मनाचे ॥ उपजवि सन्मति-मोड ॥ हरि० ॥ २ ॥ पंत विठ्ठल प्रेक्षित ही भाली ॥ भवतरणा तरि जोड ॥ हरि० ॥ ४ ॥

पद ॥ ९५ ॥

(राग—कल्याणी. ताल—त्रिवट.)

हरिल अघभार करिल भवपार ॥ विश्वाचा आधार गाहो गाहो जगदुद्धार ॥ ध्रु० ॥ सुविमलचित्तीं भाव करा दृढ ॥ सोडुनि विषय असार ॥ विश्वाचा० ॥ १ ॥ सत्संगातें जोडुनि प्रेमें ॥ भजन करा अनुवार ॥ विश्वाचा० ॥ २ ॥

पद ॥ ९६ ॥

(राग—कालंगडा. ताल—धजनी.)

रंगमें खुदा खोज निकालो ॥ तनत किया मन मक्का है ॥ मीई

महंमद झुले अंदर ॥ रसुलील्ला लकलक्का है ॥ ध्रु० ॥ पंच तनूके दरगा आंदर ॥ आलफ नामका सीक्का है ॥ अयन अली गुल चमन खुला है ॥ बीन देखेका धक्का है ॥ रंग० ॥ १ ॥ बेचुन बेच गुन निरंजन ॥ बे शुभाकु देखो है ॥ बेन मनके दीदकसीदमो ॥ सो एक आशके पक्का है ॥ राग० ॥ २ ॥ दास नवलका पीर आवलिया ॥ नागेसर वली बाका है ॥ उनकीयाथा महरेमसो बानी ॥ नबी नाम विठ्ठलको है ॥ रगमे० ॥ ३ ॥

## पद ॥ ५७ ॥

[ राग—बहिरवी. ताल—त्रिवट. ]

राहुं या नरा संत विचारी रें ॥विषय जसें मृगनीर ॥ रा०॥ध्रु०॥ दुःखद या संसारीं स्वहित करूं रें ॥ सेवुं या बरा स्वात्मसुखाब्धी रें ॥ विष० ॥ १ ॥ मायाभ्रम हा भारी विवेकें हरूं रें ॥ साधुं या नरा आत्मपराधी रें ॥ विष० ॥ २ ॥ विष्णुगुरुकृपा मजला तारी कृष्ण हें स्मरूं रें ॥ लावूं या त्वरा ऐक्य ॥ समाधी रे ॥ विष० ॥ ३ ॥

## पद ॥ ५८ ॥

( राग—असावरी. ताल—त्रिवट. )

सतत तुझे प्रभु मी यश गावें ॥ तव भजनी रंगावें ॥ ध्रु० ॥ त्वदितर लोभें प्रभु न च माझें ॥ चित्त कधीं जागावें ॥ सतत० ॥ १ ॥ न घडे प्रभु भज जरि तव सेवा॥ तरि कां व्यर्थ जगावें ॥ स० ॥ २ ॥ त्वत्प्रेमामृत याचितसें मी ॥ काय इतर मागावे ॥ सतत० ॥ ३ ॥ घनमकरंदीं तव पदकमली ॥ मन भृंगें गुंगावें ॥ सतत० ॥ ४ ॥ दास विनवितो दीन सख्या तुज ॥ मदगघनगा भंगावे ॥ सतत० ॥ ५ ॥

## पद ॥ ५९ ॥

(राग—कालिंगडा. ताल—धुमाळी.)

काय नगरमों काय नगरमो बोलतां कोन ।। ध्रु० ।। आपहि मालीक आपहि ख्याली ।। मालीका चुनने वाला कोन ।। १ ।। आपहि काजी आपहि मुलाना ।। काजीका पालनवाला कोन ।। २।। आपहि साधू आपहि पोथी ।। पोथीका बाचनेवाला कोन ।।३।।कहत कबीरा सुन भय साधू।।साधूका पालन वाला कोन।।४।।

पद ।। ६० ।।

(राग–धनाश्री ताल–एका.]

मना ऐसा महाराज कोण आहे रे ।। नाममात्रेंचि जन्म जरा जाय।। ध्रु०।। दिनवत्सलता मी काय किती वानूं ।।पार्थासाठीं लप विला दिवसा भानु ।। मना० ।।१।। वृंदावनीं वाजवी रम्य वेणूं ।। तेणें नादें लुब्धल्या गोपि धेनू ।। मना० ।। २ ।। धरी भक्ताचे उरीं शिरीं पायरे ।। पुरि नेली वैकुंठपदा जायरे ।। मना०।। ३ ।। भिल्लिणीचीं उचिष्ट बोरें खाय ।। रिसावान्नरा एकांत करिताहे ।। मना० ।। ४ ।।अनंतकोटी ब्रह्मांडें ज्याचा पोटींरे ।।तो हा धांवतो गौळियांच्या। गाईपाठीं ।। मना० ।।५।। खांदीं कांबळी हातीं घेऊनिया काठी ।। निजानंदीं रंगला पाठीं पोटीं ।। मना० ।। ६ ।।

पद ।। ६१ ।।

( राग–गौरी. ताल–धुमाळी.)

देखिला हो हरि देखिला हो ।। विश्वव्यापक मुरारी ।।ध्रु० ।। आजि सोनियाचा दीन ।। वर्षे अमृताचा घन ।। १ ।। बरवा संतसमागम ।। प्रकटला आत्माराम।।२।।बाप रुक्मादेवीवर ।। कृपासिंधु करुणाकर ।। ३ ।।

पद ।। ६२ ।।

[राग–बिभास ताल–एका.]

तूं पाव हरि सदया।सदया सदया रे।हर हर हर भव भयकर सार्थक वर देवा ।। ध्रु० ।। घडिभरि तरि दर्शन दे ।। हृदयीं प्रगटु-

निया ॥ मन तव पदि रत करि प्रभु । सेवक रक्षाया ॥ तूं० ॥ ॥ १ ॥ तारीं दीना नंदनंदना ॥ गाइन त्वन्महिम्या लवकरि मृति भय हरुनि । शांत हृदय करि बा ॥ तूं० ॥ २ ॥

पद ॥ ६३ ॥

( राग—जिल्हा काफी—ताल—एका. )

तारी तारी यदुराया ॥ गेला गेला जन्म वायां ॥ ध्रु० ॥ दृश्य संगीं गुंग झालों ॥ क्षणिकसुखें नाहीं धालों ॥ वैराग्याचे वाटे भ्यालों ॥ वारि वारी मोह व्यथा ॥ तारी० ॥ १ ॥ नाही केली शुद्धमति ॥ कैशी घडे तंव भक्ति ॥ मार्ग चुकलों झाली भ्रांती ॥ धरुनि हातीं नेइं पंथा ॥ ता० ॥ २ ॥ आतां मजला अन्य त्राता ॥ न दिसे तुजविणें अनंता ॥ धांव वेगें कृपावंता ॥ रंक पायीं ठेवि माथां ॥ ता० ॥ ३ ॥

पद ६४ ॥

[ राग—भुपकल्याण. ताल—धुमळी. चाल—असा धरी छंद जाय० )

चौऱ्यांशी लक्ष फिरुनी फेरा ॥ नरतनु येथें मिळाला थारा ॥ व्यर्थ मायेचा तोडीं पसारा ॥ हीत आपुलें साधुनि घेई ॥ १ भुलूं नको प्राण्या सावध होई ॥ कोण मी कैचा शोध तूं घेई ॥ शरण सद्गुरुशीं सत्वर जाई ॥ भुलूं नको प्राण्या सावध होई ॥ ध्रु० ॥ संसार बेडी पडली पायीं ॥ अज्ञान हेंची वेष्टिलें देहीं ॥ हाचि विचार करुनी पाहीं ॥ उद्बोध मना ठसूं दे कांहीं भुलूं नको प्राण्या० ॥ २ ॥ भवरोग हाची दुस्तर मोठा ॥ सद्गुरू वैद्य हाचि तारिता ॥ हरिनाम मात्रा लावूनि ओंठा ॥ प्राशन करी सत्वर आतां भुलूं नको प्राण्या० ॥ ३ ॥ ॥ घडोघडीं आयुष्य जाईल वांयां ॥ व्यर्थ शिणाविली अपुली काया ॥ शरण जाई तूं सद्गुरु पायां॥ब्रह्मस्वरूप ओळखुनी घेई ॥ भुलूं नको प्राण्या०॥४

पद ॥ ६५ ॥

( राग—भैरव. ताल—त्रिवट. )

मारुंया मिठी त्या ॥ जनका आनंदें ॥ ध्रु० ॥ भावें प्रेमें विमलमनानें ॥ भेटूंच जरी प्रभुतें ॥ लाभे सुख शांति सदां ॥ मारुंया० ॥ १ ॥

पद ॥ ६६ ॥

[ राग; ताल, वरच्या पदाप्रमाणें. ]

सांडिना देवाजी ॥ सदया भीसी कां ॥ ध्रु० ॥ कैवारी जो सकल जगाचा ॥ टांकिल प्रभु तुजला कांरे अनुतापी जरी ॥ सांडिना० १

पद ॥ ६७ ॥

( राग-व्याहाग. ताल-त्रिवट. )

इस तनधनकी कोन बडाई ॥ देखत नैनोमे मटि मिलाई ॥ इ० ॥ ध्रु० ॥ अपने खातर मेहल बनाया ॥ आपहि जाकर जंगल सोया ॥ इस० ॥ १ ॥ हाड जले जैसी लकडीकी मोली॥बालजले जैसी घांसकी पोली ॥ इ० ॥ २ ॥ कहत कबीरा सुनो मेरे गुनिया ॥ आप मुवे पीछे डुब गइ दुनियां ॥ इसत० ॥ ३ ॥

॥ पद ६८ ॥

( राग-कल्याण. ताल-धुमाळी. चाल-संतपदाची जोड. )

जनहो सर्वथा भेटूं नरहरीला ॥ ध्रु० ॥ मिथ्या हें जग जाणुनि ज्याला॥संतीं दृढ धरिला ॥ जन० ॥ १ ॥ आत्मज्ञान सुखें भक्तांचा ॥ जेणें भ्रम हरिला ॥ जन० ॥ २ ॥ चिन्मात्रास जगनाथात्मज ॥ कृष्णें आदरिला ॥ जनहो० ॥ ३ ॥

पद ॥ ६९ ॥

( राग-भय्यारी. ताल-एका. ]

व्हा जागे ॥ त्यजुनि झटपट ॥ व्यर्थ खटपट ॥ बंधु एकवट ॥ रिघा शरण ॥ कर द्वय जोडून ॥ त्या दीनाच्या नाथा ॥ १ ॥ त्या भजा ॥ करूनि सत्वर ॥ शुद्ध अंतर ॥ भाव निर्भर ॥ हाका मारा ॥ ह्मणा बापा तारा ॥ ठेउनि चरणीं माथा ॥ २ ॥ ध्या

तथा ॥ त्यजा विषय विखा ॥ भक्तिरस चाखा ॥ भोगा स्थिर सुखा ॥ स्वहित साधा ॥ धरुनि मार्ग सिधा ॥ सोडावि विविध पंथा ॥ ३ ॥

## पद ॥ ७० ॥

(राग—कालंगडा. ताल—त्रिवट. चाल—दत्तात्रया श्रिपाद.)

तो तो सुखात्मा करि स्वहित साचें जो ॥ ध्रु० ॥ पावतां मनुष्य देह॥ सांडुनि वैषयिक स्नेह॥विसरुनिं स्त्रीपुत्र गेह॥श्रीगुरुपदीं रत होवूनि॥स्वरुप मात्र जो ॥ तो तो सु० ॥ १ ॥ देखतांचि दृश्य द्वैत॥कोण मी हा धरूनि हेत ॥ आपुला आपण शोध घेत॥सच्चित्सुख विवरणांसि परम पात्र जो ॥ तो तो सु० ॥ २ ॥ विष्णुगुरूपदाब्जभृंग ॥ कृष्ण सेवि तो असंग ॥ चिदानंद मधु अभंग प्राशित निज हित उमजुनिं॥दिस रात्र जो ॥ तो तो सु०॥ ३ ॥

## पद ॥ ७१ ॥

(राग—काफी. ताल—धुमाळी.चाल—दया धरम नहि)

जिसकी लागी है सोजानें॥ दुजाक्या जाने भाई ॥ ध्रु० ॥ एका लागी बेका लागी लागी सनक साई ॥ बलख बुखारेकूं ऐसी लागी॥ छोड चले बाछाई ॥ दुजाक्या० ॥ १ ॥ नामालागीं सुधन्वालागी लागी निराबाई॥ पीपाजी की ऐसी लागी पडे समुदर भाई ॥ दुजाक्या० ॥ २ ॥ ध्रुवालागी प्रल्हादालागी लागी बिभीखनभाई ॥ सुदामजोकूं ऐसी लागी कांचनपुरी रमाई ॥ दुजा० ॥ ३ ॥ तीर न लागी तलवार न लागी घाव नजर नहि आया ॥ दास कबीरकूं ऐसी लागी दिलमें राम जमायी ॥ ४ ॥

## पद ॥ ७२ ॥

(राग—जयजयवंती ताल—त्रिवट.)

दयासागर पिता करुणा निधान ॥ विसरूं नको क्षण ॥ ध्रु० ॥ रोग शोक पाप दुःखी ॥ तोचि ठाके संमुखी ॥ सोडुनि दुर्बल-

सुता नाहीं करित गमन ॥ दया० ॥ १ ॥ उघडोनि हृदय द्वार ॥ हांक मारी वारंवार ॥ देई प्रीति उपहार करी दर्शन॥ दया० ॥ २ ॥

॥ पद ७३ ॥

( राग–काफी ताल–धुमाळी. चाल–भय्या राम कहोरे भव )

संगन संतनकी करले ॥ जन्मका सार्थक कछु करले ॥ मु० ॥ उत्तम नरदेह पाया प्रानी इसका हित कछुरकरले॥ सद्गुरु शरण जाके बाबा जन्म मरण दुर कर ले ॥ संगत० ॥ १ ॥ कंहासे आया कहां जावे गा ये कछु मालुम करना ॥ दो दिनकी जिनगानी बंदे हुशार होकर रहना ॥ संगत० ॥ २ ॥ कोन कीसीके जोरू लरके कोन किसीके साले ॥ जब लग आपना पल्लव बाढत तब लग मीठा बोले ॥ संगत० ॥ ३ ॥ कहत कबीरा सुन भई साधू बार बार नहिं आना, अपना हित कछु करले प्यारे आखर अकेला जाना ॥ संगत० ॥ ४ ॥

पद ॥ ७४ ॥

(राग–काफीजिल्हा. ताल–त्रिवट.)

तुजविणरे भगवान् ॥ कोठेंच मन हें न जडो ॥ ध्रु० ॥मिथ्या ऐसें जाणुनि सकळहिं ॥ विषयसुख नावडो ॥ प्रभुसत्तेनें जे जे समर्थी ॥ घडेल तें सुखि घडो ॥ तु० ॥ १ ॥ योग लक्ष निज धैर्यबळें ॥ जिव मोहांत न सांपडो ॥ आयुष्य सरल्या कधीं तरीं ॥ देह पडेल तेथें पडो ॥ तु० ॥ २ ॥ प्रपंच राहाटीं वर्तत असतां ॥ कुणिकडे चि ना अडो ॥ वैराग्याग्निनें प्रचंड होउनि॥ अखंडित कड कडो ॥ तु० ॥ ३ ॥ म्हणें सोयरा विपरीत बुद्धिचा कुसंग हा विघडो ॥ मुमुक्ष होउनि शुद्धब्रह्मींचें मोक्षद्वार ऊघडो ॥ तु० ॥ ४ ॥

पद ॥ ७५ ॥

( राग—काफी.ताल—घुमाळी. चाल—गाफिल मत बेटा सिरपर जेम० )

तनका नहीं भरवसाबे ॥ देखे काल तमासाबे ॥ ध्रु० ॥ बडे राजमो राज विराजो मतजानो सुख भेला ॥ कौन कीसीका नहि रे यारो आखर जात अकेला ॥ तमका० ॥ १ ॥ चोप चापके पगरी बांधी बालपेंच सवाई ॥ मूछा मुरडकर दर्पन देखे ढाल फिरंग रह जावे ॥ तनका० ॥ २ ॥ शालदुशाला पटु ओडे खावे गरम मसाला ॥ जब आवेगा जमका फांसा होवे गर्दी हल्ला॥तनका०॥३॥कहत कबीरा सुन भई साधू मारग सिधा सवारे॥नजर खोलकर देखो यारो ये सब झुट पसारा॥त० ॥४॥

पद ॥ ७६ ॥

( राग—परज.ताल—घुमाळी.चाल—कायकुं तेरा संग रामजी० )

करो गंगाजल पार ॥ गोहकजी करो गंगाजल पार ॥ ध्रु० ॥ लावो तारो उतार न मागू॥कोई दिन रहो उधार॥हमसें क०॥१॥ तीन मूरत हम तिरथबासी ॥ जानुं कछु उपकार ॥ हमसे करो० ॥ २ ॥ जीवनसुतप्रभु दीनबदनसो ॥ मेरत बारी बार हमसे करो गंगाजल पार ॥३॥

पद ॥ ७७ ॥

( राग—कालंगडा.ताल—घुमाळी.चाल—अहो तुह्मी ऐका० ० )

कारे भुललासी ॥ यमा काय जाब देसी ॥ ध्रु० ॥ सर्व ह्मणसी माझें माझें ॥ कुटुंबाचें वाहे ओझें ॥ अंतकाळीं कोण तुझें ॥ यकलाची जाशी ॥१॥ आलाशीं कौठुन जाशिल कोठें ॥ आगम निगम वाहे वाट॥काय जबाब देशी॥कारे भुललाशी॥२॥

पद॥ ७८ ॥

( राग—बेहाग—ताल—त्रिवट. )

तूं मेरे प्रानआधार ॥ प्रभुजी ॥ तूं मेरे० ॥ ध्रु० ॥ नमस्कार दंडवत बंधना ॥ अनक बार जाऊं वार ॥ प्रभु० ॥ १ ॥ उठ-

त बैठत सोवत जागत ॥ ये मन तुजही चितार ॥ प्रभु० ॥ २॥ सुख दुःख मनकी सबही बर्था ॥ तुजही आज्ञासार ॥ प्रभु० ॥ ३ ॥ तूं मेरे ओटबल बुद्ध धन तुमही ॥ तूं मेरे परवार ॥ प्रभु० ॥ ४ ॥ जो तुम करा सोई फल हमरे ॥ पेरव नानक गुरुचरणार ॥ प्रभु० ॥ ५ ॥

पद ॥ ७९ ॥

( राग–असावरी.ताल–चौताल. )

तारी गा दिनासी दीनबंधु ब्रीद जगीं गाजन ॥ ध्रु० ॥ नसे कांठें मना शांति भेट दे जगन्नाथ ॥ कातर हृदय हा रंक पावें परात्पर ॥ तारी० ॥ १ ॥

पद ॥ ८० ॥

( राग–जिल्हा काफी, ताल–दीपचंदी. )

भज भज तो भगवंत ॥ जया न आदि न अंत ॥ ध्रु० ॥ ध्याउनि पावनीं उत्तम सुख ज्या ॥ चित्तीं संतत संत ॥ जया० ॥ १ ॥ आर्त्तजनाचा ताप निवारी ॥ जो नित्य दयावंत ॥ जया० ॥ २ ॥ जाशि शरण त्या भाव धरोनि ॥ लाभेल सुख अनंत ॥ जया० ॥ ३ ॥

पद ॥ ८१ ॥

( राग–ताल–वरच्या पदाप्रमाणें. )

अनन्य शरण रिघा हरिला ॥ तारक तो जगदीश्वर जाणुनि ॥ ध्रु० ॥ अनंत करें वर द्याया भक्तां ॥ पाशी नित्य उभा ॥ हरिला० ॥ १ ॥ कांस धरा विश्वासें तयाची ॥ देणार नाहीं दगा ॥ हरिला० ॥ २ ॥ मानव देही साधन हें करिं ॥ एका जनार्दनि गा ॥ हरिला ॥ ३ ॥

पद ॥ ८२ ॥

(राग–काफी. ताल–धुमाळी.चाल–जमका अजप०)

जमसों नहीं डरोंगा बे ॥ हरिका भजन करोगा बे ॥ ध्रु० ॥ अहंता मारूं ममता मारूं खानजाद मै कहाऊं ॥ मन मेरा अब चौकस राखूं चित्त चैतनमे मिलाऊं ॥ जमसो० ॥ १ ॥ रामनामका घोडा मेरा मैदाने दवडाऊं ॥ भजनप्रताप हातमें बर्छी सन्मुख लेकर जाऊं ॥ जम० ॥ २ ॥ और लोक कसबके चाकर मै हुजूरका काजी ॥ कामक्रोधकी गरदन मारूं साहेब राखूं राजी ॥ जगसो० ॥ ३ ॥ मै साहेबका साचा चाकर मेरा नाम कबीरा ॥ सब संतकुं शीसन माऊं जो हरि पारखे हीरा ॥ जमसों० ॥ ४ ॥

पद ॥ ८३ ॥ ✓

( राग-भैरवी. ताल-त्रिवट. )

वद नामचि ते सार ॥ रसने वद० ॥ ध्रु० ॥ गोरस मधुरस इक्षुरस सुधारस ॥ नवरस तेहि असार ॥ रसने० ॥ १ ॥ तळमळसी किती करिसी कीं हे ॥ वेडे वेडे चार ॥ रसने० ॥ २ ॥ भक्तमयूर कृपावन राघव ॥ उघाडिलें मुक्तिद्वार ॥ रसने० ॥ ३ ॥

पद ॥ ८४ ॥

( राग-बिभास. ताल-एका. )

आठवूं तुज देवा प्रेमें भक्तजन तूं सखा ॥ सांभाळुनियां निजदासातें देशी नित्य सुखा ॥ ध्रु० ॥ अनंत प्रीति अपार करुणा अगम्य तुझी कळा ॥ अगाध तुझें ज्ञान भासतें सीमा न दिसे बळा ॥ अतर्क्य चातुर्यानें केलें भूपित त्वां भूतळा ॥ भिंती घालितो सद्भावानें तुझ्या मंगलगळा ॥ आठवूं० ॥ १ ॥ त्रिभुवनि तुझी कीर्ति गाते काय गावि मानवें ॥ मतिहीन तुज जोडूं पाहूं आळवूनियां स्तवें ॥ अनेक रिपु संसारीं गांजितो त्यांसीं वारावें ॥ सन्मति देउनि सन्मार्गातें आह्मा लावावें ॥ आठवूं० ॥ २ ॥ कृपा सदोदित तुझी आह्मां दीनावरती असो ॥ तुझ्या भक्तिचा प्रेमा देवा दासां हृदयीं वसो ॥ जेणें तुझी विस्मृति पडते ऐशी

बुद्धि नसो ॥ मोक्षसाधन व्यवसायीं मन सदैव रमलें असो ॥ आं-
ठवूं तुज देवा प्रेमे भक्तजना तूं सखा ॥ ३ ॥

पद ॥ ८५ ॥

( राग–कल्याण ताल–धुमाळी. )

तो योगी विषयीं विरागी ॥ अंतरीं निःसंगी ॥ शम दम करुणा अंगीं ॥ निजसुख आपुलें भोगी ॥ नित्यानित्य विचार विलोकुनि दृश्य पदार्थ त्यागी ॥ तो योगी० ॥ १ ॥ तो पाहे सर्वहि ब्रह्मचि आहे ॥ निज बोध डुलताहे ॥ तर्जन गर्जन साहे ॥ देहाभिमान न वाहे ॥ त्रिभुवनिचा अधिपति होउनिया ॥ अखंड तन्मय राहे ॥तो॥पाहे॥२॥ आघाती ॥ जो न ढळें कधि चित्तीं ॥ नच सांडी हरिभक्ती ॥ लेखी तनुधन माती अनृत नये वचनोक्ती ॥ लाभालाभ स्तुति निंदा सम॥तो केवळ निज मूर्ती ॥ आघाती ॥३॥ तो ज्ञानी ॥ सत्ता सुख जो मानी ॥ चिद्रत्नाची खाणी ॥ लावूनि ऐक्य निशाणी ॥ वेद जयाला वाणी ॥ रंगताति निजरंग पदीं जो ॥ खेळे अचळ विमानीं ॥ तो ज्ञानी ॥ ४ ॥

पद ॥ ८६ ॥

( राग–रामकली. ताल–धुमाळी. चाल–विठ्ठल भक्ताची माउली द्रौपदी वहिण. )

श्रीरंगा दे मजला सत्संगा ॥ आलों शरण तुला ॥१ ॥ रघुनाथा ॥ आवडो तुझे गुण गाता ॥ आ० ॥ २ ॥ गोविंदा ॥ सोडवि विषयछंदा ॥ आ० ॥ ३ ॥ स्वानंदा विसरवि विषयछंदा ॥आ० ॥ ४ ॥ श्रीकृष्णा ॥ दूर करीं धनतृष्णा ॥ आ० ॥ ५ ॥ रघुराया ॥ आवरी आपुली माया ॥ आ० ॥ ६ ॥ गोपाळा उघडी चिन्मय डोळा ॥ आ० ७ ॥ श्रीरामा ॥ दे मज भजन प्रेमा ॥ आ० ॥ ८ ॥ घनश्यामा ॥ नेई मज निजधामा ॥ आ० ॥ ९ ॥ भगवंता ॥ तारी विठ्ठलपंता ॥ आलों शरण तुला ॥१०॥

पद ॥ ८७ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. )

मेरा घुंगुरुपद घुंगुरुरे ॥ पगघुंगुरु बाध करनाचोरे ॥ध्रु०॥ मै अपने तो नारायणकी ॥ हो गयी आब ही दासी रे॥१॥ लोक कहे मीरा भई रे बावरी ॥ बाप कहे कुलनाशी रे ॥ २॥ मीराके प्रभु गिरि-धरनागर ॥ चरणकमल बलहारी रे ॥ ३ ॥

पद ॥ ८८ ॥ ✓

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–वोवरि तळमरे)

आह्मीं नमुं त्याला, नमुं त्याला ॥ उपाधि नाही ज्याला ॥ध्रु०॥ संशय उरला नाहीं ॥ अवघा ब्रह्मचि झाला पाहीं ॥ आह्मीं० ॥ ॥ १ ॥ स्वयंभु मुळचा आहे ॥ द्वैतपणासि गिळुनि राहे ॥ आह्मीं०॥ २॥समूळ अवघें हरलें ॥ पूर्ण निर्गुण जयासि कळलें ॥ आह्मीं० ॥ ३ ॥ रंगनाथ गुरुरायीं ॥ ज्याचा निश्चय दुसरा नाहीं आह्मीं० ॥ ४ ॥

पद ॥ ८९ ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. )

वद वद वद वद रसने नाम श्रीहरीचें ॥ कर कर कर सार्थक या अतुल जिवनाचे ॥ ध्रु० ॥ तोचि दीनबंधु हरिल ॥ प्रेमें अति जाड्य अखिल ॥ सद्भावें हृदय भरिल॥ स्वीय सेवकाचें ॥ वद० ॥ १ ॥ कोण प्रभूविण सदय ॥ सत्कार्यी देइल जय ॥ घोर-दुःख टाळिल भय ॥ दीनअनाथाचे ॥ वद० ॥ २ ॥ आठवि तरि जगदीश्वर॥ तोचि एक भवयभहर ॥ भजन अति प्रेमेल कर ॥ निशिदिनीं तयाचें ॥ वद० ॥ ३ ॥

पद ॥ ९० ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

आसे ही थट्टा ॥ भलभल्यासी लाविला बट्टा ॥ ध्रु० ॥ थट्टा गेली शंभोपाशीं ॥कलंक लाविला चंद्रासी ॥ भंगें पाडीलीं इंद्रासी ॥ बरि नव्हे थट्टा ॥ भलभल्या० ॥ १ ॥ थट्टेनें मेला दुर्योधन

॥भस्मासुर गेला भस्म होऊन ॥ वाळी ही मुकला आपुल्या प्राणा ॥ असी ही ॥ भलभ० ॥ २ ॥ थट्टा रावणानें केली ॥ नगरी सोन्याची डुबविली ॥ थट्टा ज्याची त्यास भोगली ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भलभ० ॥ ३ ॥ आरण्यांत होता शृंगऋषी ॥ थट्टा गेली त्याचेपाशीं ॥ भुलउनि आणिला अयोध्येसी ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भलभ० ॥ ४ ॥ विराटराजाचा मेहुणा ॥ नाम तयाचें कीचक जाणा ॥ त्याणें घेतले बहुतांचे प्राणां ॥ बरी नव्हे थट्टा ॥ भलभ० ॥५॥ थट्टेपासुन सुटले चौघेजण ॥ शुक भीष्म आणि हनुमान ॥ चौथा कार्तिकस्वामि जाण ॥ त्यांला नाहीं बट्टा ॥ असी ही थट्टा ॥ भलभ० ॥ ६ ॥ गोसावीनंदन ह्मणें सवाला ॥थट्टेला भिऊन तुह्मि चाला ॥ नाहीं तरी नेईल नरककुंडाला ॥ असी ही थट्टा ॥ भलभल्यासी लाविला बट्टा ॥७॥

पद ॥ ९१ ॥

( राग–ललत. ताल–चौताल. )

सावध सावध होउनि स्मरा पावन नाम ॥ ध्रु० ॥ करा हो सार्थक वेगें जीवन नश्वर कीं हो॥यासंसारीं भ्रमता कां हो॥सावध०॥

॥ पद ९२ ॥

( राग कल्याण ताल धुमाळी. चाल रामकथारस)

वारे जन्मोनी केलेंस काय ॥ ध्रु० ॥ घडि घडि पल पल वय हें जातें॥व्यर्थ श्रमविली माय ॥१॥ कोण कैसा तूं आलास कोठून ॥ हेंचि मनीं शोधुनि पाहे ॥ २ ॥ एकाजनार्दनि शरण तूं जाई ॥ धरि सदां गुरूचे पाय ॥ ३ ॥

पद ॥ ९३ ॥ ✓

( राग–पूर्वी ताल–त्रिवट. )

कसा करिल भव पार ॥ हरी मज कसा० ॥ध्रु०॥ तन मन धन विषयां गुंतलें ॥ भजनीं आळस फार ॥ हरि० ॥ १ ॥ मी एक

गायक मी एक वैदिक ॥ हाचि उठे अहंकार ॥ हरि० ॥ २ ॥ खटपट करितां वांया गेली ॥ नाहीं केला उपकार ॥ हरि० ॥ ३ ॥ आदि नारायण जोडुनि पाणी ॥ पतित करिं उद्धार ॥ हरि भज० ॥ ४ ॥

## पद ॥ ९४ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

नारायण नामाच्या छंदें नाचत महिंवरती॥पहाहो॥ १॥नारद योगी नाना भुवनें फिरूनिया येती॥पहा हो ॥२॥ अति दुःखानें पीडित मानव बघतां गहिंवरती॥पहा हो॥ ३॥ वारुनि त्यांचें दुःख हराया हेतु मनीं करिती ॥ पहा हो ॥ ४ ॥

## पद.॥ ९५ ॥

(राग–हिंडोल.ताल–त्रिवट.)

याहो गडे याहो गडे । निजहित साधूं ॥ ध्रु० ॥ गगन मंदिरिं । गंभिरसागरीं । गिरिगव्हरीं । हृदयीं भूतनाथा । धुंडूं हो सदया॥ निज० ॥ १ ॥ तळमळ न मिटे । भय न सुटे । जरी नुमटे । अंतरीं कृपासिंधु । ध्याऊं हो सखया ॥ निज० ॥ २ ॥

## पद ॥ ९६ ॥

( राग–झिंजोटी. ताल–धुमाळी. चाल–रामनाम तूं भजरे प्रा० )

सुनबे सुन निरगुकी बाता ॥ साधुसंत कैलाताहै ॥ अर्थ छोडके अनर्थ करता॥पोथी बाच सुनाताहै ॥ सुन० ध्रु०॥ क्या निरगुन पोथींमे बैठा ॥ फेर केव तुजे नही पाता है ॥ सच्चिदानंदकी खबर न जाने ॥ झूटा दील बहेलाता है ॥ सुन० ॥ १ ॥ क्षर अक्षरका खोज कियेबिन ॥ अजरनजर नहीं आता है॥ग्यानध्यान निरगून निरंजन ॥ सद्गुरुनाथ बताता है ॥ सुन० ॥ २ ॥ अमृत कहे सो कोन अमर भया ॥ बीख कहे कोई मरता है ॥ ऐसा पंडित नित उठ पोथी ॥ बाच बाच पस्ताता है.॥ सुन०॥

॥ ३ ॥ सन्ना सद्गुरुनाथ निरंजन॥ भवभंजन दुःख हरता है ॥ दास नवल कहे उनके कृपासें ॥ नयनोमें नाम सुमरता है ॥ ४ ॥

पद ॥ ९७ ॥

( राग–काफी. ताल–धुमाळी. )

नारायणा न तुज ओळखिला ॥ ध्रु० ॥ न कळे कांहीं वाटत गोड विषय ॥ साठत पापनिचय आटत सकळ वय ॥ कांरे हरे उगिच मला॥ भ्रम येथ करुनि ठेला ॥ नारा० ॥ १॥ नाहीं नामरस प्रेम धरुनिया सेवियला ॥ फिरतां संसारीं हे लुब्ध झाला ॥ साच अनुदिनीं जाच होय जिव वांयां गेला ॥ कांरे० ॥ नारा० ॥ २॥ दृढ आशापाश तेणें जाय परसदनाला ॥ भासे दुर्दैव योग आड आला ॥ भजन पुजन ध्यान न घडे खलचि केला ॥ कारे०॥ नारा० ॥ ३ ॥ विप्र जगन्नाथ बाळ करि आळ होई त्याला ॥ प्रसन्न तोडीं भवबंधनाला ॥ दुर्जन षड्वैरो यांचे संगा कृष्णदास भ्याला ॥ कां० ॥ नारा० ॥ ४ ॥

पद ॥ ९८ ॥

( राग–काफी. ताल–धुमाळी. चाल–तारि तारि रामराया० )

देवा तुझ्या उपकारा ॥ नाहीं नाहीं पारावारा ॥ ध्रु० ॥ माझे अपराध अगणित ॥ परमावधि अपरमित ॥ गणितां थकला चित्रगुप्त ॥ ऐशा मज तारिसी पामरा ॥ देवा० ॥ १ ॥ पृथ्वी आप तेज वात ॥ आकाश हें मन अद्भुत ॥ माझे स्पर्शी कंटाळत ॥ ऐशा तारिसी मज दुर्धरा ॥ देवा० ॥ २ ॥ दुर्धर परि तुझा ह्मणवित ॥ चरणीं अर्पूनि सर्वही हेत ॥ पतित करावा पुनित ॥ दीनोद्धारा मयुरेश्वरा० ॥ देवा० ॥ ३ ॥

पद ॥ ९९ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी.चाल–क्षणभंगुर संसार० )

संत दयाळ कसे ॥ राजा रंक जया सरिसे ॥ ध्रु० ॥ देउनि भेटी-

तोडिति माया ॥ नेउनि दाविति निजपद ठाया ॥ संत० ॥ श्रवणीं पाजुनि अमृतवाणी ॥ नेउनि दाविति चिन्मयखाणी ॥ संत०॥२॥ शिवरामाचें अभिनव लेणें॥ लेवविलें मज पूर्णकृपेनें ॥ सं० ॥३॥

## पद ॥ १०० ॥

(राग—कालंगडा. ताल—त्रिवट.)

हरिसें कोई नहिं बडा दिवानें क्यौं गफलतमें पडाजी॥ध्रु० ॥ प्रल्हाद बेटा हरिसें लपटा॥जबी खांब कडकडा ॥ दिवानें ॥ १ ॥ गोपीचंदा बचन सुनकर ॥ महाल मुलुख सब छोडा ॥ दिवानें ॥ ॥ २ ॥ हनुमानसें सेवा कीनी ॥ ले द्रोणागिरी उडा ॥ दिवानें ॥ ॥ ३ ॥ पुंडलीकनें सेवा कीया ॥ विठ्ठल इटपर खडा ॥ दिवानें ॥ ॥ ४ ॥ कहत कबीरा सुन भई साधू॥हरिचरन चित्त जडा दिवानें ॥ ५ ॥

## पद ॥ १०१ ॥

(राग—कालंगडा ताल—धुमाळी.)

पांचि हेतू नये तो जन्मा जो महत्पदाब्ज पयरगाश्रित प्राप्त विज्ञानी ॥ पां० ॥ ध्रु० ॥ अहंता त्यजी त्या महंति समता पावे निजा नंद निष्कर्मी ॥ सत्यंज्ञानमनंतं ब्रह्म निजात्मानुभाव ध्यानी ॥ पां० ॥ १ ॥ प्राप्ता प्राप्तीं न हाले अखिलात्मत्वें साधी ॥ निजात्मैक्यवर्त्मी संतप्त तेहि निवतिमृयद्राग ह्यतें निराभिमानी ॥ पा०॥२॥ दास्यत्व करिता वैष्णवसद्गुरुचरणाचें भेटेअखंडचिच्छर्मा॥अजस्त्रमव्यभिचारिणीभक्तियुक्ता श्रीकृष्णवाणी पां०॥३॥

## पद ॥ १०२ ॥

(राग—यमन. ताल—त्रिवट.)

लौकरि धांवत धांवत सदया ॥ चपल ऊडी हरि घाल ये॥ध्रु० ॥ गांजिति हे मज वैरी सारे ॥ न कळति तुजला हाल ये ॥ लौकरी० ॥ १ ॥ या समयीं प्रभु आश्रय नाहीं॥चालुं नको तूं चाल

न जाणो यमहीन जाणो ॥ नेणो अन्य उपाय ॥ आह्मी० ॥ १ ॥ परिस देउनी सोनें घेणें॥जळो त्याचा व्यवसाय॥आह्मी० ॥ २ ॥ कृष्णाचे पद सोडुनि आह्मी ॥ मुक्ती वरूं हयहाय आ०॥ ३ ॥ आह्मी जा०

## पद ॥ १०९ ॥

( राग–कल्याण. ताल–एका. चाल–संत पदांची जोड. )

गडचोनों घ्या हरिच्या नामा ॥ लिहितां कशास ओ नामा ॥ ध्रु०॥सांगतों ऐका एक वर्म ॥ पहावे भागवतीं धर्म॥दुःखसें प्राप्त होय शर्म॥यत्न त्या कशास रे परम॥ न पावे हरिवांचुनि क्षेमा ॥ लिहितां० ॥ १ ॥ शरण सद्गुरुला जावें ॥ हरि भजानें नच लाजावें ॥ हरिचें सगुणरूप ध्यावें ॥ निर्मळ भावें पूजावें ॥ सांडुन हृदयांतिल कामा ॥ लिहिता० ॥ २ ॥ गृह धन जन यांची ममता ॥ धरुनि व्यर्थची कां श्रमतां ॥ हृदयीं वागवुनी समता॥ हरिचें चरणांबुज नमितां ॥ नेईल हरि तो निजधामा ॥ लिहितां कशास ओ नामा० ॥ ३ ॥

## पद ॥ ११० ॥

( राग–कालंगडा, ताल–एका )

है कोई ऐसा मुशरद मौला॥रंगमें खुदा बतावेगा ॥ लखचौऱ्यासी फेरा चुकाके॥जनम मरनकूं तोरेगा ॥ध्रु०॥पंच तनूके दगराभीतर ॥ दिलतकियेकु बिछावेगा ॥मनमक्कामें मुजे बिठाके॥बिसमिल्ला कलमा पढावेगा ॥ १ ॥ आरश कुरश दीरार झोरा ॥ महेरम मेरा खुलावेगा॥उसके अंदर मुजे लिजाके ॥ नमाजके बयान सिकावे गा ॥ है० ॥ २ ॥ सब जीवनका नुक्ता घोटके ॥ ऐसा प्याला पिलावे गा ॥मेरा चेरा मुजे बताके॥ नूर नबीमे मुलावे गा॥ है०॥ ३ ॥ मीहं महंमद रसुलील्ला ॥ आलफ नाम निशा चढावे गा ॥ चौदा तबकके आंदर सुलाके ॥ मेरे तै झुलावे गा ॥ है०॥ ४ ॥

बेचुनकु बेचगुनकु बेशुभाकु दिखावेगा ॥ बेनमनकु बेभारिकु ॥ आयन आलिमे मिलावेगा ॥ है० ॥५ ॥ कहे कमाल कबीरका बालक ॥ तनकी कीताब सुनावे गा ॥ बावन हरपका मायना बताके ॥ भेद भरमकु मिटावेगा ॥ है० ॥ ६ ॥

पद ॥ १११ ॥

( राग-यमन, ताल-चौताल. )

ध्याऊं या । सत्य सनातन जो प्रभु पूर्णज्ञानआनंद ॥ ध्रु० ॥ निराकार जो शुद्ध शांतिरूप ॥ परमात्मा सर्वात्मा जगच्चालक अद्वैत शिव अनंत ॥ ध्याऊंया० ॥ १ ॥

पद ॥ ११२ ॥

( राग-कालंगडा. ताल-एका. )

बंदे क्यौं भुलाजी क्यौं भुलाजी ॥ आखर खायगा झोला॥ ध्रु० कवडी कवडी लाख जोडे ॥ आखर ज्यायगा खूला बंदे॥१॥ मा बहेन जोरु लडके ॥ कोन किसका साला बंदे॥२ ॥ कहत कबीरा सुन भय साधु ॥ कर साहेबसो सल्ला ॥ ३ ॥ बंदे० ॥

॥ पद ११३ ॥

[ राग-ललत. ताल-त्रिवट. ]

धन्य तेचि कीं भजति हरिला ॥ ध्रु० ॥ देह गेह मोह सर्वहि टाकुनि ॥ संतसमागमीं गाति यशाला ॥ धन्य० ॥ १ ॥ तारक सर्वोत्तम हरि मानुनि ॥ आठविती मनीं सतत अजाला ॥ धन्य० ॥ २ ॥ दैवी भूषणें अंगीं लेउनि ॥ भगवद्भावें नमिति जगाला ॥ धन्य० ॥ ३ ॥ ईश्वरसत्ता स्वीकारि सुखें ॥ शोक हर्ष भय हृदयीं न ज्याला ॥ धन्य० ॥ ४ ॥ सर्वेंद्रिय दास्यत्वीं योजुनि ॥ घडिघडि स्मरती पूर्ण कृपेला ॥ धन्य० ॥ ५ ॥

पद ॥ ११४ ॥

( राग-पिलु. ताल-दादरा. चाल-भजभजभवजल. )

नरतनु हे नव्हे साच भ्रमता कशाला ॥ ध्रु० ॥ नूतन संपत्तिवि-

कार ॥ धरुनि फार अहंकार ॥ करुनि कनकअलंकार ॥ वो-
ढिती दुशाला ॥ नर० ॥ १ ॥ सांडुनि हरिकृपाधनासि ॥
आवडि कामिनीधनासि ॥ हेचि मूळ निधनासि ॥ तुमजा अ-
शाला ॥ नर० ॥ २ ॥ नाथभुजंग' ह्मणें उपाय ॥ धरा रे सद्गुरुचे
पाय॥सकळ साधती उपाय ॥ भेटा जगदीशाला ॥नर०॥ ३ ॥

॥ पद ११५ ॥

( राग– कालंगडा. ताल–एका. चाल–भाईरामनाम. )

संसारचिंता कां करितां सोडा ॥ ध्रु० ॥ देह नव्हे हा शाश्वत
याचा ॥ विश्वासहि थोडा ॥ सं० ॥ १ ॥ निज हृदयस्थित
राम कळाया ॥ सद्गुरुचें पद जोडा॥ सं० ॥ २ ॥ संसारसाक्षि
अलक्ष लक्षुनि॥आवरा मन घोडा ॥ सं० ॥ ३ ॥ उडतां वृत्ति
आत्मस्मरणें ॥ आपणांतचि ओढा ॥ सं० ॥ ४ ॥ विष्णु कृष्ण
जगन्नाथ ह्मणें ॥ भवबंधन तोडा ॥ सं० ॥ ५ ॥

पद ॥ ११६ ॥

(राग–गौरी. ताल–एका.चाल–गाफिल मत रहना बे.)

हरकछु करनारे२॥साहेब राजी रखनारे॥ध्रु० ॥ दोंदिनकी जिं-
दगानी बाबा ॥ राहासें क्यौं नहि चलता॥ काल झपटकर ले जा-
वे गा॥फिर फिर गोते खाते ॥हर० ॥ १ ॥झूटी काया झूटी माया
झूटी बात बताते ॥ झूटा देना झूटा लेना॥ आखरकूं पस्तावे ॥
हरक० ॥ २ ॥ मागनवाला आया दरवाजे ॥ उसकूं नहि नहीं
कहते ॥ घरमें तो भरी खुब है दौलत ॥ मागनकूं नहि देते ॥
हरक०॥ ३ ॥कहत कबीरा सुन भइ साधू॥ये संतनका लडका॥
हरिभजनमें रम रहूंगा ॥ नही कालका धोका ॥ हर० ॥४॥

पद ॥ ११७ ॥

( राग–भूपकल्याण. ताल–एका. चाल–वदववववदरस. )

धणी सकलतरणिकुलजनृपतिमुकुटमणी रे ॥ ध्रु० ॥ परमस-

दय हृदयवरद ॥ दुरितजलधिपतितकरद ॥ शतमखमुखवि-जयवरद ॥ खचरनिकरपवनफणी ॥ धणी० ॥ १ ॥ असुर दनुज नमन मात्र ॥ करुनि होय भव्यपात्र ॥ शरण आलिया-सि जो न ॥ पूर्व कर्म किमपि गणी ॥२॥धणी०॥ भक्तमोर ज्या समोर ॥ नटति निउनि अमित थोर ॥ सजलजलदनील वि-मलशीलमुख्यवर्गगणी ॥ धणी० ॥ ३ ॥

पद ॥ ११८ ॥

[ राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—राग कथारस पीपी. ]

संतपदाची जोड ॥ दे हरि संत पदाची जोड ॥ ध्रु० ॥ संत समागमें आत्मत्वाचा ॥ सुंदर उगवे मोड ॥ दे हरि० ॥ १ ॥ सुफलित करुनी पूर्ण मनोरथ ॥ पुरविशि जिविचे कोड॥दे हरि० ॥ २ ॥ अमृत ह्मणे रे निजभक्ताचा ॥ सेवट करिशी गोड ॥ दे हरि० ॥ ३ ॥

पद ॥ ११९ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—तोंवरि तळमळे )

जन कां निंदिना निंदीना ॥ तसेंच निंदू द्याना ॥ ध्रु० ॥ निंदक करिती निंदा ॥ निंदिति हरळी शिपी कुंदा ॥ १ ॥ जन० ॥ काय चाड जनासी ॥ रतलों सद्गुरुच्या चरणासी ॥ २ ॥ जन० एका जनार्दनि भावें ॥ आह्मीं कोणासी भांडावें ॥ जन कां ३ ॥

पद. ॥ १२० ॥

( राग—भैरवी, ताल—त्रिवट. )

पतितनको पावन कीजे ॥ तुमबिन कछू हु न सूझे हो ॥ ध्रु०॥ जो जो आये सरन तिहारे ॥ ताहे प्रेमसुख दिजे हो ॥ पतित नकों० ॥ १ ॥ राखो लाज बिरदबानेकी ॥ मोहे अपनो कर लिजे हो ॥ पतितनकों० ॥ २ ॥ मानपुरी प्रभु अधम उधारन॥ पल पल यह तन छीजे हो ॥ पतितनकों० ॥ ३ ॥

## पद ॥ १२१ ॥ √

( राग-कालंगडा, ताल-धुमाळी )

कोठें नवजावें २ ॥ श्रीहरि लागीं भजावें ॥ ध्रु० ॥ दो चों दिवसां घांटा ॥ भरडुनि उदक करुनियां प्यावें ॥ १ ॥ कोठें० ॥ समयीं आल्या अतितासी ॥ यथाशक्ती भोजन द्यावें ॥ २ ॥ कोठें० ॥ उठतां बसतां धामीं ॥ अमृतेश्वरासी ध्यातची जावें ॥ कोठें न वजावें ॥ ३ ॥

## पद ॥ १२२ ॥

( राग-बेहाग. ता० चौताल.)

हे रामा तव ध्यानीं मन्मन राहों स्थीर ॥ ध्रु० ॥ तुझ्यावीण वाटो ॥ पळभरही न, मना हरि सौख्य ॥ हे रामा० ॥ १ ॥

## पद ॥ १२३ ॥

( राग-कालंगडा, ताल-धुमाळी, चाल-बरवे समजारे उमजारे )

नरहरि तो भेटवा हो ॥ कोणि तळमळ माझे चुकवा हो ॥ न० ॥ ध्रु० ॥ देईन मी द्विज काय तुह्माला ॥ करिन चरणसेवा हो ॥ नर० ॥ १ ॥ कशाला हा संसार पुरे मंज ॥ होती जाच जीवा हो ॥ नर० ॥ २ ॥ सज्जन जे तुह्मीं सदय तयातें ॥ मजसाठीं शिनवा हो ॥ नर० ॥ ३ ॥ जगन्नाथसुत कृष्ण तुह्माला ॥ करितों नमन वांचवा हो ॥ नर० ॥ ४ ॥

## पद ॥ १२४ ॥

(राग-कालंगडा. ताल-त्रिवट)

गडे कशीग तुला भुल पडली ॥ असि अहंवृत्ति जडलीग ॥ ग० ध्रु० मूळ सुखाचें विसरुनि नाचे ॥ खूळ संगती घडलीग ॥ ग० ॥ १ ॥ सांड विषयसुख हो अंतरमुख ॥ आत्मस्थिती उडलीग ॥ ग० ॥ २ ॥

## पद ॥ १२५ ॥

( राग-परज ताल-धुमाळी. )

प्रपंच परमार्थी२॥अंतर इतुकेंचि पार्थी॥ध्रु०॥माती घटपट तंतू॥ भूषण कनक तसे जिवजंतू ॥ १ ॥ स्थाणुपुरुष अहिदोर॥ शिंपी वरती रजत विकार ॥ २ ॥ निजानंदी नाना रंग ॥ उदकीं उठतीं जेवि तरंग ॥ ३ ॥

पद ॥ १२६ ॥

( राग-बिभास, ताल-एका. )

उठुनि सुप्रभातिं स्मरूं शुद्धमनें देवा ॥ प्रेमभाव धरुनि भजूं करुं तयाची सेवा ॥ ध्रु० ॥ जो परेश चिदानंद ताप श्रमावारी। भक्त ध्याति जे तयांचीं संकटें निवारी ॥ उठुनि० ॥ १ ॥ प्रभु कृपानिधान विमल भक्तमनविहारी ॥ आठवितां धांव घाली दिनजनकैवारी ॥ उठुनि० ॥ २ ॥ अनुदिन गुण गाति ज्याचे भाविक नरनारी ॥ धरि भावें कांस त्याची भवनदी उतारी ॥ उठुनि० ॥ ३ ॥

पद ॥ १२७ ॥

( राग-जंगला, ताल-दिपचंडी )

हरिके दास कहावत ॥ मनमें कोटिक आस ॥ ध्रु० ॥ हरि नामको परगट बेचे ॥ करत भक्तीको नास ॥ हरिके० ॥ १ ॥ लोभ मोह माया नाहि छूटी ॥ चाहत प्रेम प्रकास ॥ हरि० ॥ ॥ २ ॥ मानपुरींप्रभु तबही रीझे ॥ जब मन होय निरास॥ हरिके० ॥ ३ ॥

पद ॥ १८१ ॥

(राग-कालंगडा. ताल-धुमाळी. चाल-अष्टमूर्ति. परमेष्ट.

ग्यान कटारी मोहे कसकर मारी ॥ सतगुरुकी बलहारी ॥ध्रु० ॥ ग्यानका बान हिरदे बिच लागा ॥ सबदका मारा होगया न्यारा ॥ १ ॥ नही मोहे ढाल नही तरवारी ॥ लगगई मोरे करे जेमे कारी ॥ २ ॥ ये मन मस्तक ह्यां नही माने ॥ वाको संदेहे

## पद ॥ १३३ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

बाळकृष्ण चरणीं मन लागो रे ॥ कीर्तनरंगीं रंगांत देह वागो रे ॥ ध्रु० ॥ स्वरूपीं मन हें लावितां सौख्य आह्मा ॥ कामक्रोधादिक जाती निजधामा ॥ बाळ० ॥ १ ॥ सारासार वदविता सद्गुरुराया ॥ मंगलधामा जीवन नरहरीपाया रे ॥ बाळ० ॥ २ ॥ सद्रुप चिन्मय नारायण रूप गाऊं रे॥ तन्मय होऊनि बळिवंत प्रेम गाऊं रे ॥ बाळ० ॥ ३ ॥

## पद ॥ १३४ ॥

(राग–जिल्हा काफी, ताल–दीपचंदी,)

ज्यौं जानो त्यौं तारो ॥ स्वामी मैं कुटिल कठिण खल कामी ॥ ध्रु० ॥ जप तप नेम शुच संजम ॥ इनबिध नहिं छुटकारो ॥ गारद घौर तूं अंध ते काढो॥नानक नदर न्यहाल ॥ १ ॥ ज्यौं

## पद ॥ १३५ ॥ ✓

( राग झिंजोटी. ताल त्रिवट. चाल भरनजातजमु. )

धांव विभो करुणाकर माधव॥देव दयानिधे देवकीनंदन ॥ ध्रु० ॥ हे करुणाकर दीनजनोद्धर ॥ हा भवदुस्तर यांतुनि उद्धर ॥ धां० ॥ १॥ काममदादिक गांजिति हे अति ॥ धांव रमापति सेवक हितकर ॥ धांव० ॥ २ ॥ जननमरण भयहरण करिं त्वरें ॥ चरणिं शरण दृढां॥ केशव किंकर ॥ धांव०॥६॥

## पद ॥ १३६ ॥

( राग–काफी· ताल–धुमाळी· )

तबसें भयो बैरागी ॥ प्रभुजी तबसें भयो बैरागी ॥ ध्रु० ॥ धरती मटी टोपी डारी॥ ध्यान भजन जद टीका॥महादेवका जनम नहि तद॥लिया झोलिका शीका ॥ प्रभू० ॥१॥ धरती नहि ताहांपाव धरु भाई ॥ गमनहिं ताहां जाऊ॥जन नहीं ताहां अवतार लेऊं ॥ नीर नाहीं ताहा नाहुं ॥ तब० ॥ २ ॥ अंदाधुंदि सबमन भाई

कोइ गुरु ना चलो॥ कहत कबीरा सुन भइ साधु॥ तब साहेब अकेला ॥ तब० ॥ ३ ॥

## पद ॥ १३७ ॥

( राग–जिल्हापिलु. ताल–दीपचंदी. )

संकट कोण निवारी ॥ हरिविण संकट निवारी ॥ ध्रु० दीनसखा तरि कोण असा कीं ॥ दुःख हरी भय वारी ॥ हरि० ॥ संकटसमयीं शरण रिघावें ॥ कोण असा कैवारी ॥ हरि ॥ २ ॥ कोण असा कीं षड्रिपु यांची ॥ हटविल थोर सवारी ॥ हरि ॥ ३ ॥ व्यथितजीवना कोण सदय तो ॥ देईल शांति भवारी ॥ हरि०॥४॥ दास विनवितो मजवरी देवा॥सोडी कृपेचें वारी हरि९

## पद ॥ १३८ ॥

(राग–कल्याण. ताल–धुमाळी.)

स्मरतां नित्य हरी ॥ मग ते माया काय करी ॥ ध्रु० श्रवणें मननें अद्वय भजनें॥पळतां काळ दुरी ॥ मग ते० ॥ १ ॥ करुणाकर वर दायक जो हरी ॥ ठेवी हात शिरीं ॥ मग० ३ ॥ शाम निरंतर उद्धवचरणीं ॥ अमृतपान करी ॥ मग ते० ॥ ३ ॥

## पद ॥ १३९ ॥

( राग–ललत. ताल–त्रिवट.)

चिन्मात्र मात्र पाहीं रे अपवित्र त्यागीं रें ॥ ध्रु० ॥ बैसुनि एकांतीं नाठवावे चित्तीं ॥ कलत्र पुत्र कांहीं रे ॥ अप० ॥ १ ॥ जडादि प्रकाशी एक अविनाशी ॥ अन्यत्र सूत्र नाहीं रे ॥ अप ॥ २ ॥ विष्णुगुरु कथी कृष्णजगन्नाथीं॥न अस्वतंत्र राहीं रे ॥ अप०॥३॥

## ॥ पद ॥ १४० ॥

(राग–हमीर. ताल–त्रिवट.)

असो धिग् धिग् माझिया जिण्याला ॥ भोगेच्छा अंतरी बाह्य त्याग करण्याला ॥ ध्रु० ॥ नसे प्रेम हृदयीं श्रीहरीभजनीं ॥

ममता मत्सर मनीं ॥ नागसरें जैसा फणीं ॥ डोले परी विष वदनीं ॥ बोलणें० ॥ ३ ॥ शब्दें ब्रह्म कोण झालें ॥ अन्न ह्मणतां कोण धालें ॥ शिकविलें तैसें बोले ॥ शुक पक्षीं पैं जसें ॥ बोलणें० ॥ ४ ॥ शिकला कळा विद्या छंद ॥ नाहीं अंतरी निर्द्वंद्व ॥ सहज-पूर्ण निजानंद ॥ सर्वांरंगीं न पाहे ॥ बोलणें फोल झाले ० ॥ ५ ॥

## पद ॥ १४७ ॥

( राग–भैरवी. ताल–त्रिवट. )

गुरुनें ऐसी चटक लाविलि मोठीं ॥ स्वयंभ हृदयिं मज देऊनि भेटी ॥ ऐ० ॥ ध्रु० ॥ विसरवि देहघट आपण होय प्रगट॥ बुजुनि द्वैताची वाट आनंदी लोटी ॥ ऐ० ॥ १ ॥ नावडे विषयीं धन केवळ वाटे वमन होउनि मन॥उन्मन स्वरूप घोटी॥ऐ०॥२॥

## पद ॥ १४८ ॥

( राग–भैरवी, ताल–त्रिवट. )

किती उपकार स्मरूं गणवेना॥दाविसि अजि उत्सव दीना ॥ध्रु०॥ कोमळ किरणें स्पष्ट सुपल्लव ॥ तोषविती नयना ॥ १ ॥ किती० सानंदें खग गायन करिती ॥ हारपिती भवभाना ॥ किती० ॥ २ ॥ आनंदमय हें मंदिर झालें ॥ हेचि गमे या हीना ॥ किती०॥ ३ ॥ निशिदिनिं रक्षुनीं रामा आह्मां ॥ आणियलें या स्थाना ॥ किती० ॥ ४ ॥ साहाय्य करी या उत्सव समयीं ॥ करूं तुझ्या गुण गाना ॥ किती० ॥ ५ ॥

## पद ॥ १४९ ॥

( राग–गौरी. ताल–धुमाळी. )

यारो झुलेमें झुलताहैं बाला ॥ खोलो नयन पियो ब्रह्म प्याला ॥ ॥ या० ॥ ध्रु० ॥ बीच बाजे बज्यावे बजंतर ॥ मस्त झुले झुकावे कलंदर ॥ रातो दिन जले धुनी अदंर ॥ स्वडालाल पीला शाम नीला ॥ यारो० ॥ १ ॥ सात दर्याका पाणि व्हां भैता ॥ चक्दा

तालें उपर झमके मोती ॥ उन्होंनि हात पकर लेके चलती ॥ लगी जोत देखे मन भूला ॥ यारो० ॥ २ ॥ मनका दिलका उलट देखे फीरके ॥ मेरे गुरुसाई सब भरके ॥ उनके चरणकमल चित्त बेला ॥ यारो झुलेमें झुलता है बाला० ॥ ३ ॥

पद ॥ १५० ॥

( राग—सोनी. ताल—दादरा. चाल—चाल निरंजना )

तेचि गत बाई आचार तिचे ठाई ॥ जाणिवेचा बोल ओगीं येऊं दिला नाही ॥ ध्रु० ॥ सत्कर्माचा सडा बरा घालुनिया द्वारीं ॥ साजघरची वोज बरी दावि लोकाचारी ॥ तेचि० ॥ १ ॥ निष्कामाचे चहूंकोनी सारविले घर ॥ सुरंग रंग रंग माळ घाली निरंतर ॥ तेचि० ॥ २ ॥ घवघवित प्रेमकुंकू लावुनिया भाळीं ॥ पूर्णानंदीं शिवरामीं विचरे वेल्हाळी ॥ तेचि० ॥ ३ ॥

पद ॥ १५१ ॥

[ राग—यमनकल्याण. ताल—झुमाळी. चाल—सगुण माया आली. ]

माझें नवलाचें पांखरूं ॥ कसें मी मारूं ॥ ध्रु० ॥ एका सकाळाचे प्रहरीं ॥ पाखरूं आलें माझे द्वारीं ॥ पांचरंग आंगावरी ॥ चल सई धरूं ॥ १ ॥ पांखरूं रतीहूनि लहान ॥ उडतां गर्जे त्रिभुवन ॥ त्यासी कैंसे जन्म मरण ॥ धरावा धीरू ॥ माझें ॥ २ ॥ अपार रंग त्या पाखराचे ॥ मजला देणें सद्गुरूचें ॥ गोपालनाथा फळ मुक्तीचें ॥ झाले तारूं ॥ माझें० ॥ ३ ॥

पद ॥ १५२ ॥

( राग—पिलु. ताल—दादरा. चाल—कृष्ण.चारत, वेगी. म्हावेंसावधान. )

सासुबाई करूं मी काई ॥ सिव्या देतां कां हो ॥ ध्रु० ॥ घागर घेऊनि पाणियासि जातां ॥ कान्हा येतो धाई धाई ॥ १ ॥ दहि दूध घेऊनि मथुरेसि जातां ॥ आडवितो मजला हा ठाईं ठाईं ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधर नागर ॥ अपराध माझा नाहीं नाहीं ॥ ३ ॥

पद ॥ १९३ ॥

( राग–सोहनी. ताल–एका. चाल–चालनिरजना सुखहो० )

आइक गडि नकल सांगुन घडली विकल न होयी स्थिर सकळ वृत्ति करी॥नकल०॥ध्रु०॥असतां निज सदनीं उगिच उठलि ध्वनि ॥ राहिलि दृढ आसनीं ढकलि चित्त जरी ॥ नक० ॥ १ ॥ पाहतां ग अवचिते ॥ पुढें दिसत पंचभुतें॥विचार केला निरुतें ॥ चुकला वस्तुर वरी ॥ नक० ॥ २ ॥

पद ॥ १९४ ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. तयावारि देव करी० )

चित् उदधी निजरंग ॥ भासे जगदाकार तरंग ॥ ध्रु० ॥ माया मृगजळ शाश्वत नसतां ॥ धावति जेंवि कुरंग ॥ भासे० ॥ १ ॥ दृग्भ्रम योगें रज्जु न जाणे ॥ वाटे तीव्र भुजंग ॥ भासे० ॥ २ ॥ पुत्र कलत्र गण गोत्र मित्र धन ॥ गज रथ धेनु तुरंग ॥ भासे० ॥ ३ ॥ सहज पूर्ण निजरंगीं रंगूनि ॥ होय सहज भव भंग ॥ भासे० ॥ ४ ॥

॥ पद ॥ १९५ ॥ ✓

( राग–पिलु. ताल–दादरा. चाल–जड देह कसा घेऊं० )

रत हरिपदकमलकंद॥ सेवि मनो भ्रमरा ॥ ध्रु० ॥ दुष्ट दैत्य दमुनि देत॥ निज भक्तां थारा ॥ द्रुत तर मनिं धरुनि॥भाव सांडि भव पसारा ॥ रत० ॥ १ ॥शुकसनकादीक मुनी ॥ जपति ज्या आधारा ॥ सुरवर मुनि गाति मुखें ॥ नित्य निराकारा ॥ रत० ॥२॥पावनपदरजें करुनि तारि गौतममुनिदारा॥निशिदिनिं आनंदतनय गाय वेद सारा ॥ रत० ॥ ३ ॥

पद ॥ १९६ ॥

[ राग–जिल्हा पिलु. ताल–दीपचंदी. ]

रसना मेरो कह्यो कर ॥ निस दिन हरि रस चाख ॥ ध्रु० ॥ जो

दिन जावे सो फेर न आवे ॥ पल पल हरि गुन भाख ॥ रसना० ॥ १ ॥ थोरे दोमनके जीवनकारन ॥ झूठि न भरि ये साख ॥ रसना० ॥ २ ॥ मानपुरीप्रभु गुरुके भजनबीन ॥ अंत खाक की खाक ॥ रसना० ॥ ३ ॥

पद ॥ १९७ ॥

( राग–जिल्हा झिंजोटी. ताल–एका. )

तूं दृढ भाव धरुनि धरीं घट्ट प्रभु पायां ॥ ध्रु० ॥ भवतापें पीड-लासि ॥ अंतरिं अति शीणलासि ॥ कां तरी निराश होसि ॥ पतिता तूं वायां ॥ तूं दृढ० ॥ १ ॥ पतितांचा सखा महा ॥ शमवी जो दुःखद हा ॥ तुज बाहे तो पहा ॥ हाक मारुनि यां ॥ तूं दृढ०॥ २॥ पाउनि अनुताप शरण ॥ मात्र जाइ त्यांसि जाण ॥ अवश्य हेंच ह्याविणें न ॥ योजिं तूं उपाया ॥ ३ ॥

पद ॥ १९८ ॥

( राग–पिलु. जिल्हा ताल–दादरा. )

कां रे नाठविशी ॥ कमलनयन वासुदेव ॥ ध्रु० ॥ जपति जया संत सनक ॥ सकळ जना जननि जनक ॥ कां रे० ॥ १ ॥ क-लुषहरण विमलचरित ॥ करुनि निजानंदभरित ॥ कां रे०॥ २ ॥ विचरे आनंदतनय ॥ हृदयिं धरुनि नंदतनय ॥ कां रे०॥ ३ ॥

पद ॥ १९९ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–तोंवरि तळमरे. )

बरवें समजा रे उमजा रे ॥ कां करतां गमजा रे ॥ ध्रु० ॥ मा-यामय जग सारें ॥ अवघें दों दिवसांचें वारें ॥ बरवें० ॥ १ ॥ दाराधनसुतपोरें ॥ अवघीं नागवणीसम चोरें ॥ बरवें० ॥ २ ॥ धरुनी पंथ पर भोरें ॥ तरला आनंदतनय विचारें ॥ ३ ॥

पद ॥ १६० ॥

( राग–काफी. ताल–धुमाळी. चाल–गाफिल मतरहना बेठा० )

नाहिं तनका भरोंसा जैसा ॥ पानि बीच घुलेगा बतासा ॥ ध्रु० ॥ य तो दोदिनकी जिंदगानी ॥ मतकरना मगरोरी ॥ माया दौलत कुच नाहिं तेरी ॥ ये तो धूपछावकी फेरी ॥ तुटे गी अगबतकी जब दोरी ॥ पलंग नहीं संबुरी ॥ अखरं होइगां जंगलकां बासा ॥ नहीं० ॥ १ ॥ बिछोंमें नरम तकीयां मखमाल ॥ माडी उपर महाल चढना ॥ तुरंग हातीं सुखपाल शेले दुपटे शाल ॥ खजिने जव्हारखाने हीरे हिलाल ॥ सबहिं जावेगा डाल ॥ साथी नहीआवेंगा ॥ रनिमासा॥नाहिं०॥२ ॥ करकुच खुदाके नाम परखें रात ॥ सोइ कमायी चली तुमारे साथ ॥ नहिं पडेगा जमके हात ॥ मार करेगा फस्त ॥ कहत कबीर तुम बचेगा कैसा॥३॥

पद ॥ १६१ ॥

(राग—धनाश्री. ताल—त्रिवट. चाल—अशाला आशा नाचविते.)

अशाश्वत संग्रह कोण करी ॥ ध्रु० ॥ चिरगुट चिंध्या जोडुनि कंथा ॥ गोदाडि हेंचि बरी ॥ अशा० ॥ १ ॥ नित्य नूतन देईल माधव ॥ भिक्षा तेचि बरी ॥ अशा० ॥ २ ॥ कोण करि घर सांपे माझ्या ॥ विवरीं वस्ति बरी ॥ अशा० ॥ ३ ॥ आत्मस्त्रीसुत परकी होती ॥ ठेविती भूमिवरी ॥ अशा० ॥ ४ ॥ अमृत म्हणे मज भिक्षा डोहळे ॥ उठति अशा लहरी ॥ अशा० ॥५ ॥

पद ॥ १६२ ॥

( राग—बागे सरि ताल—धिमातिताल )

प्रीति लागो तुझीये हृढनर पायीं ॥ ध्रु० ॥ प्रभो तुवां जननी ॥ पित्यापरी पाळितां कृतघ्नें टाकिलें ॥ प्रीति० ॥ १ ॥

पद ॥ १६३ ॥

[ राग—पिलु. ताल—दादरा. चाल—रत हरिपदकमल. ]

जड देह कसा घेऊनि गेला तुकाराम वाणी० ॥ ध्रु० ॥ भजन पूजन-भाव-बळें ॥ जिंकियेलें कळीकाळ ॥ गर्जताति तीनि बाळ॥

ऐकलाति कानीं ॥ जड० ॥ १ ॥ पंढरिचा देव गडी ॥ पाव-
वोळ पैलथडीं॥ विठ्ठलनाथ गरिब गडी॥त्यासि कोण मानीं ॥२॥

पद ॥ १६४ ॥

(राग—गौरी. ताल—धुमाळीः चाल—हर हर सांपडलों )

इतरें साधनकां साधनकां ॥ काय ह्मणावें लोकां ॥ ध्रु० ॥ पाय
गुरूचे ध्यातां ॥ सद्गुरुपदची आलें हाता ॥ इतरें० ॥ १ ॥
भरुनी तेल दिवटी॥लाविति मानू पाहायासाठीं ॥ इ० ॥ २ ॥
शिव होणें शिव भजणें॥उद्धवचिद्‌घनि हे स्थिती बाणे॥ इतरें ३॥

पद ॥ १६५ ॥

( राग—खरज. ताल—धुमाळी. )

झाला विठ्ठलसंग ॥ मनीं भरला रंग ॥ ध्रु० ॥ एकची तंतू
सोहं—स्मरणाचा ॥ वाजतो जैसा चंग ॥ म० ॥ १ ॥ चिन्मय
मूर्ती परात्पर आहे ॥ पाहुनि झालों दंग ॥ म०॥ २ ॥ रंगातीत
निज रंगीं रंगोनीं ॥ भवभय झाला भंग ॥ म० ॥ ३ ॥

पद ॥ १६६ ॥

( राग—केदार.ताल—चौताल. )

सत्यरूप ज्ञानरूप ॥ अनादि अनंतरूप ॥ अमृतआनंदरूप ॥
अद्वितीय प्रभू तूं ॥ सत्य० ॥ १ ॥ भवांबुधिपारहेतु ॥ एकमात्र
तूंचि सेतु ॥अभय मंगल केतु ॥ शांति रूप प्रभू तूं ॥॥ २ ॥

पद ॥ १६७ ॥

[ राग—कालंगडा, ताल—धुमाळी. चाल—आतां मी नाहीं मी नाहीं, ]

त्याचा हरि विकला, हरि विकला ॥ प्रेमें हरिगुण शिकला ॥
त्याचा० ॥ ध्रु० ॥ दो चौ दिवसां सेवी ॥ भाजी चुका चाक-
वतं सुकला ॥ त्या० ॥ १ ॥ कर्ज नसे कोणाचें ॥ देण्याघेण्या-
पासुनि मुकला ॥ त्याचा० ॥ २ ॥ संतुष्ट यदृच्छालाभें ॥
आनंद ज्याच्या हृदयीं पिकला ॥ त्या० ॥ ३ ॥ आदि वंदे
अमृतेश्वर ॥ जो नर धनकामिनीवर थुकला ॥ त्या० ॥ ४ ॥

## पद ॥ १६८ ॥

(राग—दरबारी कानडा, ताल—त्रिवट, चाल—अब तुम कब सुमरोगे. राम)

त्यांचा संग नको मजलागीं ॥ त्यांच्या तोंडा लागो आगी ॥ ध्रु ॥ वरि वरि वचनें लागती गोड ॥ अंतरि दुर्बुद्धीचा मोड ॥ त्या० ॥ १ भजतां श्रीरामाचे पाय ॥ मध्यें करिती अंतराय ॥ त्या० ॥ २ ॥ घेउन सौज्यन्याचें सोंग ॥ साधिति जारणमारणयोग ॥ त्याचा० ॥ ३॥ भजनीं दावुनियां विश्वास । व्यसनीं घालिति जे विश्वास ॥ त्या०॥ ४॥ अखंड जनानिं देतें ध्याय ॥ ॥आनंदतनय वदे कविराय ॥त्या० ॥ ५ ॥

## पद ॥ १६९ ॥

(राग—पिलु, ताल—त्रिवट.)

जपो मन सुकृत सत्त कबीर ॥ ध्रु० ॥ हंस होयके चलो घरको ॥ उत्तरो भवजलतीर ॥ ज० ॥ १ ॥ चंदर सुरज गगन नाहीं ॥ धरती नाहीं धीर ॥ जपो० ॥ २ ॥ धूप छाया उष्ण नाही ॥ बरसे नाहीं नीर ॥ जपो० ॥ ३ ॥ बाल तरुण वृद्ध नाहीं ॥ त्रिगुणतापशरीर ॥ ज० ॥ ४ ॥ करे आनंद निरमल मुक्ता ॥ गये सुकनी सीर ॥ ज० ॥ ५ ॥ मुगुट देखे धीट होय बैठे ॥ वोढन अमरचीर ॥ ज० ॥ ६ ॥ मनका जोत अनुप चस्मानी ॥ रखा आग सरीर ॥ ज० ॥ ७ ॥ घरमदास सत्यु पाये ॥ करम कागद चीर ॥ जपो मन सुकृत सत्त कबीर ॥ ८ ॥

## पद ॥ १७० ॥

(राग—जिल्हा झिंजोटी. ताल—एका.)

याहो गाउं ध्याऊ जाऊं शरण प्रभुवरा ॥ उत्सवदिन आजि आनंद मनिं धरा ॥ ध्रु० ॥ कथन भजन मनन करुनि अळवुं प्रियकरा ॥ पापताप हरुनि देइ चरणिं आसरा ॥ १ ॥ विघ्न करुनि मग्न सुख निमग्न पामरा ॥ ठेवि मम कृतघ्नपणें काहो

भाचरा ॥ २ ॥ संसारपथीं भागलां पहा मनीं जरा ॥ दिवस मास निघुनि जाती ॥ त्वरित ये जरा ॥ ३ ॥ कालहरण करी जिवन मरण ये घरा ॥ शरण हरिस जाउनियां चरण न विसरा ॥ ४ ॥

पद ॥ १७१ ॥

( राग-पिलु. ताल-दादरा. चाल-भज भज भव जलधिमाजि. )

धिग् ब्रह्मबोध करुनि काय ॥मूढमानवाला ॥ ध्रु० ॥ रात्रंदिवस जोडि दाम ॥ हृदयिं वसे तंव सकाम ॥ नाठवितां रामनाम ॥ देव दानवांला ॥ धिग्० ॥ १ ॥ बुडतयासि देउनि हात ॥ आपणासि करिल घात ॥ विठ्ठलनाथ देउनि लात ॥ सोडि पाल-वाला ॥ धिग्० ॥ २ ॥

पद ॥ १७२ ॥

( राग, ताल वरच्या पदाप्रमाणें. )

धिग् कासयासि करिसि जोग॥ लोक शिणवांया ॥ध्रु०॥देणें घेणें कारभार ॥ लेवालेवि उदिम फार ॥ कर्ज देउनि धरिसि द्वार ॥ शेण कालवाया ॥ धिग० ॥ १ ॥ मंत्रतंत्र कळा जाण ॥ आत्म-स्वरुपीं नाहीं ध्यान ॥ विठ्ठलनाथ लाउनि वात ॥ दीप मालवाया ॥ धिग० ॥ २ ॥

पद ॥ १७३ ॥

( राग-जोगी. ताल-धुमाळी. )

सत्कर्मजागरीं देह जागवा रे ॥ देवद्विजगुरुदास्य वागवा रे ॥ ध्रु० ॥ ह्याची पथें जातां भय नाहीं रे ॥ निश्चयें बोलती चारी साहीरे ॥ सत्क० ॥ १ ॥ रामकृष्ण शिव बोला वाचेरे ॥ निंदा अपशब्द त्याग याचेरे ॥ सत्क० ॥ २ ॥ मानसीं असार सार शोधारे ॥ निजनंदिं रंगा तत्वबोधा रे॥ सत्क० ॥ ३ ॥

पद ॥ १७४ ॥

( राग-कालंगडा. ताल-धुमाळी. चाल-हरिसें कुवनही. )

जो तुम करीये कोट पांखंडा॥धरमराय छोडे नही दंडा ॥ ध्रु० ॥ धरमराय सो दंड जो मागु ॥ अमुक कर कुडलग टांगु ॥जो तुम० ॥ १ ॥ तारु गंगा तारु काशी ॥ तारु कृष्णा द्वारकाबासी ॥ तारु तीनलोककी रानी ॥ तारु दुरगा आदि भवानी ॥ जोतुम० ॥ २ ॥ तारु तीन लोकके भूपा ॥ तारु निरंजन जोत सुरूपा ॥ चल बे बैकुंठ तुजेबी तारु ॥ थकेतो प्रेमके ताजन मारु ॥ जोतुम० ॥ ३ ॥ साहेब कबीर निर्मल असबारा ॥ बेद किताब दोनोंसे न्यारा॥ साखी बेद किताब हम देखे ॥ झुटी उनकी आसरे ॥ दोनो नरकजायेंगे ॥ बेदनके ईसवासारे ॥ जो तुम करिये कोट पांखंडा ॥ ४ ॥

पद ॥ १७५ ॥

[ राग—देस.ताल—त्रिवट. ]

ध्यानीं प्रगटावें भुवनसुंदरा ॥ ध्रु० ॥ श्रमलों मी बहु योगसाधनीं ॥नाटोपे मन कांहीं रामा ॥ ध्यानीं० ॥ १ ॥ आचिंत्य चिन्मय विग्रह तुजला ॥ चिंतावें कितितरी सुखकरा ॥ ध्या० ॥ २ ॥ निजदासाचें कोड पुरविता ॥ तुजविण कोण असे श्रीवरा ॥ ध्यानी० ॥ ३ ॥

पद ॥ १७६ ॥ ✓

( राग—कल्याण. ताल—धुमाळी. चाल—भज सीताराम. )

नारायण भज रे मानस नारायण भज रे ॥ धु ॥ त्रिभुवनपतिपद चिंतिसि जरि तरि॥काय उणें तुज रे॥ मानस०॥ १ ॥ विषय उपेक्षुनि अनुभव लक्षुनि॥आत्मपदीं रतरे॥मानस०॥२ ॥ कृष्ण दयार्णव कर्णपुटीं गुज ॥ हेंचि काथि तुजरे ॥ मा०॥३॥

पद ॥ १७७ ॥ ✓

(राग,ताल,चाल,वरच्यापदाप्रमाणें.)

आवडिनें सद्गुरु पायधरा ॥ ध्रु० ॥ ध्यान धरुनि प्रेम प्रीतिनें।

सार विचार करा ॥ आ० ॥ १ ॥ दासदासिपरि सेवा करितां ॥ न याल संसार ॥ आ० ॥ २ ॥ उद्धवसुत प्रभु सद्गुरु-परता-देव॥ नसे दुसरा ॥ आ० ॥ ३ ॥

पद ॥ १७८ ॥ ✓

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—तोवरि तळमळ रे.)

तें मज निजकळलें निजकळलें ॥ गुरुनीं हातीं धरिलें ॥ तें० ॥ ध्रु० ॥ कोण मी कवण्या काजा ॥ कोठुनि आलों सद्गुरुराजा ॥ तें० ॥ १ ॥जाणें कवणा ठाया ॥ कोठुनि उद्भव सरली माया ॥ तें० ॥ २ ॥ वेद मुकत्वें सांगे ॥ झाला उद्धवचिद्घन आंगें ॥ तें मज निजकळलें० ॥ ४ ॥

पद ॥ १७९ ॥ ✓

(राग,ताल,चाल,वरच्या पदाप्रमाणें.)

आतां मी नाहीं मी नाहीं ॥ नरहरिवांचुनि कांहीं ॥ ध्रु ० ॥ विकल्प अवघा सरला ॥ दोहीं डोळां नरहरि भरला ॥ आतां० ॥ १ ॥ सच्चिद्घनरूपसारा ॥ नरहरिवांचुनि काय पसारा ॥ आ०॥२॥शिवदिन शिवपण नेलें ॥ केशरि- गुरुनें नरहरि केलें॥ ॥ आतां० ॥ ३ ॥

पद ॥ १८० ॥

( राग—काफी. ताल—धुमाळी. )

तैं नर भटके ॥ दुर नहीं तेरा साईया ॥ ध्रु० ॥ पुरा संत मिले गुरु भागसो ॥ दीलकी दुरमत मिठाईया ॥ तै० ॥ १ ॥ मन चंचल कहु जान न पावे ॥ तज दे मान बढाईया ॥ तै० ॥ २ ॥ आसन थीर नाशीकपर नयना ॥ लखले सुरत लगाईया ॥ तै०॥ ॥ ३ ॥ गंगादास तेरा पिहु तुहिमें ॥ मुखडा सकल झगम काईया ॥ तै नर० ॥ ४ ॥

पद ॥ १८१ ॥ ✓

( राग—पिलु. ताल—दादरा. चाल—भज भज भवजलधि. )

ध्रु० ॥ कर्म कर्ता करविता भगवंत ॥ जो कां नांदे सर्वदा आह्मां आंत ॥ १ ॥ कर्मसूत्र चाळिता जनार्दन ॥ आह्मी बाहुलीं नाचतो तयाधीन ॥ २ ॥ कर्माकर्मी आह्मासि शक्ती कैंची ॥ ह्मणे केशव अवघीच सत्ता त्याची ॥ ३ ॥

पद ॥ १८८॥

( राग–तोडी. ताल–चौताल. )

रामा चित्त शुद्ध भावें ॥ तुझे पायीं लीन होवो अहर्निश शांतानंद अनुभवो ॥ ध्रु० ॥ हेंचि एक खरें सौख्य ॥ येणें कृतार्थ होई हा जन ॥ येर तें लटिक कळलें ॥ देवा० ॥ १॥

पद ॥ १८९ ॥

( राग–कल्याण ताल–दादरा. चाल–पवनतनय परम विनय राम )

मजकडे आधिं निकट करुनि येइं पांडुरंगा ॥ ध्रु० ॥ कलियुगीं बहुत दास ॥ होसी दासाघरीं दास॥माझ्या आयुष्याचा नाश॥ जात आहे भंगा ॥ मज० ॥ १ ॥ आसनीं शयनीं मनीं ध्यात ॥ तूंचि बंधु माय तात॥विठ्ठलनाथ रसिकगात॥नाम प्रेम संगा ॥२॥

पद ॥ १९० ॥

(राग–कालंगडा. ताल–धुमाळी.चाल–तोवरि तळमळ रे. )

सज्जन यासाठीं यासाठीं ॥ अवतरले या सृष्टी ॥ ध्रु० ॥ न बोलणें बोलावें ॥ न दिसे तें दृष्टीं दावावें ॥ सज्ज० ॥ १ ॥ सद्रूप जग हें माया ॥ ऐसें साधकजना समजाया ॥ स० ॥ २ ॥ भेद लयाप्रति नेला ॥ उद्धवचिद्घन अद्वय केला ॥ स० ॥ ३ ॥

पद ॥ १९१ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी चाल तारि तारि रामराया )

जैसें ज्यानें केलें ॥ तैसें त्याला फळा जालें ॥ ऐसें अनुभवा आलें ॥ यांत आमुचें काय गेलें ॥ ध्रु० ॥ जार चोर चहाडखोर ॥ निंदा द्वेषी रांडा पोर ॥ त्यासी यमदुतांनीं बांधुनि॥ आघेर नरकीं नेलें ॥ यांत० ॥ १ ॥ काळ व्याळ हा विकाळ ॥ कंकू पाहे

सर्वंहि काळ ॥ त्याचें भय सांडुनियां॥मूर्खें स्वहित टोलाविलें ॥ यांत० ॥ २॥ भक्त विरक्त योगी संत ॥सिद्ध ज्ञानी जीवन्मुक्त ॥ त्याची सेवा करितां दैवें ॥वैकुंठासी नेलें ॥ यांत० ॥ ३ ॥ अर्थ स्वार्थ साधन अर्थ ॥ केसरि शिवदिन गुरु परमार्थ ॥ गुरुभक्ताचे गुरुभक्तीनें॥जन्ममरण चुकविलें यांत०॥४॥

पद ॥ १९२ ॥

( राग— कानडा. ताल—धुमाळी .चाल—तैसे जगनाना जगनाना.)

उगाचि कां उडसी कां उडसी ॥ आग्रहडोहीं बुडसी ॥ ध्रु० ॥ रक्त मांस कीं हाडें ॥ या सोवळें न दिसे गाढें ॥ १ ॥ उगा०॥ शिरा नाडि चर्मांचा ॥ पुतळा द्वैतसंग कर्मांचा ॥ उगा० ॥ २ ॥ क्रोध काम गुणवृत्ती ॥ विटाळ नामरूप प्रवृत्ती ॥ उगा० ॥ ३॥ संशय अंतरंगीं वागे ॥ मीपण घातक पातक जागे ॥ उगा० ॥४॥शिवदिन केसरिपायां ॥ वांचुनि दंभ सोवळें वायां ॥ ५ ॥

पद ॥ १९३ ॥

( राग—पिलु. ताल—त्रिवट. चाल—भजोरे राम गोविंद हरी )

आंधेरे हरबिन कोन तेरारे ॥ किसे कहत तूं मेरा मेरा रे ॥ ध्रु०॥ तज कुल करम अभिमाना ॥ झूटे भ्रम क्यारे भूलाना ॥ १ ॥ झूटे तनकी क्यारे बराई ॥ सोये निमस मोहे जर जाई ॥ २ ॥ जबलग मनही विकारा ॥ तबलग नही छूटे संसारा ॥ ३ ॥ जब मन निरमलकर जाना ॥ तब निरमलमाही समाना ॥ आ० ॥ ४ ॥ जब पापधुनभ्रम जारी ॥ तब भयो है प्रकास मुरारी ॥आ० ॥ ६ ॥ झूटे ब्रह्मब्रह्म पडे जीन कोई ॥ राजाराम कहे सो होई ॥ आ० ॥ ७ ॥

पद ॥ १९४ ॥

( राग—बिभास. ताल—एका. )

धन्य धन्य धन्य प्रभो करुणाकर रामा॥तरति हीन दीन रंक ध-

रुनि तुझा प्रेमा ॥ध्रु०॥देखुनि अनुतप्त हृदय ॥घांव घेशि दयाम-
य ॥ दर्शनेचि देशि अभय ॥ निजपदसुख ठेवा ॥ धन्य०॥१॥
भक्तिप्रिय तूं रमेश ॥ हरिसी सकळ भक्तक्लेश ॥ निवटुनियां
दुरितलेश ॥ देशि प्रेममेवा ॥ धन्य० ॥ २ ॥ तरि होउनि
शुद्धचित्त॥आह्मी तुझें गाऊं चरित ॥ प्रेमभक्तिचाचि नित्य ॥ रा-
खुं मनी हेवा ॥ धन्य० ॥ ३ ॥

## पद ॥ १९५ ॥

( राग—कालंगडा. [redacted]ल—धुमाळी. ताल—कवण तुझी कवणाचे, )

अशाच खालीं गेला प्राण्या जन्म तुझा व्यर्थ॥कवण मी हा कोठिल
तुजला न कळे परमार्थ ॥ ध्रु०॥ अरूपआत्मा ब्रह्मस्वरुपीं नलगे
हे साक्ष ॥ अनेक शास्त्राभ्यासें तुजला प्रियकर वाच्यांश ॥ जितु-
की क्रिया तितुका वृत्तीचा वाढतसे अंश ॥ परतुनि दृष्टि न पाहे
नाथ सकेति चिद्रंश ॥ अशाच० ॥ १ ॥ रिद्धीसिद्धी गरुड
पाहतां लाभ काय तुजला ॥ प्रमाण मानुनि देव केवळ भुलसी
धातुला ॥ अंतरि ज्ञान प्रवेश न होय नाशचि हेतुला ॥ अमुक ऐ-
सा नकळे तुजला चालक आपुला ॥ अ० ॥ २ ॥ गगनवनाचे
ठायीं न होय मन हें विश्राम ॥ संकट वाटे मोठें सोडितां इंद्रिय-
ग्राम ॥ तीर्थे व्रतें दान धर्म हीं तितुकीं सकाम ॥ निरालंब हें
निर्गुण येणें न मिळे निजधाम ॥ अ० ॥ ३ ॥ ह्मणें सोहिरा
कणासि टांकुनि उपणिसि तूं कोंडा॥आत्मज्ञानी अनावडी जशि
अवरूची तोंडा ॥ मायानदिचा हा तुजवरी आलासे लोंढा ॥
वाहत वाहत जाशिल तेथें प्राप्त नव्हे धोंडा ॥ अशाच० ॥ ४ ॥

## पद ॥ १९६ ॥

( राग—यमनकल्याण. ताल—धुमाळी. चाल—सगुणमाया आदि की० )

तो काय प्राणी विसरला ॥ हरिला जन्मापासून ॥ ध्रु० ॥ करितां संसार धंदा ॥ आठविना चित्तीं गोविंदा ॥ नित्य करी द्वेषनिंदा ॥ सांपडला भवबंधा ॥ चिंतेनें चूर केला ग्रासून ॥ तो काय० ॥ १ ॥ अवकाश झाले वेळे ॥ भलताचि खेळ खेळे ॥ अन्यथा सुखांत लोळे ॥ गर्वमदें जो कां लोळे ॥ सागूं जातां बोले डोळे त्रासून ॥ तो काय० ॥ २ ॥ लटिकें खरें करी वासून ॥ व्यवहारीं जो घेतो घांसून ॥ नक्कल करी मारी हांसून ॥ त्रिविधतापू घे लासून ॥ दुःख शोकें पडतो दांत वासून ॥ तो काय० ॥ ३ ॥ सोहिरा ह्मणें व्यर्थचि जन्म ॥ निर्फळ ज्याचें क्रियाकर्म ॥ पांघुरला शरीरचर्म ॥ नेणें जो कां मुळींचें वर्म ॥ कोणा कामाचा हा काय असून ॥ तो काय० ॥ ४ ॥

## पद ॥ १९७ ॥

[राग—झिंजोटी. ताल—एका. ]

पावना वामना या मना ॥ दे तव भजनीं निरंतर वासना ॥ध्रु० ॥ श्रीवत्सांकित कौस्तुभधारिन् ॥ योगिजनांतररंजना ॥ दे० ॥ १ ॥ भो प्रल्हादपरा-हरिरूपा ॥ मत्तनिशाचरकंदना ॥ दे तव० ॥ २ ॥ नवतुलसीदलमालाभूषा ॥ बलवद्भवभयभंजना ॥ दे तव० ॥ ३ ॥

## पद ॥ १९८ ॥

( राग—गौरी. ताल—धुमाळी. चाल—भाई हुशार रहिनाबे.)

आतां तरी सोडी रे हा संग ॥ जनींवनीं होइं निसंग ॥ ध्रु० ॥ विषयसंयोगें धरिसी सोंगें ॥ दुःखेंचि होसी दंग ॥ अभ्रपटलीं जीव बाहुली ॥ वेगडीचा हा रंग ॥ आतां० ॥ १ ॥ परनारीसी करूनी परती ॥ आवरिं कीं हा अनंग ॥ ब्रह्मरसाचे भावनेविण ॥ रजतम जीव वंग ॥ आतां० ॥ २ ॥ योगाभ्यासें करुनि साधी ॥ बैठक पवन तुरंग ॥ धांवे जेथ तूं तेथ धरावा ॥ चपल हा मनतुरंग ॥ आतां० ॥ ३ ॥ ह्मणें सोयरा ध्यान धरीं रे ॥

सांवळि मूर्ति सुरंग ॥ वैकुंठपति व्यापक विष्णु ॥ अत्रघार्‍ कीं श्रीरंग ॥ आतां० ॥ ४ ॥

पद ॥ १९९ ॥

[राग-जोगी. ताल-त्रिवट.]

सुनोजी दयानिधि ॥ हरो चित्तकी आधि ॥ ध्रु० ॥ भक्तोंसे म. दीनदयामय भरना पूर्ण हमारा ॥ ध्यान भजनको निसदिन करवे गावें गुन तुह्मारा ॥ सुनो० ॥ १ ॥ त्रिभुवनका तुम नाथ बिराजिन सब सुखका हो दाता ॥ सबही तुम हो आप्त हमरा पिता माता भ्राता ॥ सुनो० ॥ २ ॥ गावत नाचत पादकमलपर ॥ रखवुं शिस दयाळा ॥ पालनकरना दीनदासका तुमहो पालनवाला ॥ सुनो० ॥ ३ ॥

पद ॥ २०० ॥

( राग-असावरी. ताल-त्रिवट. )

घडि घडि हरीसीं स्मर मनारे ॥ हे मना तुज किति शिकवुं ॥ ध्रु० ॥ अमुल्य नरतनु जाइल जेव्हां ॥ मग काय करिशि मान धनारे ॥ धडि० ॥ १ ॥ सांडुन सुखकर ॥ स्मरण हरीचें ॥ आर्जविशि किति धनारे ॥ घडि० ॥ २ ॥ पतितपावन भावें स्मरतां ॥ चुकतिल दंड यातनारे ॥ घडि० ॥ ३ ॥

पद ॥ २०१ ॥

[राग-धनाश्रीचा जिल्हा. ताल-झुमाळी. चाल-गब्बानों ध्या हरि०]

क्रम परमेश्वर काळ भजनीं क्रम परमेश्वर काळ ॥ ध्रु० ॥ विषयविलासी सुकाळ असती ॥ मूर्खपणें हा काळ ॥ हरिनामाचा सुकाळ न करिसि ॥ दंडिल यम हा सकाळ ॥ क्रम० ॥ १ ॥ इतर कल्पना गाळ भावें ॥ संतचरण चोगाळ ॥ होउनियां प्रेमाळ अंतरीं ॥ हेचि धरि जपमाळ ॥ क्रम० ॥ २ ॥ ज्ञानाग्नीची ज्वाळा वरि हा ॥ घालीं मनोगत राळ ॥ उडत अंबरी

मराळ तेवीं ॥ लय लावीं अंतराळ ॥ क्रम० ॥ ३ ॥ आत्माराम नृपाळ तुजवरि ॥ होईल पूर्ण कृपाळ ॥ पिटणें नलगे कपाळ ॥ सद्गुरुउपदेशातें पाळ ॥ क्रम० ॥ ४ ॥ सोहिरा ह्मणें देणें ढिसाळ ॥ तो महानंदसिंधु रसाळ ॥ उगेचि शिणवूं नका शिसाळ ॥ इतर देव न जिव्हाळ ॥ क्रम० ॥ ५ ॥

पद ॥ २०२ ॥

( राग–काफी. ताल–त्रिवट. )

कोण सुशिला प्रसवली तुजला ॥ साकार मन्मथगाभा ॥ ध्रु० ॥ शाम मनोहर कोमळ तूं शिशु पाहुनि चित्त निवालें रे ॥ अंतकाळ समय आहे हा निर्दय ॥ जागतांचि मरण आलें रे ॥ कोण० ॥ १ ॥ डोह भयंकर यमभगिनीचा ॥ सलिल हलाहल ज्याचें रे ॥ अंतरक्षिगति पक्षिही त्रासती॥नाहीं कसें भय याचें॥कोण०॥ २ ॥ वाटे माय असा गुण सुंदर ॥ तनय कधीं न विसंबे हो ॥ आश्चर्य हें तंव सदृश्य बहु सुत तेणें अनादर अंबे हो ॥ कोण० ॥ ॥ ३ ॥ देतील प्राण पिता जननी तव ॥ जाय मुला बाहेरी ॥ एक जनार्दन रक्षी तया प्रतीं ॥ त्र्यंबक भीती निवारी रे ॥४॥

पद ॥ २०३ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–ग।फिलमतरहना )

माई हुशार रहनाबे ॥ खुदाका नाम जपना बे ॥ध्रु०॥ दोंदिनकी है जानि दिवानी तुज॥अल्लानें दिया ॥ रामभजनबिन खाक होयगी॥ कालपाशमें आया ॥ माई० ॥ १ ॥ मातमातके कपडे पेहना ॥ सुरत बनाया खाशी ॥ रामनामबिन मुक्त न होवे ॥ मतकरना मगरोरी ॥ माई०॥ २ ॥ चोपचोपके पगरी बांधी ॥ खावेपानका-बीडा॥ जद जमजीकी गांठ पडेगी॥ जायगा नंगा उघडा॥ माई० ॥ ३ ॥ कहत कबीरा सुन गव्हारा ॥ मत करनाबे तोंडा ॥ रामभजन तो करते रहना ॥ क्या करे काल बिचारा॥माई० ॥४॥

## पद ॥ २०४ ॥

( राग—कानडा. ताल त्रिवट चाल—ते हे माय पंढरी. )

पाहेरे पाहें नृजन्मि या थोरवी पाहेरे ॥ स्वस्वरुपीं जागेरे ॥नृ०॥ पाहेरे०धृ०॥ धनदारादिक होय उपाधी ॥ करुनिं विवेक जनिं वागेरे॥नृज०॥१॥देह अनात्मा आपण आत्मा विचारिसि तरि सोय लागेरे॥नृ०॥२॥विष्णुपदीं रत कृष्णजगन्नाथ॥कार्थि निजहित अनुरागे रे ॥ नृ०॥ ३ ॥

## ॥ पद २०५ ॥

( राग—ऊउत. त ल—त्रिवट. )

अनुपम प्रेम तुझें रघुनाथा॥भवभीति विलया नेसी ॥ घृ० ॥ मानव पामर पाप मंद तरीही ॥ निज गभीर आनंद शुद्धि सत्य॥मक्तां चित्तीं दाविसी॥अ०॥१॥धन्य तूं सकल लोक पिता अपत्यां देसी पादरतां नेतां पद उच्च दीनां न अव्हेरिसी ॥अनु०॥ २ ॥

## पद ॥ २०६ ॥

( राग—बागेसरी. ताल—चौताल. )

दयामय दीनोद्धार दीनावरी कृपा करीं ॥ भवभय निवारीं देई भेटी दीननाथा ॥ ध्रु० ॥ धांव पाव माय बाप तारीं दयाळा ॥ मोहपाशीं पडलों मीं दीनकृपाळा ॥ दया० ॥ १ ॥

## पद ॥ २०७ ॥

( राग—कल्याण. ताल—एका. )

वर असा विभो दे कीं वत्सा गा मल्लीला ॥ध्रु०॥पदवी श्रीची गोपीकांला ॥ वैकुंठींची दिधली बल्लवपल्लीला ॥ १ ॥ वर असा० ॥ तुझ्या कीर्तिमात्रें पुढें ॥ न पुसे कोणी धन्वंतरिनें खल्लीला ॥ २॥ वर असा० ॥ भक्तमयुरसुलवना ॥ न सुरद्रुमयाचक नीचाच्या गल्लीला ॥ वर असा० ॥ ३ ॥

पद ॥ २०८ ॥

[ राग—बहिरवी. ताल—त्रिवट. ]

बैरन नींद काहासे आई ॥ सोई सोई सारी उमर गमाई ॥ ध्रु०॥ नींद कहे मै जमकी दासी॥ येक हात मुद्गल येक हात फासी ॥ बैरन०॥ १ नींद कहे मै सबसे भारी ॥ ब्रह्मा विष्णु संकर छरि-हारी ॥ बैरन०॥ २ ॥ कहे कबीर कोई गुरुपद जागे ॥ उन नगरी कूं डंकन लागे ॥ बैरन० ॥ ३ ॥

पद ॥ २०९ ॥

( राग—यमनकल्याण. ताल—धुमाळी. )

ब्रह्मविचार करा ॥ गडे हो ब्रह्मविचार करा ॥ ध्रु० ॥ नश्वर मानुनि हें भववैभव ॥ पाहुनि मोह तरा ॥ गडे हो० ॥ १ ॥ श्रीगुरुचें चरणामृत सेवुनि ॥ कांहीं विराग धरा ॥ गडे हो० ॥ आनंदतनय ह्मणें हि निज चिंतुनि॥ मीपण हें विसरा ॥ गडे० ॥ ३॥

पद ॥ २१० ॥

( राग—यमन. ताल—चौताल. )

करुणा असो या मलिन बहु पापी संतानीं ॥ ध्रु० ॥ अपराध बहुविधहि तरि॥पिता करि दया त्यजोन तनया दोषी ॥क० ॥१॥

पद ॥ २११ ॥

(राग—संक्रा. ताल—त्रिवट.)

अपार सामर्थ्य ॥ गूढचरित्र लीला रम्य राघवाची॥करी सदानंदा-परि मनुजा न गम्य ॥ ध्रु० ॥ कर्त्ता विश्वाचा जीव जीवांचा ॥ प्रभुप्रभूंचा सर्वसाक्षी सर्वव्यापी ॥ देव पुरुष पुराण तेजोराशी ॥ अपार० ॥ १ ॥ त्याचा प्रतापशांति आनंद प्रेम असीम ॥ भूमिव्योम अंतरिक्ष सदा दाविति ॥ सकलां मूर्तिमंत ॥ अपार०॥ ॥२॥अनंत जरि सखा दीनांचा नाथ॥ अनाथां दुःख हरी सुख देई दासा परम दयाळ पित्यापरि ॥ अ० ॥ ३ ॥

पद ॥ २१२ ॥

( राग—विभास. ताल—एका. )

आठवुं तुज देवा प्रेमें भक्तजना तूं सखा ॥ सांभाळुनियां निजदासांनें देशी नित्य सुखा ॥ ध्रु०॥ अनंत प्रीति अपार करुणा अगम्य तूझी कळा ॥ अगाध तूझें ज्ञान भासतें॥ सीमा न दिसे बळा ॥ अतर्क्य चातुर्यानें केलें भूषित त्वां भूतळा ॥ मिठी घालितो सद्भावानें तुझ्या मंगलगळा ॥ आठवुं० ॥ १ ॥ त्रिभुवन तूझी कीर्ति गातें काय गावि मानवें ॥ मतिहिन तुज जोडुं पाहुं आळवूनिया स्तवें ॥ अनेक रिपु संसारी गांजिती त्यांसीं वारावें ॥ सन्मति देउनि सन्मार्गातें आह्मां लावावें ॥ आठवुं २ ॥ कृपा सदोदित तुझी आह्मां दीनांवरती असो ॥ तुझ्या भक्तिचा प्रेमा देवा दासा हृदयीं वसो॥जेणें तुझी विस्मृति पडत ऐशी बुद्धि नसो ॥ मोक्षसाधनव्यवसायीं मन सदैव रमलें असो ॥ आठवुं॥ ३ ॥

पद ॥ २१३ ॥

( राग—यमन. चाल—चौताल. )

सदया नत्यागीं व्यथित नत पापी ह्या दीना ॥ ध्रु० ॥ न विलोकीं मम दुरितनगा॥परि पदरिं तूं दयाळ ह्मणुनि घे या ॥ सद० ॥१॥

पद ॥ २१४ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. )

पाहातां पाहतां धर्म बुडाला अधर्म झाला चहूंकडे ॥ जिकडे तिकडे कली मातला कठीण काळ हा आला पुढें ॥ ध्रु० ॥ दात्याचे घरिं दरिद्र आलें कृपण धनाढ्य झाले कीं ॥ पापी चिरायू पुण्यशीळ ते अल्पायुषि गेले कीं ॥ सत्कर्मांचा लोप झाला दुष्कर्मि जन भुलले कीं ॥ स्वधर्म सांडुनि अधर्म वाटे कैसे कलियुग आलें कीं ॥ पातकाचे डोंगर दिसती पुण्य लेश ना दृष्ठी पडे ॥ जिकडे० ॥ १ ॥ ब्राह्मण अनाचारी झाले शूद्राचार करितिल कीं ॥ आसन घालुनि प्राणायामें उघडे करीत बसतील कीं ॥

देवतार्चन गीतापठणहि सदा सोवळें राहतील कीं ॥ हस्त जोडुनि उभे विप्र हे ॥ करितिल त्यास विनंती कीं॥ अस्नात हो सुखांत पाहुनी तो विधाता मनीं रडे ॥ जिकडे० ॥ २ ॥ शास्त्रि पुराणिक वैदिक पंडित व्याज'दुहोत्रा घेतिल कीं ॥ गृहस्थ बे रोजगारि बसले खुशाल शेती करतिल कीं ॥ तरवार बांधुनि शिपाई झाले हातांत भाले घेतिल कीं ॥ जारकर्मी झाल्या गर्ती वेश्या बसल्या एकीकडे ॥ जिकडे० ॥ ३ ॥ पुत्र पित्याचा द्वेष करितो कांता पतीस मानीना ॥ माय लेकिचें भांडण होतें सासुवर जीव देति सुना ॥ गुरु शिष्याचा प्राण घेतो शिष्य गुरुकडे पाहीना ॥बंधुबंधुसीं वैर चाललें बहिण भावासिं बोलेना। सेवक स्वामिसिं मारुं पाहतों स्वामी सेवका वैर पडे ॥ जिकडे० ॥ ४ ॥ कीर्तनसमयीं निद्रा येती नाचामध्यें दंड पडे ॥ साधु संतासी दृष्टिस पाहातां कपाळासि तें पित्त चढे ॥ नामस्मरणीं वाचा बसली विषयीं गाणें चित्तिं जडे॥नरहरि-सद्गुरु-भजनीं महि-पति जडला हा मज समज पडे॥कड कड कड कड वाजवि टाळी उगाच पाहतों तोंडाकडे ॥ जिकडे तिकडे० ॥ ५ ॥

पद ॥ २१५ ॥

( राग—धनाश्री. ताल—त्रिवट. ]

श्रीहरी तुझे नामी विश्रांती केली आह्मीं ॥ आतां कांहीं नाहीं चिंता संसाराचे कामीं ॥ ध्रु० ॥ तारी अथवा मारी मजला ठेवीं मंगळ धामीं ॥ सर्व भार माझा तुजवरी मी सेवक तूं स्वामी ॥ श्रीहरी० ॥ १ ॥

॥ पद २१६ ॥

(राग—काळंगडा. ताल—धुमाळी. चाल—नामरामसे जादा. )

कामिनी संगें फार ॥ नाडले थोर थोर ॥ ध्रु० ॥शंकर भुलाला भिल्लीणीसी ॥ चतुरानन हो कन्येसी ॥ विश्वामित्र उर्वशिसी ॥

ध्यान झाला तत्काळ ॥ कामिनी० ॥ १ ॥ रावण प्राणासी मूकला इंद्र भगांकित झाला ॥ भस्मासुर भस्म झाला ॥ चंद्र झाला क्षयरोगी ॥ कामिनी० ॥ २ ॥ नारद महादेवऋषि ॥ अभिलाषिता हरिपत्नीसी ॥ मग पावला स्त्रीदेहासी ॥ साठी संवत्सर व्याला ॥ कामिनी० ॥ ३ ॥ पराशर तपोनिधी ॥ दृष्टी देखतां दुर्गंधी ॥ संग होतां गेली बुद्धी ॥ रत झाला तात्काळ ॥ कामिनी० ॥ ४ ॥ ह्मणे उद्धवचिद्घन ॥ थोर स्त्रियाचें बंधन ॥ बहुत ठकविले ऋषी-गण ॥ वाचे वर्णू मी किती ॥ कामिनी० ॥ ५ ॥

## पद ॥ २१७ ॥

( राग—झिंजोटी. ताल—एका. चाल—अर्जुना तूं जाणरे. )

भक्तांचा कृपाळू हरी ॥ वाट पाहे विटेवरी ॥ सच्चिद्घनरूप जाणुनि ध्याती ॥ उभा भिवरेचे तिरीं ॥ ध्रु० ॥ सुरवर मुनिवर स्तविती ज्याला ॥ यशोदेचा बाळ झाला ॥ गोपिकांच्या सदनीं जाऊनि ॥ नवनिताचि चोरी करि ॥ भक्तांचा० ॥ १ ॥ शुकसनकादिक ज्याचे देव ॥ प्रगट झाले स्वयमेव ॥ सारथी होउनि समरंगणि तो ॥ अर्जुनाचें दास्यत्व करी ॥ भक्तांचा० ॥ २ ॥ नरहरि बोले देव यानें ॥ आपुले महत्व सांडुनि दुरी ॥ नाथा घरि तो आवडीनें कावडीनें पाणी भरी ॥ भक्तांचा० ॥ ३ ॥

## पद ॥ २१८ ॥

( राग—काफीजिल्हा. ताल—दीपचंदी. ]

जगदीशचरणारविंद ॥ खरा हाचि स्वानंद ॥ ध्रु० ॥ त्याचा पदाविण सर्वहि तो शिण ॥ सेउनि व्हावें कां मंद ॥ खरा० ॥ १ ॥ विसरुनि त्याला विषय हाला ॥ पिऊनि व्हावे कां धुंद ॥ खरा० ॥ २ ॥ सुखसद्माच्या पदपद्माचा ॥ बहु सुरभी मकरंद ॥ खरा० ॥ ३ ॥ भक्तिभावें रामा ध्यावें ॥ जो मूळ सद्गुणकंद ॥ खरा० ॥ ४ ॥ मन दिन रजनी जागो तद्भजनीं ॥ ॥ लागो प्रभुचा छंद ॥ खरा० ॥ ५ ॥

पद ॥ २१९ ॥

(राग–जिल्हा. झिंझोटी–ताल. त्रिवट.

हरिभजनावीण काळ घालवूं नकोरे ॥ ध्रु० ॥ चिद्रुप असेचि समज॥ध्यानीं॥आणुनि पूर्ते उमज॥ आपुले मतिनेंउगाचि चिखल॥ ॥कालऊं नकोरे ॥ हरि० ॥ १ ॥जिंकिं जिंकूं देइन भवा॥ उठवुनिया विषय वावा ॥ अंतरिंचा ज्ञान दिवा॥मालवूं नकोरे ॥ हरि० ॥ २ ॥ सोहिरा ह्मणे पूर्णज्योति॥तिथें नाहीं दिवस राती ॥ तया वीण नेत्र पाती॥हालवूं नकोरे ॥ हरि० ॥ ६ ॥

पद ॥ २२० ॥

राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–नामरामसे जादा भ.ई. )

परखो शब्द निज सारा हंसा ॥ परखो शब्द निज साराजी ॥ ध्रु० ॥ बिन परखे कोई पारन पावे ॥भूला जग संसारा जी॥ सबही संत मिल जो हरी कहावे ॥ ना कोई पा रख पाई जी ॥ परखो० ॥ १ ॥ आयथे बेपारकरनकूं॥ घरकी जमा गमाइ जी ॥ बडे बडे साधु जन बानी ॥ छानी राम भाग दोये कीनी जी ॥ पर० ॥ २ ॥ आछर पारख करलेना ॥मन माया नही चीना जी ॥ सुकदेवमुनीवर आतमचीना ॥ आतमचिनी मायाजी ॥ पर० ॥ ३ ॥ पर आतम अजपाजप चेते ॥ नेह अछर भेद नही पाया जी ॥ अब तुम सुनो जो हरी मोठा ॥ खरा खोटा नही बुझेजी ॥ पर० ॥ ४ ॥ शिव गोरख सम ना कोई ॥ जोगी उनकु कौ नही सूजेजी ॥ जो कोई जगंम होत हरी ॥ सोया पदकु बुझे जी ॥ प० ॥ ५ ॥ कहे कबीर हम सब हा देखो ॥ सबही लोभको धावे जी ॥ सतगुरु मीले जीन पारख लखाई ॥ ढीक ढोरता हे सुजेजी ॥ परखो० ॥ ६ ॥

पद ॥ २२१ ॥

( राग–आनंदबहिरवी ताल–धुमाळी. चाल–तू भजरे भजरे भजरे. )

भक्तांसि भगवद्भजनें, भवसागर मृगजळवत रे ॥ चिद्विलास जग

नग हेमी, वस्तुत्वें भेदातितरे ॥ अस्तिभातिप्रियरुपआत्मा, तो नामरूपा विरहित रे ॥ होउनियां अनुभव ऐसा, हरी भजनींअत्यद्रुत रे ॥ ते धन्य जगदोधारि ॥ विद्वज्जन विजनविहारी ॥ ध्रु० ॥ ॥ ॥ १ ॥ जाळिलें संचितं समुळीं ज्ञानाग्नीमाजि निगुनि ॥ क्रियमाणपूर्वप्रवाहें ॥ विधिपूर्वक कर्मं घडती ॥ निर्हेतुक ॥ निरहंकारे, ब्रह्मार्पण सहजचि होती ॥ प्रारब्ध कलेवर भोगी, साक्षी हा ईश्वरमूर्ती ॥ ते ध० ॥ २ ॥ अहिकुंडलवत्तनू पाहता, संतोषा विस्मय न वसे ॥ तैसें या विद्वद्वर्यां, स्वरूप पाहुनि आन न भासे ॥ मृत्तिकेवरि कुलाळे ॥ घट कोठोनि आणिलासे ॥ रंगला या निजरंगीं ॥ निर्विषयीं सदनि विलासें ॥ ३ ॥ ते धन्य० ॥

पद ॥ २२२ ॥ ✓

( राग–कागलंडा ताल–धुमाळी. चाल–तोवरि तळमळे.)

होउनि गोसावी ॥ हरि कथाचि परिसावी ॥ ध्रु० ॥ गमन नसे ज्या गांवी ॥ तेथिल वाट कशास पुसावी ॥ होउनि॥ १ ॥ सुखें मिळो खंबाईत ॥ अथवा भगवींहीं नेसावीं ॥ होउनि ॥ २ ॥ भिक्षा मागून निस्पृहतेनें॥कुटुंबें पोसावीं ॥होउनि ॥३॥ स्त्रीपुत्र पुत्रादिक छळिति ॥ त्यांचीं वचनें सहन करावीं ॥ होउनि० ॥ ४ ॥ कुबुद्धि कोणी छळिती ॥ आपण अमृतवृष्टि वर्षावी ॥ होउनि० ॥ ५ ॥

पद ॥ २२३ ॥ ✓

(राग–ताल,चाल–वरच्या पदा प्रमाणें.)

तैसें जग नाना ॥ आत्मा एकचि माना ॥ तैसें० ॥ ध्रु० ॥ नाना प्रतिबिंबिचा ॥ परि भानु एकचिं साचा ॥ तैसें० ॥ १ ॥ उदंड शाखा पानें ॥ परि तो वृक्ष एक अभिधानें ॥ तैसें०॥ २ ॥ अपार जलधरधारा ॥ तैसा उद्धवचिद्घन सारा ॥ तैसें० ॥ ३ ॥

पद ॥ २२४ ॥

( राग–भूप. ताल–त्रिवट. )

शरणांगत पदरीं घ्या हो ॥ दोषी महा परि हा चरणीं नत याचि क्षमेसी ॥ ध्रु० ॥ अनन्य अगतिका ऊठ ह्मणा हो ॥ स्त्रीकरा पतकरिलें सुखकर दास्या अनुतप्तें ॥ शरणां० ॥ १ ॥

पद ॥ २२५ ॥

(राग–जोगी. ताल–धुमाळी. )

सावध सावध सावध मनुजा निजरूपिं सावधरे ॥ ध्रु० ॥ हिताहित मना न विचारिसि कां ॥ झांकुनि नेत्र सदां ॥ कामकदर्मीं लोळसि निशिदिनि ॥ मानुनि सौख्य सदा ॥ वीज लऊनि सरे सुख तेवीं ॥ वेगिं घडे आपदा ॥ इंद्रियग्राम विराम पडे मग ॥ बोलसि राम कदां ॥ सावध० ॥ १ ॥ सिंह जळाप्रति बिंब विलोकुनि ॥ निरखुनि देत बुडि ॥ हंस गगनिच्या ॥ तारा उदकीं ॥ घालित तेथ उडी ॥ मूढ कसा मृग नाभि उपेक्षुनि ॥ हिंडत बुद्धि कुडी ॥ तेवी सखा हरि सांडुनिया दुरि ॥ फिरसी देशधडि ॥ सा० ॥ २ ॥ इंद्रजाल मृगतोय तसें जग ॥ दंभरसें विलसे ॥ स्वप्निं दिसे गज मत्त तुरंगम ॥ संभ्रम तेंवि दिसे ॥ क्रूरभवार्णविं कर्णधार गुरु ॥ आन उपाय नसे ॥ पूर्ण रंग निज रामपदीं मग ॥ दुर्गम काय असे ॥ साव० ॥ ३ ॥

पद ॥ २२६ ॥

( राग– कालंगडा. ताल–धुमाळी. )

तो भला भलारे भला भला ॥ प्रपंच साधुनि परमार्थाचा ॥ लाभ ज्याणें केला ॥ तो भला० ॥ ध्रु० ॥ माता पिता गणगोत बाईको आपण नामरूपांत नायको ॥ श्रवणीं वेद पुराण आइको ॥ गर्व जयाचा गेला ॥ तो भला० ॥ १ ॥ संतति संपति पुष्कळ भारी ॥ चतुर्बुद्धिचा कारभारी ॥ परमार्थाची ध्वजा उभारी ॥

संशय ज्याचा मेला ॥ तो भ० ॥ २ ॥ अंतरीं ज्ञान विरक्ती धरितो ॥ बाह्य सोंग संपादनि करितो ॥ जिवें जिनें मोक्षासि वरितो ॥ भक्तिसि फार भुकेला ॥ तो भला० ॥ ३ ॥ भजन पूजन सत्पात्रीं जाणे ॥ शिवदिन यांविण ॥ कांहिंच नेणें ॥ नांद उद्धरार्थ मुखानें ॥ केशरि गुरुचा चेला ॥ तो भला भलारे ॥ ४ ॥

## पद २२७ ॥

( राग—अडानाट. ताल—त्रिवट. )

धांवरे पावरे नमो सर्व ही व्याधि ॥ रिपु गांजिती पीडिती तयां वारुनि राखिजे आपुल्या विदासी ॥ ध्रु० ॥ प्रबल शक्ति तुझी मात्र हटविल यां योजिती सोडवि पामर कवच बळकट दिजे प्रेम भक्ति भावरे ॥ धांवरे० ॥ १ ॥

## पद ॥ २२८ ॥ ✓

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—बरवेंसमजारे० )

जडाव कोंदनका कोंदनका बनाव सच्चिद्घनका ॥ ध्रु० ॥ लाल सफेसर काला ॥ उपर चमके उन्मनिवाला ॥ जडाव० ॥ १ ॥ झगमग झमत्कार झलकमो ॥ लेखलगी आलखमो ॥ ज० ॥ २ ॥ केशरिगुरु-कांचनमो ॥ शिवदिन जडागया कोंदनमो ॥ ज० ॥ ३ ॥

## पद ॥ २२९ ॥

( राग—झिंजोटी. ताल—एका. चाल—रामनामतुभजले० )

भला करे फीर मुशरद मोला ॥ आला पंढरपूरवाला ॥ ध्रु० ॥ कदमपारा नइ लगता घोडा ॥ जोडा नहि डाले चपला रे ॥ जो मुजरविण फौज जुकतकी ॥ आर्जव करे बावन सोळा रे ॥ भला० ॥ १ ॥ सारंगीबिन जंतर बाजे ॥ मुरदंग नई सुरताला रे ॥ दो अक्षर तो मुखसे प्यारा ॥ गाय बजायकर ताला रे ॥ २ ॥ नहिं लगता कछु देना कवडी ॥ भर भर सेवी प्याला रे ॥ मुठभर चु-

डियां अंदर डाले ॥ संत करे गोपालकाला रे ॥ भला० ॥ ३ ॥ अजलग संग्रह कछु नहि लगता ॥ भर भर रखे घर झोलारे ॥ अखंडमाधव साधु नहि भाई॥गोविंद सुमरो गोपाला ॥ भला॥४॥

पद ॥ २३० ॥

( राग–यमनकल्याण. ताल–एका.चाल–माझ्या रामाला आणाकोणि.)

यारे सखयानों हरिगुण गाऊं ॥ संतसंगानें पैलतिरा जाऊं जाऊं यारे० ॥ ध्रु० ॥ हरिभजनाविण काळ व्यर्थ गेला ॥ वृथा संसारीं काय भुलुनि ठेला ॥ पीयुष टाकुनियां कांजी कां रे प्याला प्याला॥ यारे०॥१॥पैल भवसिंधूपूर आला भारी ॥ काम वीजा चमकती अनिवारी ॥ त्याणि दंडिल्या बहुत नर नारी नारी ॥ यारे० ॥ २ ॥ गुरुचरणाची थडि आहे नौका ॥ वरी बैसुनिया जाउं परलोका ॥ निरंजनी रघुनाथ आहे सखा ॥ तया प्रसादें मारुंकाळ भोंका भोंका ॥ यारे० ॥ ३ ॥

पद ॥ २३१ ॥

( राग–सारंग. ताल–चौताल. )

मानस शुद्ध करोनी स्मर भवकाननभयहारक भक्तजनतारक दीनांचा कैवारी ॥ ध्रु० ॥ सर्वेश्वर करुणाकर परममंगलनिधान सर्वान्तरशांतिसदन प्रेमें स्ववश करतोचि एक दीनोद्धार कृपाला ॥ मानस० ॥ १ ॥

पद ॥ २३२ ॥

( राग–पिलुजोगिया. ताल–धुमाळी.चाल–सगुणचरित्रें परम.)

आह्मी अपराधी खरे विठोबा ॥ पतीतपावन तूं रे ॥ ध्रु० ॥ अपराधाच्या अपार रासी पहातां दृष्टि न पुरे ॥ साधु संत तव नाम सांगती स्मरतां दोष न उरे ॥ पती० ॥ १ ॥ तरला वाल्मिक नामें अजामिळ गणिका तरली कीं रे ॥ चरणरजें केलि दिव्य अहल्या सीताकांत रघुवीरें ॥ पती० ॥ २ ॥ समुद्र मथितां रत्नें निघालीं चतुर्दश प्रियकरें ॥ विष घेउनियां सांतळ

केलें नामें तुझ्या सुंदरें ॥ पती० ॥ ३ ॥ शिळा सेतु बांधिला सागरीं ॥ तारियलीं गिरिवरें ॥ दास नवल ह्मणें रावण मर्दुनि मुक्त केलीं सुरवरें ॥ पती० ॥ ४ ॥

## पद ॥ २३३ ॥

( राग–यमनकल्याण. ताल–धुमाळी. चाल–सगुणमाया० )

व्यर्थ भूललासी काय राया ॥ देह जाईल वायां ॥ ध्रु० ॥ह्मणसी संपदा माझी ॥ किती अंबाऱ्या हत्ती ॥ हत्ती घोड्यांचि होइल माती ॥ यम तुजला नेती॥व्यर्थ० ॥१ ॥ ह्मणसी पालखी माझा घोडा ॥ कां भुललासी मूढा ॥ अंतीं काळाचा पडेल खोडा ॥ ह्मणुनी राम जोडा ॥ व्यर्थ० ॥ ह्मणसी गाइ ह्या माझ्या ह्मैसी ॥ आणि बटकी दास दासी॥अंतीं काळाचे पडसिल फांसीं ॥ मग काय तूं करिसी ॥ व्यर्थ० ॥ ३ ॥ झां झां झांगड नौबत गाजे ॥ वाजंत्रें वाजे ॥ लोडा तीवाशा बसले राजे ॥ हे येथेंचि साजे ॥ व्यर्थ० ॥ ४ ॥ भजनीं क्रमाव राया पाहीं ॥ पर उपकारी होई ॥ मुक्ताबाइनें केली सोइ ॥ हरिभजनीं राहीं ॥ व्यर्थ० ॥ ५ ॥

## पद ॥ २३४ ॥

( राग– झिंजोटी. ताल–एका. चाल–रामनाम तुभजले प्यारे. )

खोज करो कोइ ये तन अंदर ॥ चली आज पकी माला रे ॥ दसेव मंदिर तारा लागे ॥ झुला नाथ गोपाला रे ॥ ध्रु० ॥ सहज समाधी मुद्रा लागी ॥ लीया प्रेमरसप्याला रे ॥ जात पात कुल भेद न जानें ॥ लीया प्रेम नीवालारे ॥ खोज० ॥ १ ॥ लाल पिले पर सफेद चोखा ॥ तापर शाम सलोनारे ॥ उसके अंदर शाम सलोचन ॥ नीकसत चंदा बालारे ॥ खो० ॥ २ ॥ नि पट नीरंजन चरपट मौला ॥ गळे मोतनकी मालारे ॥ आसन पाक दिल चाक न गीना ॥ ले खांदे मृगछालारे ॥ खो० ॥ ३

नाथ नबीके दास गोपाला॥सच्या पिलाभा प्यालारे॥गुंग भई सब तन मन आंखिया ॥ तीन लोक उजीयालारे ॥ खोज करो० ४॥

## पद ॥ २३५ ॥

राग–गौडसारंग. ताल–त्रिवट. )

याहो सकल भाविक जन ॥ करा भगवंताचें भजन ॥ ध्रु० ॥ जगदुद्धारक भवभयहारक ॥ करी सकल सृष्टीचें पालन ॥ याहो० ॥ १ ॥ विषयमोहाब्धीं बळेंचि बुडुनी ॥ कां भ्रमवितां आपुलें मन ॥ याहो० ॥ २ ॥ व्यर्थ अहंकार मनिं कां धरितां ॥ करा देहबुद्धीचें भंजन ॥ या हो० ॥ ३ ॥ सोडुनि मत्सर भाव मनींचा॥ करा बंधुप्रीतीचें वर्धन ॥ या हो० ॥ ४ ॥ होउनि लीन नित्य निरंतर॥करा प्रभूचें कौतुकवर्णन ॥ या हो०५

## पद ॥ २३६ ॥

(राग–धनाश्रीचा जिल्हा. ताल–एका. चाल–भक्तासाठीं तो जगजेठी.)

सख्या तुला मीं प्रार्थितसें अंतरीं ॥ वैराग्याची गुडी घेउन गुरुपादें घालीं उडी ॥ ध्रु० ॥ प्रपंच केवळ साच कसा हा मानुनियां भरवसा ॥ नाहीं पाहासी कोण असा मी कोठुनि आलों कसा ॥ विचारुनि पाहें तूं सारसा निशि दिनिं हृदयीं रती धरिसि तरि नागविसी स्वहिता, पतंग दीपावरि तत्वता, यापरि सावध होउनियां करिं सार्थक बा निज हिता, त्यजुनियां नेश्वर लोलुप्यता, सख्या तुला मी प्रार्थितसें अंतरीं ॥ १ ॥ पाहिं कसे हे बहु जिव नटले विषयाचें संगती ॥ गजेंद्र अली मीन मृग पिपीली ॥ स्त्री विषयादि किं देवादिक ऋषि नृप भुलले [illegible] संगतीं मुख्य मुख्य त्यां प्रती ॥ आदी ब्रह्मा विष्णु सदाशिव विश्वामित्र ऋषी पराशर थोर थोर तापसी॥ दशशीर दुर्योधन दशरथ पंडु सोमवंशीं ॥ बुडाला कीचक शतबंधुसीं ॥ सख्या तुला मी प्रार्थितसें ॥ २ ॥ यापरि माया दुस्तर

नेश्वर त्यागा या सत्वर, धरावा सद्गुरुचा पदर ॥ चिन्मय मूर्ती शोधुनि घ्यावी, पर ब्रह्म सुंदर ॥ जिथेची शाम तनु मनो हर ॥ अर्ध मातृका तुर्यावस्था जाणावें तत्पद, उमजतां होइल तुज निज बोध ॥ सतत विरक्ती होइल वा सावध, पावसि अंतीं तूं निजपद, सख्या तुला मीं प्रा० ॥ वैरा० ॥ ३ ॥

पद ॥ २३७ ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—कवण तुम्ही कवणाचे)

गगन मंडलमो करो बासा ॥ आब दुजा देखो आजब तमासा ॥ ध्रु० ॥ मढमेरा गगन ॥ सुरत मेरा चौका ॥ चैतन चवर दुरावे जी ॥ गगन० ॥ १ ॥ ईगला पिंगला सुखमन नारी ॥ अनुहात बीन न बजावे जी ॥ ग० ॥ २ ॥ त्रिकुट घाट आसनान जो करले ॥ रविससी संजम होई जी ॥ ग० ॥ ३ ॥ हंसा खेल करे राजनसे ॥ एक महेलमें दोई जी ॥ ग० ॥ ४ ॥ अष्टकमलदल पखुरी बनाई ॥ उलटा ध्यान लगाया जी ॥ ग० ॥ ५ ॥ पांच पंचीस एक न घर लावे ॥ तब धुनकी सुध पावे जी ॥ ग० ॥ ६ ॥ बीन बादल बीन बिजली चमके ॥ बिना सिपके मोती जी ॥ ग० ॥ ७ ॥ कहे कबीर सुनो भाई साधो ॥ निरखो निरमल जोती जी गगन मंडलमो० ॥ ८ ॥

पद ॥ २३८ ॥

(राग—बेहाग. ताल—त्रिवट.)

पतितपावन दीन दयाघन करुणाकर देवा ॥ अनन्यभावें सकलाहि प्रेमें करुं तुझी सेवा ॥ ध्रु० ॥ अधम पातकी अनाथ आह्मीं न कळे हित आपुलें ॥ क्षणिक सुखातें नित्य मानुनी मन विषयीं रमलें ॥ धनमानादिक संचित करणें सार्थक हें गमलें ॥ मोह विपिन अतिगहन यामध्यें चित्त सुचिर भ्रमलें ॥ यांत कोण आम्हांतें तारिल प्रभु आतां ॥ पातक नाशन दीनानाथा

तूंचि मोक्षदाता ॥ नको उपेक्षूं तुजविण आह्मां कोण दुजा त्राता ॥ कामादिक रिपु मेळा निवटुनि दाविं स्वहित ठेवा ॥ जगदुद्धारा तव भजनाचा असों सदा हेवा ॥ पतित पा० ॥१॥

पद ॥ २३९ ॥

( राग, ताल—सदर. ]

भवभयहारक प्रभुवर ध्या नत व्हा रत व्हा हो पदकमलीं ॥ अ-भयीं कां रमतां विषयीं ॥ ध्रु० ॥ असारीं संसारीं भ्रमतां क्लेश बहु जिवा झाले कीं ॥ सावध होउनी आदरें सत्वर स्वहित उमगा पाप ताप निरसून आठवा अनिश जोडा नित्य सुखा ॥ भव० ॥१॥

॥ पद २४० ॥

( राग—यमनकल्याण. ताल—धुमाळी. चाल—सगुण माया अलिकोला. ]

क्षणभंगुर नरतनु जाइल राजहंसा ॥ ओढ जळत्या घराचा वासा ॥ ध्रु ॥ जाति लवपळ घटिका काळ लेखा करितो ॥ दिन रजनी मापें भरितो ॥ चाल ॥ यासाठीं सावध व्हावें ॥ श्रीगुरुला शरण रिघावें ॥ पाहुनि पाउल टांकावें ॥ आपपर एकाचि जाणा-वें ॥ जाणुनि लीन असावे गुरुच्या दासा ॥ ओढ० ॥१॥

पद ॥ २४१ ॥

[ राग—झालंगडा, ताल—धुमाळी. चाल चरंजीव कल्याण रहो. )

आपही खेल खिलारी साहेब ॥ आपही धनकधारी है ॥ ध्रु० ॥ तंबु तो असमान बनाया ॥ जीमी दुलीच्या डारी है ॥ चांद सुरज दो जरत चिराकी ॥ तेरी खुदरत न्यारी ॥ आ० ॥ १॥ पांच तत्वका किया पसारा ॥ निरगून माया सारी है ॥ चैतन पुरुष आप होय बैठे ॥ येही आचंबा भारी है ॥ आ० ॥ २ ॥ सुरत नुरतकी चौपट मांडी ॥ आप फासा जुगधारी है ॥ फासा च्याहें जैसे जितावे ॥ सारी कवन बिचारी है ॥ आ० ॥ ३ ॥ चार जुगकी चौपट मांडी ॥ खेले नर अवर नारी है ॥

तीन देव ज्याकी साक भरत है ।। पाप पून अधिकारी है आ० ४ छेकपंजेलो नरद बचावे ॥ बाजी कठन करारी है ।। ज्याकी नरद पकी घर आवे ।। सोही सुगड खिलारी है ।। आ० ॥ ५ सतगुरुसरन जो नर नहीं आवे ॥ जमके हात बिकाना है ॥ कहे कबीर सुनो भाई साधो ॥ सब देहामे ठिकाना है ॥ आ० ॥६॥

पद ॥ २४२ ॥

[ राग–जिल्हाझिंजोटी. ताल–दीपचंदी. )

गेला मान सांवरीळ ॥ कोण हरिविणें॥ ध्रु०॥भक्तांचा पूर्ण काम ॥ करितां जगदभिराम ॥ पडों नेदी सर्वथा उणें ॥ गेला० ॥ १ ॥ शरण मनोभावें ॥ त्यासींच जावें ।। मग कासयासि भिणें। । गे० ॥ २ ॥ हरिपदीं रंग भरो ॥ कीर्तनीं हेंचि घडो ॥ सार्थक या तरीच जिणें ।। गेला० ॥ ३ ॥

पद ॥ २४३ ॥

(राग–यमनकल्याण. ताल–एका.)

पाहूं चला श्रीरंगरावजी ॥ दीनबंधू असे ज्याचे नांवजी ॥ध्रु० ॥ द्रौपदीची लज्जा मानुनि ॥ धर्मासीं ह्मणे भावोजी ॥ १ ॥ सुदाम्याचे पोहे भक्षुनि ॥ दिल्हा सोनियाचा गांवजी ॥ २ ॥ उद्धवआत्मज मंगलदायक ॥ जैसा भाव तैसा देव जी॥पाहूं॥ ३ ॥

पद ॥ २४४॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–तो नर गति चुकलारे.)

पावसि परमा गती ॥ स्मर हर त्रिभुवनपति ॥ ध्रु० ॥ सद्बुद्धि नारि हे पतिव्रतेला ॥ प्रियकर जो कां पती ॥ निःसंग अनंग बहु रंग दावी ॥ जग तर अपांपती ॥ पावसि० ॥ १ ॥ जया लागिं हें जप तप साधन ॥ साधक जन विलपती ॥ ध्यानामृत पीतां तद्रुप झाले ॥ संसारीं न लपति ॥ पावसि० ॥ २ ॥ अंतर गत हा न केळ आत्मा ॥ ।जव विस्मृत मूढमती ॥ चिदा-

नंद चित्स्वरुपीं सावध ॥ करिं बा दृढतर मती ॥ पावसि०॥३॥ ह्मणे सोहिरा लाव घेइं तूं ॥ भजन कळा धांवती ॥ ईश्वरिं लय हें लावीं तों वरि ॥ आयुष्याचि आवती ॥ पावसि० ॥ ४ ॥

पद ॥ २४५ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—कवण तुह्मी कवणा. )

हरिस्मरण विस्मरण तरि तुझें, काय जिणेंरे असून ॥ ध्रु० ॥ स्वार्थक साधिसी ॥ सार्थक न करिसी ॥ कुणासि पहा तरि पुसून ॥ पुढें हि नाहिं गति ॥ मळिण झालि मति ॥ साधुचि संगत नसून ॥ हरि स्म० ॥ १ ॥ शरीर फिरवी तुजला मिरवी देव असेरे रुसून ॥ जवळीं असुन हृदयीं वसुन ॥ भगवंत नयेरे दिसून ॥ हरि० ॥ २ ॥ आळस कामा उगा रिकामा थट्टाचि करितां बसून ॥ कुकर्माच्या ॥ कांहिं वर्माच्या ॥ गोष्टि सांगसी किसून ॥ हरि० ॥ ३ ॥ रतीविलासें लंपट होसी मानस गेलें डसून ॥ लवकर सरकीं ॥ पडसिल नरकीं फुकट भरसिल कसून हरि० ॥ ४ ॥ ह्मणे सोहिरा गैहनीनाथ हा ॥ माझे हृदयीं घुसून ॥ जनासि उद्धरावया कारणें ॥ वचन सांगतों ठसून ॥ हरि० ॥ ५ ॥

पद ॥ २४६ ॥

( राग—भैरवी. ताल—धिमात्रिताल. )

सुख सदनाच्या पंथें नेईं ॥ ध्रु० ॥ मार्ग जाणें विषयसुखें परी॥ भ्रमविति त्यां करोनि नेईं ॥ सु० ॥ १ ॥ मत्त कसे पहा षड्रिपु मज ॥ अडविति वारुनियां तयां नेईं ॥ सु० ॥ २ ॥ रक्षक द-शंक होउनीं पुढें ॥ दुबळिया सांवरोनीं प्रभो नेईं ॥ सुख० ॥३॥

पद ॥ २४७ ॥ ✓

राग—कालंगडा. ताल—त्रिवट. )

तो नर गति चुकला २ ॥ गुरुभजनातें मुकला ॥ ध्रु० ॥ यास्तव

पाहुनि वक्ता ॥ बोलत फार अनुभव नसतां ॥तो०॥ १ धर्म वासना कांहीं ॥ ज्याचे मनाशीं तिळभर नाहीं ॥ तो० ॥ २ ॥ संतसंग हरिभक्ती ॥ क्षणभर नये मनांत विरक्ती ॥ तो० ॥ ३ ॥ दास ह्मणें धरिं भाव ॥ भावावांचुनि कैसा देव ॥ तो० ॥ ४ ॥

पद ॥ २४८ ॥

[ राग–गौरी. ताल–धुमाळी. चाल–बकवा मत करना बेटा सिर. ]

पिरोका प्याला पिनाबे ॥ आपही पीर होना बे ॥ ध्रु० ॥ उस प्यालेमे येही करामत सुनो मुसलमीन भाई ॥ फिकीर छुटे फकीर होवे कहते मौला साई ॥ पि० ॥ १ ॥ बीना चिरास्व झग मग जोती वोही सफल भये साच्या ॥ मन मुदरा तै रहत न्यारा खुले आरस दरवाजा ॥ पि० ॥ २ ॥ बंदा होकर जीकर करे उसकी जीकर तुटे ॥ बद्री जावे भीस्त पावे जमकी छाती फाटे ॥ पि० ॥ ३ ॥ बालानंद कहे समालो सब घट साई अपना ॥ उस बीना घट खाली नही पिरोका देना ॥ पिरो० ॥

पद ॥ २४९ ॥

( राग–यमनकल्याण. ताल–धुमाळी. चाल–अहो तुह्मि ऐका सख्या सहोद. )

भाव धरारे आपुलासा देव करारे ॥ ध्रु० ॥ कोणी काय ह्मणो या साठीं ॥ बळकट प्रेम असावें गाठीं ॥ निंदास्तुतीवर लावूनि काठीं ॥ मी तूं हरारे ॥ आपु० ॥ १ ॥ सकाम साधन सर्वहि सोडा ॥ निष्कामें मुळभजनीं जोडा ॥ नाना कुतर्क वृत्तिसि दवडा ॥ आली जरारे ॥ आपु० ॥ २ ॥ मानुषदेहीं साधन भक्ती ॥ यासाठीं यांची उत्पत्ती ॥ ऐसा विवेक आणुनि चित्तीं ॥ प्रभुसि वरारे ॥ आपु० ॥ ३ ॥ सकळही अर्थी गुरुचे पायीं ॥ जगीं तयाविण न दिसे कांहीं ॥ एकचि निश्चय दुसरा नाहीं ॥ भाव धरारे ॥ आपुलासा देव करारे ॥ ४ ॥

पद ॥ २५० ॥

( राग–कल्याण. ताल धुमाळी. चाल–संतपदाची जोड. )

भावें करुं भजना ॥ हरिच्या भावें करूं भजना ॥ध्रु० ॥ नामस्मरणें दीनसख्या त्वां ॥ तारियलें दुर्जना ॥ कोण तुझ्यासम हृदयारामा ॥ योग्य असे वंदना ॥ भावें० ॥ १ ॥ भक्तांच्या वा संकटि धांवुनि ॥ करिसी तूं अवना ॥ ऐसा तूं रे दयाळु देवा॥ दासा सुखसदना ॥ भावें० ॥ २ ॥

पद ॥ २५१ ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—कवण तुझी कवणाचे.)

वासना हे विषयाची बुडविल संसारांबुधिमध्यें हो ॥ यास्तव तुम्हें स्मरण करावें सदैव परब्रह्म ॥ वासना॥ध्रु० ॥ पदार्थ सर्वही अनुकुल झाल्या ॥ गर्वा चढविल आम्हां ॥ कोठिल कोण हे पाहूं जातां ॥ मध्येंचि अडविल आह्मां ॥ वासना० ॥ १ ॥ मृगजलवत्संसार यांतिल सुखदुःख घडविल आह्मां ॥ घडिघडि तजविज करितां ॥ चिंतेखालीं सडविल आह्मां ॥ वासना० ॥ २ ॥ दृष्टी पडल्या दृश्यभास हा ॥ मोह कीं जिरविल आह्मा ॥ देहीं असुनीं सर्व प्रकाशक आत्मा दवडिल आह्मां वासना० ॥३॥ ह्मणे सोहिरा त्रिविधी तापीं ॥ अखंड कढविल आह्मां ॥ मोक्षपदाचा मार्ग निरोधुनिं आंतचि तुडविल आह्मां ॥ वासना० ॥ ४ ॥

पद ॥ २५२ ॥ ✓

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—तोवरि तळमळरे.)

डोळा उघडेना उघडेना ॥ श्रीहरिभजन घडेना ॥ ध्रु० ॥ अहं ममता सुटेना ॥ क्षणभर विषयीं चित्त विटेना ॥ डोळा०॥१ ॥ भक्तिरंगीं रंगेना ॥ निश्चल निर्मळ गुरु वंदीना ॥ डोळा० ॥ २ ॥

पद ॥ २५३ ॥

(राग—पिलू. ताल—त्रिवट.)

आत्मज्योति नजर नहिं आवे ॥ ध्रु० ॥ तलन बची बुझन जाति

नहीं जागत नहीं सोती ॥ १ ॥ झिळ मिल झिळ मिल निसदिन झमके ॥ जैसो निर्मळ मोती ॥ आत्म० ॥ २ ॥ कहत कबीरा सुन भई साधु ॥ घर घर बांचत पोथी ॥ आत्म ज्योती० ॥ ३ ॥

पद ॥ २९४ ॥

(राग—गौरी. ताल—भजनी.)

कसिरे विट जोडिली पुंडलिका ॥ मनीं भाव धरुनि निका ॥ माय बापाची सेवा करुनी ॥ विठ्ठल आणिला सखा ॥ ध्रु० ॥ खांदी कावडी वाहे पाणी ॥ एकनाथाचा फुका ॥ २ ॥ भीमातीरीं रहि वास केला ॥ तुका तुकीं उतरला ॥ कसि रे० ॥ ३ ॥

पद ॥ २९५ ॥

(राग—भैरवी. ताल—चौताल.)

प्रथम शरण जाऊं परेशा विघ्नहरणा दुःखभंजना ॥ ध्रु० ॥ जगन्नायक आनंदकंद ॥ सर्वशक्ति सर्वांतःस्थ कृपासागर जो भक्तां आधार ॥ प्रथम० ॥ १ ॥

पद ॥ २९६ ॥

(राग—भीमपलाशी. ताल—धुमाळी. चाल—उलट उलट माघारा प्राण्या फि०)

गहन गती कर्माची आइका दुस्तर हा खोडा ॥ उलट कर्म जाहल्या होतसे शाहाण्याचा वेडा ॥ ध्रु० ॥ कर्मापाशीं नळ पुण्यश्लोक तो द्यूत खेळा हरवला ॥ वनवासी त्या दीली एकटी स्त्री दमयंतीला ॥ सत्व धीर परि हरिश्चंद्र तो कर्माचा जाहला ॥ स्वप्नांमध्यें राज्यदान त्यानें दिधलें कौशिकाला ॥ १॥ स्त्री पुत्र त्रिवर्ग मिळोनी गेले काशीला ॥ शिखेसि तृण बांधुनि तयानें देहविक्रय केला ॥ अंत्यज्याचे घरीं सेवा करितां नाहीं दुःखा जोडा ॥ उलट० ॥ २ ॥ कुरुकुळभूषण धर्मराज तो पडे कर्माचे आर्ती ॥ कपटद्यूतांचे व्यसनी गोऊनीं हरविली संपत्ती ॥ शेवटपण द्रौपदिचा करितां दुर्योधन जिंकी ॥ सभे

माजी आणितां सतीला टकमक सर्व पाहाती ॥ मांडीवर बैस ह्मणे दुष्ट तो दुःखित होय सती ॥ रुष्ट शब्द बोलतां तियेला नग्न करा ह्मणती ॥ दुःशासन झोंबला निरीला लाविला पदर तोंडा ॥ उलट ॥३॥ कर्मयोगें हा राजा विक्रम करि चौरंग त्यासी ॥ कर्मगतीच्यामुळें हीच गती होइल सर्वांसी ॥ कवि रघुनाथ ह्मणे कर्म श्रेष्ठ हें न सोडी कोणासी ॥ चौपैशाच्या मिठासाठीं अनुभव आला मजसी ॥इंग्रजबहादुर कठिण कायदा समशिरधार जसी ॥ कचेरीसी हजर राहिलों नित्य धावे तासीं ॥ दिड महिना पर्यंत सोसिला कर्म फजित वेडा ॥ उलट० ॥ ४ ॥

पद ॥ २५७ ॥

[ बिभास-ता० चौताल. ]

तयास गाउं रचिली जेणें नभो वितानचित्र मही ॥ भानु पहा हा तमासि झाडी सौवर्ण करांनी ॥ ध्रु० ॥ सस्मित सानंद गिरी वन महार्णव जीव जंतु ॥ रम्य शोभा निर्मिलि ही जयानें ॥१॥

पद ॥ २५८ ॥

( राग-बिभास. ताल-सुरफाक्ता ( भूपाळी )

धांव मयुरेश्वरा ॥ पाव करुणांकरा ॥ ठेवि या किंकरा ॥ सतत पायीं ॥ ध्रु० ॥ दुरित भारें अती ॥ पीडिलों जगपती ॥ देइं मज सन्मती ॥ दीननाथा ॥ धांव० ॥ १ ॥ प्रेमपाशीं मला बद्ध करिं वत्सला ॥ ह्मणविं मज आपुला ॥ माय बापा ॥ धांव० ॥ २ ॥ तुजविणें दूसरा ॥ मज नसे आसरा ॥ उद्धरीं पामरा ॥ कृपासिंधो ॥ धांव० ॥ ३ ॥

पद ॥ २५९ ॥

( राग-ताल-सदर. )

राम तेजोमया ॥ पुण्यरूपा दया ॥ शांति सौख्या लया ॥ दास वाहूं ॥ ध्रु० ॥ त्वत्कृपें पावल्या ॥ पूर्ण तें आलया ॥

आर्ते तुज या ॥ रक्षि नाथा ॥ राम० ॥ १ ॥ पुण्यशीला [illegible] ॥ शुद्ध यानें करीं ॥ राहिं चिर अंतरीं ॥ चिद्रुपा गा॥राम० ॥ २ ॥ नेति हृन्मंदिरीं ॥ वास रामा करीं ॥ पुण्य मार्गावरी ॥ [illegible] दासा ॥ प्रभु० ॥ ३ ॥ भक्तिच्या साधना ॥ एथ लावूं मना ॥ आवरूं वासना ॥ इंद्रियांच्या ॥ प्रभु० ॥ ४ ॥ त्या गुनी दुर्मदा ॥ कामना त्वत्पदा ॥ पाववूं सर्वदा ॥ होउं ऐसें ॥ राम० ॥ ५ ॥ सर्वभावें तुला ॥ आळवूं प्रेमळा ॥ कोमला वत्सला ॥ माय बापा ॥ प्रभु० ॥ ६ ॥

पद ॥ २६० ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. )

संतनके संग लाग ॥ तोरी अछी बनेगी ॥ ध्रु० ॥ संतनके संग गगन॥लाग निर्मल होत शरीर ॥१॥ हंसनकीगत हंसबि जाने ॥ [illegible]र्म नाहीं जाने काग ॥ २ ॥ कहत कबीरा सुन भय साधू ॥ हरिचरणपर जागे ॥ संतनके० ॥ ३ ॥

पद ॥ २६१ ॥

( राग–कालंगडा. ताल–त्रिवट. आता मीं नाहीं मी नाही. )

हमतो बैरागी बैरागी ॥ सुरत रामसों लगी ॥ ध्रु० ॥ माव तुंबा धरूं ॥ भक्ति कथा नव रंगे पेरू ॥ १ ॥ प्रेम टोपी सिरकूं ॥ चिन्मय टिकला लगाऊ सिरकूं ॥ २ ॥ केशवदास बैरागी ॥ अशा मनशा माया त्यागी ॥ हमतो० ॥ ३ ॥

पद ॥ २६२ ॥

(राग–जिल्हा झिंजोटी. ताल–एका.)

नश्वर सौख्यें पापसरीं प्रभु लोटिति येई धावुंनिरे ॥ ध्रु० ॥ परम मनोहर स्वरूप आदीं ॥ दाउनि धरिती मारक जाळी नश्वर० ॥ १ ॥ त्यांतुनि सोडवी तुजविण कोण दीनदयाळा संकट टाळीं ॥ नश्वर० ॥ २ ॥ अंत नको बा पाहूं आतां ॥ धीर

नसे या पतिता पाळीं ॥ नश्वर सौख्यें पापसरी० ॥ ३ ॥

पद ॥ २६३ ॥

[ राग–यमनकल्याण. ताल–धुमाळी. चाल–भाव धरारे आपुला० ]

देही मठ बांधिला जेणें ॥ योगीयाणें ॥ ध्रु० ॥ आत्मागोसावी निर्गुण ॥ त्याचे शिष्यें पांच जाण ॥ पंचप्राण आणि उदान ॥ करी जतन ॥ १ ॥ दहा दरवाजे मठाला ॥ दोनी दीपदारें त्याला ॥ योगी बसले निरंजनी ॥ अग्नीच्या जळती ज्वाळा तो पाहून ॥ २ ॥ फण्यांमध्यें जळते पाणी ॥ धन्य देवाची करणी ॥ विरळा जाणें गुरुज्ञानी ॥ देव पृथ्वीचा धनी ॥ करी पालन ॥ ३ ॥ पाणी भरलें नाभीकमळीं ॥ अंतर बाहेर धुनी चालली ॥ गुरुपुत्रानें पाहिली ॥ द्यावी सांगून ॥ ४ ॥ तुकाराम पुसे म्हणून ॥ इतकें द्यावें मज लागून ॥ नाहीं तरी करावें श्रवण ॥ धरावें ध्यान ॥ ५ ॥

॥ पद २६४ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल– रामनामसे जादाभाई. )

हरिस्मरणसुख हें जरि ये ॥ तरि मोह मनीं न रिघे ॥ ध्रु० ॥ श्रवण मनन निदिध्यासें करुनी ॥ रजतमडाग निघे ॥ मिथ्या मानिलें सकळ दृश्य हें ॥ पुनरपि नयनीं न घे ॥ हरि० ॥ १ ॥ येणें पुण्यें करुनीं वर्तना ॥ किमपि न राहणें अघें ॥ भक्तिज्ञानवैराग्यदशा हे ॥ नित्य हृदयीं वळघे ॥ हरि० ॥ २ ॥ ध्यान धरुनि निरंजनवनीं ॥ दृढाभ्यास मनिं घे ॥ तरि ते पद पावों जेथ हे ॥ ब्रह्मा हरि हर तिघे ॥ हरि० ॥ ३ ॥ ह्मणे सोहिरा आत्मरसाची ॥ प्राण्या नित्य चव घे ॥ अंतर बाहेर तोंचि व्यापक ॥ ब्रह्मचि हें अवघें ॥ हरि० ॥ ४ ॥

पद ॥ २६५ ॥

[ राग–धनाश्री. ताल–त्रिवट. )

व्यर्थ या जन्मासी आलों ऐसें वाटे देवारे ॥ तुझिया प्रीती कार्गी कांहीं नाहीं घडली सेवारे ॥ ध्रु० ॥ पोटीं इंद्रिय पोषणाची इच्छा मोठी धन मानाची ॥ केली दांभिकभक्ति तेथें कैचा प्रसाद मेवारे ॥ व्यर्थ० ॥ १ ॥ दास तुझा ह्मणवायास लज्जा वाटे अंतरी जीवास ॥ धरिली तुझी दृढ कांस भक्तवत्सला देवारे व्यर्थ० ॥ २ ॥

पद ॥ २६६ ॥

(राग-मुलतानि, ताल-धुमाळी. चाल-गव्यानो ग्या हरीच्या नामा.)

आंजन आंजाये निज सोय ॥ ध्रु० ॥ जाय आंजन त्रिमीर नासे ॥ दृष्ट निरलम होय ॥ आं० ॥ १ ॥ सुगड धोबी सरस साबन ॥ मयल डारे धोय ॥ आं ॥ २ ॥ बयदसो पर पीर मेटे ॥ बहोर न पीरा होय ॥ आं० ॥ ३ ॥ धोनुसो जाके प्रेहे अप्रबल ॥ धोय लीजो विन लोय ॥ आं० ॥ ४ ॥ ताहे पीया पिया पास पहुंचे ॥ बहोर न पीवना होय ॥ आं० ॥ ५ ॥ गुरुसो जो मुक्तदाता ॥ करम डारे धोय ॥ आं० ॥ ६ ॥ कहे कबीर जब एक दरसें ॥ एकसा दील होय ॥ आंजन आंजाये निजसोय० ॥ ७ ॥

पद ॥ २६७ ॥

(राग-पिलु. ताल-धुमाळी. चाल-भजरेमया राम.)

हरि तुझी आवडी मज देइं देईं ॥ कृपा कटाक्षें पाहुनि मजकडे ॥ अहं ममता नेइं नेईं ॥ ध्रु० ॥ बुद्धि साक्षि तूं मुर्ति प्रगटुनि ॥ हृदयीं सुस्थिर राहिं राहिं राहिं ॥ तुझि० ॥ १ ॥ धांवति दृष्टि चहूंकडे त्यासी ॥ तुजविण न दिसों कांहिं कांहिं ॥ तुझि० ॥ २ ॥ क्लेश संसारीं भोगितों कीं ॥ सर्व थार तुझे पायिं पायिं ॥ तुझि० ॥ ३ ॥ तंव दासाचा हाचि मनोरथ ॥ पुरवुनि सेवा घेइं घेइं ॥ तुझि० ॥ ४ ॥

पद ॥ २६८ ॥

(राग-गौरी. ताल-धुमाळी. चाल-बकवा मतकरना बेटा.)

आल्ला तुही तुहीं रे ॥ मौला तुंही तुंही रे ॥ ध्रु० ॥ बाग म्याने तबला तबला बाजे घरमे नही कोई ॥ खाले हांडीमे चुवे कुड कुडे नाचन लागे डोई ॥१॥ब्रह्मा तेरी गांड मरांवे, अवरत मागे दान ॥ साठ सहस्र पौड बजावे, बचे दानो दान ॥२ नारद तेरी गांड मरीबे पढ गये चारो बेद ॥ सरस्वतीका खेल भया जब ॥ ब्रह्मा बेठीचोद ॥ ३ ॥ कहत कबीरा सुन मई साधू ॥ ये पद है निर्वानीं ॥ ये पदका कोई करेगा निंदा ॥ उसंकु नरकनिशानीं ॥ ४ ॥

पद ॥ २६९ ॥

( राग–परज. ताल–त्रिवट. )

साधन कांही तरी करीं रे मना तूं ॥ साधन० । ध्रु० ॥ चित्तीं स्फुरण चिदात्मा धरी खुण ॥ चित्त निरोधुनी स्मर आपणा तूं ॥ साधन० ॥ १ ॥ धावति वृत्ति विवेकें आवरीं ॥ स्मरण धरुनि मार्गे पुढें आपणा तूं० ॥ सा० ॥ २ ॥

पद ॥ २७० ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

साधन नामचि सार ॥ या युगीं ॥ध्रु०॥ नलगे भिक्षा नलगे दीक्षा विपीन विहार ॥ या युगीं०॥ १ ॥ उच्चारितां तत्क्षणींच होय॥ वांछित अर्थविचार ॥ या युगीं०॥ २ ॥ बोले हरिकवि सेवक ज्याचे ॥ सुखी करि मग संसार ॥ या युगीं० ॥ ३ ॥

पद ॥ २७१ ॥

(राग–कल्याण. ताल–धुमाळी.)

चलो विदुरघर जार्य्ये ॥ उद्धवजी चलो० ॥ ध्रु० ॥ दुर्योधनका मेवा त्यागा ॥ विदुरघर पार्य्ये ॥ उद्धव० ॥ १ ॥ शबरीके बोर सुदाम जिके चुरवे॥ रुचि रुचि भोग लगार्य्ये ॥उद्धव०॥२

पद ॥ २७२ ॥

(राग, ताल, वरल्याप्रमाणें.)

मायारे अनिवार ॥ हरि तुझो० ॥ ध्रु० ॥ षड्रिपु वैरी गांजिती हे अती ॥ कसा करील भव पार ॥ हरि० ॥ १ ॥ पाहूं जातां अंत न लागे ॥ शेषादि थकले फार ॥ हरि० ॥ २ ॥ बाळ कृष्णें कृपा केली ॥ दास विनवी वारंवार ॥ हरि तुझी मा० ३॥

पद ॥ २७३ ॥

(राग–झिंजोटी. ताल–धुमाळी. चाल–अर्जुना तूं जाणरे हो.)

याची कैशी खंती वाटेना रे ॥हृदयीं असतां हरी भेटेनारे ॥ ध्रु० दिवसें दिवस लोटले श्रवणीं श्रवण काढले॥भ्रांति पडदा अजुनी॥ फाटेनारे ॥ १ ॥ जन्म जन्मांतरीं अंतरला श्रीहरी ॥ विषय भोगीं मन हें विटेनारे ॥ २ ॥ अनुतापें तापुनि शुद्ध सत्व होऊनि॥ निरं जनाचा ठसा हा ही उमटेना रे ॥ याची० ॥ ३ ॥

पद ॥ २७४ ॥

( राग–गौरी. ताल–धुमाळी. चाल–भाई हुशार रहना. )

संतो खूब समजनाजी॥ सबकी लालच त्यजना जी ॥ध्रु० ॥ हड्डी गोस्त लोवो मल मुतर ॥ दुर्गंध बीच जमाया ॥ उप्पर तो चमरे से लपटा सुंदर करके दिखाया ॥ संतो० ॥ १ ॥ तेरी पगरी मोचमरोरे धनका मान बढाया ॥ आखरस सबही त्यजके जाकर आपही जंगल सोया ॥ संतो० ॥ २ ॥ येक तनुकी खाक भई तद दूजा जनमहि लीया ॥ लक्षचोऱ्यांसी पौंहि फिर फिर अपना हित नहि कीया ॥ संतो० ॥ ३ ॥ मर्मे सबही कहते फिनमे कोन ये भेद न पाया॥सम कहे गुरुदयाल मिल गयो उन्ने मरम बताया ॥ संतो खू० ॥ ४ ॥ ॥

पद ॥ २७५ ॥

(राग–रामकली ताल–दादरा.)

घस्त आली जागा लोकानों ॥ झालि संसाररातीं ॥ काळ चोर माजी मिळाले ॥ ध्वनि भरली गावांत ॥ ध्रु० ॥ चौघे घस्त-

घाले सहाजण॥ अठरा हाका मारिती॥कांहीं केल्या कोण जागे-
ना ॥ पडली अज्ञानें भ्रांती ॥ घस्त० ॥ १ ॥ विवेक डफडें
घेउनि सांगाति ॥ वाजे अनुहत तुतारी ॥ काळ चोरें शिडी
लाविली ॥ लोक ब्रह्मादिवरी ॥ घस्त० ॥ २ ॥ निजल्याचें
निजपणें गेलें ॥ जागऱ्याचें न जाय ॥ गुरुविण प्राणी जन्मला ॥
व्यर्थ शिणविली माय ॥ घस्त० ॥ ३ ॥ सद्गुरु सांगति गुरु
गीता ॥ पाहे अर्थ शोधोनि ॥ दास तुका म्हणे सांगतों ॥ सत्य
सत्य त्रिवाचा ॥ ४ ॥

पद ॥ २७६ ॥

( राग–धनाश्री. ताल–धुमाळी. चाल–अशाला आशा नाचवि. )

त्राता कोणि नसे मज यांत, त्राता० ॥ ध्रु० ॥ हर हर दुर्भग
झालों निपजुनि ॥ कृमि कीटक गणणांत ॥ १ ॥ गोत्रज यांच्या
कटु वचनानीं ॥ थार नसे सदनांत ॥ २ ॥ पूर्वजन्मिचें कर्म
अनावर ॥ विघ्नें किति भजनांत ३ ॥ कामादि यांची पीडा भयद
बहु ॥ वेधि शुद्ध हृदयांत ॥ ४ ॥ स्थिरचरव्यापक असुनि चरा-
चरीं ॥ शव हरि नाहीं ज्यांत ॥ ५ ॥

पद ॥ २७७ ॥

( राग–कल्याण. ताल–दादरा. चाल–पवनतनय परम विन० )

कांहीं प्रथम हृदयीं करि विचार ॥ संसार सार बारे ॥
ध्रु० ॥ नरदेहाची स्थिरतां ॥ कायसी ती बुद्बुदतता ॥ घरो
नियां स्वस्थराहे ॥ तोय तसारे ॥ १ ॥ विठ्ठल स्मरता॥ स्थिरता
पावसि ॥ समजुनि खुण भजनि भाव ॥ ठेवि उगारे ॥ २ ॥

पद ॥ २७८ ॥

( राग–यमनकल्याण. ताल–धुमाळी. चाल–सगुण माया आलि कोलाटिन० )

स्वस्थ असावें हरि ठेविल तेसें रहावें ॥ ध्रु० ॥ कोणी दिशि
रावसुभा सरकार ॥ कोणी दिशि चवरी अबदागीर ॥ कोणी

दिशीं पायाचे चाकर ॥ धूम धावावे ॥ ह० ॥ १ ॥ कोणी दिशी पांघराया शालजोडी ॥ कोणि दिशि मिळत नाहीं घोंगडी ॥ कोणिदिशि भरतसे हुडहुडी ॥ आंग शेकावे ॥ हरि ठे०॥ २ ॥ कोणिदिशी जेवी तुप साखर ॥ कोणिदिशीं मिठासवें भाकर ॥ कोणिदिशी नाहिं मिळत ज्वार॥भूक मारावी ॥ हरि ठे० ॥ ३ ॥ कोणि दिशी यम येईल धाऊन ॥ कोणि दिशी घेउन जाईल प्राण ॥ कोणि दिशी कपाळीं स्मशान ॥ स्वस्थ निजावें ॥ ४ ॥ कोणिदिशीं माळबुक्याची गर्दी ॥ कोणि दिशीं कीर्तन प्रेमानंदी ॥ कोणि दिशी झुकतां नदीमदी ॥ तुक्यानें जावें॥हरि०॥ ५ ॥

पद ॥ २७९ ॥ ✓

( राग—काफी. ताल—त्रिवट. चाल—इसतन धनकी कोन बडाई.)

ऐसागे माय कैसा हा योगी ॥ जेठायीं जन्मला तो ठाव भोगी ॥ ध्रु० ॥ माय कुमारी बाप ब्रह्मचारी ॥ एकवीस पुत्र जाहले उदरीं ॥१ ॥ आचार सांडोनी जाहालासे भ्रष्ट ॥ माउलीशीं जेणें लाविला पाट॥ ऐ०॥ २॥ आणिक याचें नवल सांगों काई॥ बहिण भोगिली एकचि ठाई ॥ ऐ० ॥ ३ ॥ पितयासी अंश घेउनि आला ॥ मातेशी जेणें उपभोग केला ॥ ऐ० ॥ ४ ॥ ज्ञानदेव ह्मणे अनुभव जाणें ॥ अनुभवावांचुन कांहींच नेणें ॥५ ॥

पद ॥ २८० ॥

(राग—बहिरवी.ताल—त्रिवट.)

क्या नयना चमकावे सुंदर क्या नैना चमकावे ॥ ध्रु०॥ रूपा पेहरे रूप दिखावे सुन्ना पेहरे रिझावे॥ गळ पेहरे मोतनकी माळा तीन लोक ललचावे ॥ १ ॥ टकमक टकमक नयन फिरावे बहुत नकूं रिझावे ॥हम नहि वैसे कौसिकमुनिसें कुत्ता करके फिरावे॥ २॥ कहत कबीरा सुन भइ साधू दिनदिन भक्ति बढावे ॥ हरीचरनकी लेऊं बळय्या तनकी आसन पावे ॥ क्या० ॥ ३ ॥

## पद ॥ २८१ ॥

( राग– कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–हरिसे कुछ नही बडा विधाने क्यों.)

भक्तिरसायन बडाजि ॥ होवे भवरोगनका झाडा ॥ ध्रु० ॥ श्रवण परिक्षिति कीर्तन नारद स्मरण करे प्रल्हादा ॥ पगसेवन लखमी-से हुवा हरिचरन चितजडा ॥ १ ॥ अर्चन कीया पृथूराजने वंदन अक्रूर कीया ॥ दास्य किया सो हनूमाननें निसादिन आगे खडा ॥ २ ॥ सख्यभक्ति अर्जुननें पाई बलि नीवेदन कीया ॥ तनमनधनही सब दे डारा हात जोडकर खडा ॥ ३ ॥ भक्ति करैागा जे भवरोगी मुक्ती उनकी दासी ॥ पोथी पुरान कुरान देखे दुजा मार्ग नहिं-बडा ॥ ४ ॥ भक्तीबिन कोई तरन न जावे सब शास्तरमो देखा ॥ दूजा उपाव नहीं जानके कबिर भक्ति नही छोडा ॥ भक्ति० ॥ ५ ॥

## पद ॥ २८२ ॥

( राग–पिलुजोगिया. ताल–एका. )

जन्मा आली वायां गेली भक्ती नाहीं केली ॥ माझें माझें ह्मणो-नियां गुंतुनियां मेली ॥ ध्रु० ॥ चाल बाई टांक रुका नका करूं बोल ॥ गुरुविण मार्ग नाहीं करिसी बलबल ॥ १ ॥ गळा माळ टीळा टोपी ह्मणती आह्मी साधू ॥ दया धर्म चित्तीं नाहीं ते जाणावे भोंदु ॥ २ ॥ कलियुगीं घरोघरीं संत झाले फार ॥ वि-तमरपोटासाठीं हिंडति दारोदार ॥ ३ ॥ वाचुन पढुन शाहाणे जाहाले ह्मणती आह्मी संत ॥ परनारी देखूनीयां चंचळ झालें चित्त ४ ॥ संत ह्मणती केली निंदा निंदा नोहे भाई ॥ तुका शरण अनन्यभावें संतांचिये पाईं ॥ ५ ॥

## पद ॥ २८३ ॥

[राग–पिलुजोगिया. ताल–एका.]

सगुणचरित्रें परमपवित्रें हरिचीं वर्णावीं ॥ सज्जनवृंदें मनो-भावें आधी वंदावीं ॥ ध्रु० ॥ संतसंगें अंतररंगें नाम बोलावें ॥

कीर्तनरंगीं देवासन्निध सुखेंचि डोलावें ॥ १ ॥ भक्तीज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ॥ प्रेमभरें वैराग्याच्या युक्ती विवराव्या ॥ २ ॥ जेणें करुनि मूर्ती ठसावी अंतरि श्रीहरिची ॥ ऐसी कीर्तन मर्यादाही संताचे घरची ॥ ३ ॥ अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवि करताळी ॥ एकाजनार्दनीं एकविध मुक्ती होये तात्काळीं ॥ सगु० ॥ ४ ॥

पद ॥ २८४ ॥

(राग—कानडा. ताल—त्रिवट.)

नाहीं नाहींरे श्यामाजी मोक्ष नाहीं ॥ ध्रु० ॥ नाहीं नाहीं जग दाही दिशा मन ठाईं नसुनि सदा हित गेल्या ॥ नाहीं ना० ॥ १ ॥ बुडुनि नित्य जळीं पढत मंत्र मुखीं ॥ उडत उडत गती पडतचि गेल्या ना० ॥ २ ॥ देश त्यजुनि शिरीं केश वाढवुनि वेष धरुनि तनु भैषज केल्या ॥ ३ ॥ घ्यास धरुनि हव्यास गृहाप्रति नासुनि धन संन्यास घेतल्या ना० ॥ ४ ॥ लक्ष बेल नव लक्ष कमलदल लक्ष चुकुनि नव लक्ष वाहिल्या ना० ॥ ५ ॥ नाक धरुनि दिठिं लाउनियां जप ॥ लाख करुनि तनु राख लाविल्या ना० ॥ ६ ॥ पवनबंध अनुभवुनि सरस पद ॥ नवनव जोडुनि कवनहि केल्या ना० ॥ ७ ॥ भंग पिउनि जगधिंग गळां उरीं ॥ लिंग बांधुनि जंगम फिरल्या ॥ ना० ॥ ८ ॥ संग त्यजुनि निःसंग होउनी ॥ निजरंग भजनाविण व्यर्थचि गेल्या ९

पद ॥ २८५ ॥

(राग—मुलतानि. ताल—एका. चाल—म्हाणि म्हाणी त्या निर्मळाते म्हाणी)

तुझें नाम गाईन वेळोवेळांरे ॥ तुझें रूप पाहिन निज डोळांरे ॥ ध्रु० ॥ तुझे चरणीं गुंतला माझा हेत ॥ तुझी मूर्ती कोंदली हृदयांत ॥ तुझें नाम० ॥ १ ॥ ध्यान तुझें लागलें अंतरयामीं ॥ विसर न पडो आह्मा तुझा स्वामी ॥ तुझें नाम० ॥ २ ॥ अनाथबंधू करुणासिंधू देवा ॥ ह्मणे केशव करिन चरणसेवा रे ॥ तु० ३

पद ॥ २८६ ॥

( राग—आनंदभैरवी. ताल—धुमाळी. चाल—उद्धवा शांतवन कर जा. )

पांचाळि वदे मधुसुदना ये॥ त्वरित मज ताराया ॥ ध्रु० ॥ हे दुष्ट सभे माझारी पाहती नग्न कराया ॥ त्या साठीं लवकरि धावे मत्संकट दूर कराया ॥ तुजवांचुनि कवणा ध्याऊं हा खलजलनिधी उतराया ॥ चाल ॥ भगिनींची कां तुज करुणा॥ येईना प्रपंचहरणा ॥ सत्वर मी त्यागिन प्राणा ॥ कारि रुदना पांडवजाया ॥ पांचा० १ ॥ त्वां झडकरि धाउनियां तो नागेंद्र मुक्त करिजेला ॥ ध्रुवबाळकासि नेवोनी नित्य अढळपदीं बैसविला ॥ दुग्धसिंधु देउनियां बा उपमन्युमुनी गौरविला ॥ चाल ॥ चतुरानन वेदहि चारी॥ आणिले मीनतनुधारी ॥ श्रमलें मी स्तवितां भारी ॥ येवो हो माझी माया ॥ पांचाळि वदे० ॥ २ ॥

पद ॥ २८७ ॥

[ राग—जोगी. ताल—धुमाळी. ]

बंगला खूब बनाया वे अंदर नारायन सोया ॥ ध्रु० ॥ पंचतत्त्वकी भीत बनाई तीनगूनका गारा ॥ रोम की छान चलाई चेतन करने हारा ॥ १ ॥ उस बंगलेकूं दस दरवाजे बीच पवनका खंबा ॥ आवत जावत किसे न देखों ओइ बडा आचंबा ॥ २ ॥ पांच पचीसा पात्रा नाचें मनवा ताल बजावे ॥ सुरत मुरतका मृदंग बजावे राग छतीसा गावे ॥ ३ ॥ अपरं पार भरा है यारो सद्गुरु भेद बताया ॥ कहत कबीरा सुन भइ साधू जिन्ने पाया उन्ने छुपाया ॥ बंगला खूब० ॥ ४ ॥

पद ॥ २८८ ॥

( राग—कालंगडा. ताल—धुमाळी. चाल—नक्षतें तैं कसें झालें. )

परेस सद्गुरु राया रे खेळया परेस सद्गुरु रायारे ॥ देव पुजूं गेले देउळ उडाले परेस सद्गुरु रायारे ॥ ध्रु० ॥ चिंचेच्यापानावर

देउळ रचले आधीं कळस मग पायारे ॥ १ ॥ दोहींतोंडीं हरणी पाण्यावर आली ॥ बिनमुखाविण पाणी प्यालीरे ॥ २॥ आंधळ्यानें देखिली बहिऱ्यानें ऐकिली पांगळ्यानें लगुपाठ केलारे ॥ ३ ॥ पावसा नाहीं सांगड मृगजळ डोहीं ॥ वांजेचा पुत्र पोहिलारे ॥ ४ ॥ एका जनार्दनि एकपणें विनवी ॥ अखंड राम नाम बोला रे परे० ॥ ५ ॥

॥ पद ॥ २८९ ॥

( राग–कालंगडा. ताल–एका. चाल–अखंड हरिहरि वदारे. )

रे कानोबा सांग पां त्याचें नाव ॥ त्याचा वसता कोण ठाव ॥ ध्रु० ॥ कृष्णा एक पाखरूं आहे ॥ तें मुखेंवीण चारा खाये त्याला डोळे नाहीं परि तें पाहे ॥ तें वाचे वीण बोलताहे ॥ १ ॥ तया पाख नाहीं परि तें उडे ॥ त्यासी हिंडतां त्रिभुवन थोडें ॥ त्याचें नखीं आकाश बुडे ॥ तें सर्वेचि पाहे चहूं कडे ॥ २ ॥ त्यासी माय बाप दोनी नाहीं॥त्याचा उपज कोणे ठाई ॥ तें एका एकपणें पाहीं ॥ असे जनार्दनाचे पायीं रे कानोबा सांगपां० ॥ ३ ॥

पद ॥ २९० ॥

( राग–आलियाबिलावल. ताल–सुरफाक्ता. चाल–असे कै मनोरथजग. )

विवेक कांडणी ॥ कांडितें साजणी ॥ निजबोधस्मरणी ॥ फिरतसे ॥ १ ॥ देह हें ऊखळ ॥ मन हें मूसळ ॥ कांडिलें ॥ तांदुळ विवेकाचे ॥ २ ॥ एका जनार्दनीं ॥ कांडण कांडितां ॥ ब्रह्मसायुज्यता प्राप्त जाली ॥ ३ ॥

पद ॥ २९१ ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–माई रामनासते जादा. )

गोविंदा रामा येरे ॥ गोपाळा रामा येरे ॥ ध्रु० ॥ दुर्जन मारुनि अर्जुनसारथि होउनि घरिशी दोरे ॥ तुरंग जेव्हां नाचति ते-

व्हां कोरेशी होरे होरे ॥ गो० ॥ १ ॥ भक्तवत्सल ह्मणविशि देवा शबरीचिं खाशी बोरें ॥ गवळ्याघरीं वत्सें रक्षिसि मिळवुनि लहान पोरें ॥ २ ॥ अंबर्षिकार्यास्तव धरिशी दशावतार फेरे ॥ जलचरवनचररूप दाउनि उरलें दर्शन दूरे ॥ ३ ॥ दीनदयाळा मां परिपालय कालियशासन शूरा ॥ मध्वनाथ ह्मणे तो चुकवीतो चौऱ्यांशींचा फेरारे ॥ गो० ॥ ४ ॥

पद ॥ २९२ ॥ ✓

( राग–यमनकल्याण. ताल–एका. चाल–सगुणमाया आलिकी० )

हरिकीर्तन ऐका ॥ काय ह्मणावें लोकां ॥ ध्रु० ॥ सगुण चरित्रें ऐकुनि साधू ॥ गेले परलोका ॥ १ ॥ व्यर्थ जना तुह्मि कळिकाळाचा ॥ मानितसा धोका ॥ २ ॥ मध्वनाथा भवसिंधु तराया ॥ सांपडली नौका ॥ हरि० ॥ ३ ॥

पद ॥ २९३ ॥

(राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–नव्हतें तें कसें झालें रे. )

व्याघ्राचे वाडां एक मिसकीन गाय ॥ ते ढवळ्या बैलाची माय रे ॥ दांतेविण तिणें वाघासि गिळिला ॥ तिचा पाडा तिस खायरे ॥ १ ॥ सूर्याचे गांवीं गडद पडलें ॥ आंधळ्यानें लाविल्या वातीरे ॥ काजळ डोळां दुहुन सांडितां ॥ नुरेचि दिवस रातीरे ॥ २ ॥ मायेचा गोहो गाभिणा झाला ॥ तो बाइलेस आपण व्यालारे ॥ गुरुकृपें केशवीं नवलावो पाहतां ॥ चांदण्यान डोहो गिळिलारे ॥ व्याघ्राचे वा० ॥ ६ ॥

पद ॥ २९४ ॥

( राग–आनंदभैरवी. ताल–धुमाळी. चाल–तूं भजरेभज. )

माधवजी भीम सबळ हा ॥ मज भर्ता साजे बरवा ॥ ध्रु० ॥ माधवजी भींम तनूही केवळ मेरूचा गाभा ॥ लावण्या मदन तुळे ना शरिराची उत्तम शोभा ॥ मज वाटे सौख्य ह्मणूनी गुंतलें

मी याच्या लोभा ॥ चाल ॥ मज गमतें मुख चुंबावें ॥ स्नेहानें आलिंगावें ॥ भीमासी नित्य रतावें ॥ आवडी तुझि आजि पुरवा ॥ माधव० ॥ १ ॥ माधवजी भीम गिराहो मेघासम उत्तम भासे ॥ भिडती दोघे निकरानें तनुसि घर्महि आलासे ॥ वज्रमुष्टि हाणिति तेणें ब्रह्मगोळ डळमळलासे ॥ चाल ॥ नग वृक्ष शिळाही मारी ॥ मारिति दोघे झुंझारी ॥ माधवजी हिडिंब हारी ॥ आणावा न धरुनि परवा ॥ माधव० ॥ २ ॥ माधवजी वृकोदरातें रक्षावें प्रेमें आधीं ॥ हें कार्य किजे भीमातें खलदमनीं श्रमाहि न बाधी ॥ ऐसें बोलोनि हिडिंबि माधवासि मनिं आराधि ॥ चाल ॥ मग भीमें हिडिंब वधिला ॥ हेतु हिडिंबीचा पुरला ॥ पांडुरंग हर्षे भरला ॥ नामी रत सांडुनी गर्वा ॥ माधवजी० ॥ ३ ॥

पद ॥ २९५ ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळी. चाल—माझें मूल आढळलें काय. )

दिसते चिंता फार ॥ आज मज भेटे कसा गोविंद ॥ भेटे क० ॥ ध्रु० ॥ मदनें दिधला मजला त्रास ॥ यास्तव धैर्य नसें चित्तास ॥ किंवा लावुनि राख आंगास ॥ धर्मपृथेसि त्यजावें काऽऽ॥ आज मज भे० ॥ १ ॥ तुजवांचुनि अर्जुन हा दीन ॥ जैसा उदका वांचुनि मीन ॥ सर्वदा असें तुझ्या आधीन ॥ उदासीन होसी कां ॥ आज म० २ ॥

पद ॥ २९६ ॥

( चाल—अंजनिगीत. ताल—धुमाळी. )

वाढी द्रौपदी सुंदरी ॥ कनकपात्रीं अन्नें सारीं द्विजमुनिवरिं देतां ढकरी ॥ तोष हो माये ॥ १ ॥ आन वदती अन्नपूर्णा ॥ रूपें वाढिते हे जना ॥ एक ह्मणती मनमोहना ॥ आवडी हेची ॥ २ ॥ ऐसी सुंदरी वाढितां ॥ ढळला पदर शिरा खालता ॥ बिरडें कांचुकीचें सुटतां ॥ साध्वी घाबरली ॥ ३ ॥ काय करूं वा यादवराया

उमकों अग पहातिल काया ॥ गेला विक्रम आजि तुझा वांया ॥ रास्वां या दीना ॥ ४ ॥ नेत्रीं अश्रु रोम अंगीं ॥ कांपे थरथरां सर्वांगीं ॥ कृष्णाबाई तारि वेगें॥मजला ठाव नसे ॥५॥ मधुसूदन पंचाक्षरी ॥ स्मरतां संचरला अंतरीं ॥ दोन भुजा भुजावरी ॥ निघती तत्काळ ॥ ६ ॥

## पद ॥ २९७ ॥ ✓

( राग—जंगी. ताल—धुमाळी. चाल—माझें मूल आढळलें काय. )

मजला सोडवा आतां ॥ कोणितरी धांवाहो ॥ ध्रु० ॥ भावोजी मी धरितें पाय ॥ सांगा चुकलें तरि मी काय॥विनवा हा दुर्योधन राय ॥ कांहिं उपाय करा हो ॥ मज० ॥ १ ॥ माझा जळला तो अहंकार ॥ चुकलें मी हो वारंवार ॥ आतां करा तुह्मी उपकार ॥ मज आधार नाहीं हो ॥ मज० ॥ २ ॥ कैसा येईना जगदीश ॥ घेतलें निद्रेचें तें मीष ॥ राखा राखा द्रौपदीस ॥ विनवी दास कृष्णातें ॥ मज० ॥ ३ ॥

## पद ॥ २९८ ॥ ✓

( राग—कल्याण. ताल—धुमाळी. )

राखें माझी लाज ॥ हरि आजि राखें माझी लाज ॥ ध्रु० ॥ दुर्योधन दुःशासन शकुनी ॥ यांचा मोडी माज ॥ हरि० १ ॥ अधोवदन मत्पंचपतीही ॥ विवुनि कुंती वांझ ॥ हरि० २ ॥ वस्त्रहरण होतांचि मरण कीं ॥ शरणागत यदुराज ॥ हरि० ३॥ काशिनाथसुत बालक याणें ॥ अभंग रचिला आज ॥ हरि० ४॥

## पद ॥ २९९ ॥

(राग—झिंझोटी. ताल—त्रिवट. किति थिर धर्म दिन जनी)

मज तारिं दयासागरा ॥ किति तरिं विनवूं रमावरा ॥ ध्रु० ॥ ओंवतो खळ लांडगा ॥ विपिनीं हरिणीसि जसा ॥ न करी क्षणे सुता॥ अहो हा सासरा॥ किति तरिं विनवूं ॥ १ ॥ मरुवा पा-

लवूं नको ॥ मन तें कारें पांगुळ ॥ मज तव पायांचा ॥ न हुजे आसग ॥ किति तरि विनवूं० ॥ २ ॥ द्रुपदबाळा न म्हणे ॥ न म्हणे पंडूची सून ॥ दासी जनी पाळावें ॥ गाई हे वासरा॥ किति तरि विनवूं कि० ॥ ३ ॥

पद ॥ ३०० ॥

( राग–धनाश्रीवाजिन्हा. ताल–धुमाळी. चाल–मध्यानों ध्या हरि० )

लाज रखो तुम मेरो ॥ प्रभुजी लाज रखो तुम मेरी ॥ ध्रु० ॥ अब बैरीने कबरी पकरी ॥ तबहो मान मरोरी ॥ प्रभुजी० १॥ मैं गरीब तुम करुनासागर ॥ दुष्ट करत बळजोरी ॥ प्रभुजी० ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ तुम पीता मै छोरी ॥ प्रभुजी० ३ ॥

पद ॥ ३०१ ॥

( राग–आनंदबहिरवी. ताल–धुमाळी. चाल–उद्धवा शांतवन कर )

वृंदावनवासी ॥ कोठें गुंतला प्राण विसावा ॥ ध्रु० ॥ दुःशासन धरुनी वेणी जनासन्निध राहे ॥ पांचाळी उघडी करिता सुरसरितानंदी पाहे ॥ गंगात्मजद्रोणाचार्या पांडवांसि दुःख न साहे ॥ चाल ॥ मोकलीली दीर्घवार्ये ॥ आठवी कृष्ण पाय ॥ १ ॥ शंखासुर घेउनि गेला वेदांसा कोण तमाशा ॥ ब्रम्ह्यानें करुणा करितां उदधींत झाला मासा ॥ माझी कां करुणा नये रे पाव तूं संकटनाशा ॥ चाल ॥ मज लागली थोर आशा ॥ नको पाहूं हा कीं तमाशा ॥ २ ॥ मसणीं बैसुनिया वेडा झालासी वृंदेसाठीं ॥ लुसलुसीत हिरवा पाला तुळसीची आवड मोठी ॥ रुक्मिणी येतों नेदी घातला हार कंठीं ॥ चाल ॥ कोणतें संकट पोटीं ॥ लागलासी धेनूपाठीं ॥ ३ ॥ गोविंदा गोपवेषा गोवर्धनगिरिधारारे ॥ मुकुंदा मानसरमणा माधवा श्रमहरणारे॥ उचलोनी काढिये घेरे चुकविले जन्मफेरे ॥ अनंता भेट देरें ॥ सर्व ही हे

चि म्हणारे ॥ वृंदावनावासी ॥ कोठें गुंतला प्राण विसावा ॥४॥

पद ॥ ३०२ ॥

( राग–सोनी. ताल–दादरा. चाल–चाल निरंजना सुख होइ.)

घरा नका जाऊं त्याचें तोंड नका पाहूं ॥ भेटतांचि सचैलस्नाना वीण नका राहूं ॥ ध्रु० ॥ वेदबाह्य क्रियानष्ट ॥ परपीडक अंगीं ॥ संतुष्ट विषयभोगीं ॥ निर्दय निष्ठुर जया कुकर्मी असे संगीं ॥ १ ॥ भक्तिज्ञानविरक्तिचा लेश नसे कांहीं ॥ संतप्त सर्वदांही ॥ मी कोण कोठिल हें ॥ नेणें अहंदेही ॥ २ ॥ निजानंद संगें मन ॥ रंगेनाचि ज्याचें तोंड पाहु नये त्याचे ॥ सिद्धांत वर्णितां भय ॥ काय त्याच्या वाचें॥घरा॥ ३ ॥

॥ पद ॥ ३०३ ॥

(राग–मुलतानी. ताल–एका. चाल–न्हाणिल्हाणी त्या निर्मळा० )

ज्याच्या बोधें संसारदैन्य गेलें ॥ ज्याच्या संगे जिवसीवादि भ्रम केलें ॥ ध्रु० ॥ ज्याच्या पाईं त्रैलोक्य मूक झालें ॥ त्याचें आतां वाचेसि नाम आलें ॥ १ ॥ झालों सुखी मी हो हो कवणा लागी रे ॥ अनाथबंधू भेटला ब्रह्म योगी ॥ २ ॥ ज्याचे कृपे देवादि देव दाविरे ॥ ज्याचि सेवा स्वरुपीं प्रीती लावीं ॥ ३ ॥ ज्याची करणी करणासि नाहीं ठावी रें ॥ स्वयंभू तो म्या कवळिला भावाभावीं ॥ ५ ॥ विजयश्रीचा केवळ निज भर्ता ॥ अनन्यभक्ति हृदयकमळीं धर्ता ॥ ६ ॥ केशवस्वामी केवळ स्वामी कर्ता ॥ ज्यांतां नुमटे द्वैताचि कोठें वार्ता ॥ ७ ॥

पद ॥ ३०४ ॥

( राग–झिंजोटी. ताल–दादरा. चाल–रामनामाची गती कोण. )

झाली संध्या संदेह माझा गेला ॥ आत्माराम हृदयसेजे आला रे ॥ ध्रु० ॥ गुरुकृपा केवळ भागिरथी ॥ शांति क्षमा यमुना सरस्वती ॥ असिपद एकत्र जेथें होती ॥ स्वानुभवें स्नानचि गुरु

करिती ॥ १ ॥ सद्बुद्धिचें घातलें कडासन ॥ वरि दया सद्गुरुचि कृपा पूर्ण ॥ शमदम आंगीं विभुति चर्चिली जाण ॥ मुखीं उच्चारी केशव नारायण ॥ २॥ बोधपुत्र निर्माण झाला जेव्हां॥ ममता माता ही मरून गेली तेव्हां ॥ भक्ति बहिण धांवुनि आली गांवा ॥ आतां संध्या करूं मी कैसी केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्में जाहली कृष्णार्पण ॥ ऐसें ऐकताचि निवति साधुजन ॥ जन नव्हे अवघा जनार्दन ॥ एक जनार्दनि लाधली हेचि खूण ॥ ४ ॥

पद ॥ ३०५ ॥

( राग,ताल,चाल,वरच्यापदाप्रमाणें. )

निराकारी बांधिलें आह्मीं घर ॥ निरंजनीं राहिलों निरंतर ॥ ध्रु० ॥ नाम आमुचें पर ब्रह्मवासी ॥ वस्ति आह्मां आखंड चिदाकाशीं ॥ १ ॥ अधिष्ठानिं निरास केलि आह्मी ॥ ह्मणे केशव राहिली सुखधामीं ॥ २ ॥

पद ॥ ३०६ ॥

[ राग—खमाज. ताल—धुमाळी.चाल—तयावरि देव करिल दया. ]

तसा तूं भजरे ॥ आपुल्या मुळाला ॥ ध्रु० ॥ न दावि गोडी ॥ गुंतुनि चाडी ॥ शोधुनि काढि जसि मुंगि गुळाला ॥ १ ॥ कोण तें वन कोठें जीवन ॥ धांवणें करि मृग जसा परिमळाला ॥ २ ॥ चंदन आंगां उमजुनि चांगा ॥ वेधला तो नाग जसा परिमळाला ॥ ३ ॥ सोहिरा देवभक्त एक चिज्योति ॥ मिळे लवण जसें जळाला ॥ ४ ॥

पद ॥ ३०७ ॥

( राग—यमनकल्याण. ताल—एका. चाल—अहो तुम्हि ऐका. )

अनुहत वाजवि पुंगी ॥ बावा जोगी ॥ ध्रु० ॥ अनंतयुगाचा अतीत ॥ दोनी दोरे पवनसुत ॥ मोळी शिवली सम घालूंन ॥

वस्त्रानीचि केली विभुत ॥ लावली अंगीं ॥ १ ॥ चौशून्याचा तला वांटा ॥ गगन कैलासी गोंविल्या जटा ॥ त्याणें मेरुचा ग सोटा ॥ सप्तसागरीचा केला घोटा ॥ मीन मार्गी ॥ २ ॥ दा चक्रांची बांधिली मढी ॥ हातीं घेउन ज्ञान तुंबढी ॥ चंद्र र्य दीप जोडी ॥ लावली सिंगी ॥ ३ ॥ ऐसा तो संन्यासी गुण ॥ निरालंब निरंजन ॥ करितो त्रिवेणीचें स्नान ॥ दिस ी भ्रमर गुंफेतून ॥ असतो योगी ॥ ४ ॥ असतो गोसावी टला ॥ पेला ब्रह्मीचा पाजिला ॥ रामदास तयाचा चेला ॥ युगानुयुगीं ॥ ५ ॥

## पद ॥ ३०८ ॥

( राग—खमाज. ताल—एका. चाल—भुतलबूर मोठेंगे बा० )

एक नवल देखिलें बाई ॥ माझे डोळां उगवली जाई ॥ ध्रु० ॥ तिचें उफराटें लागलेंसे मुळ ॥ देटांविण आलें एक फळ ॥ एक० ॥ १ ॥ तिच्या पाकोळ्या नेणो किती ॥ गणितां शिणल्या वेद श्रुती ॥ एक० ॥ २ ॥ तिचा गंध पाहतां सर्वभुतिं ॥ अनुभवि भ्रमर सेविताती ॥ एक० ॥ ३ ॥ व्यास प्रन्हाद चक्रवर्ती जनक ॥ कापिल मुनी सिद्धादिक ॥ एक० ॥ ४ ॥ केशव स्वामीची कृपा पाही ॥ गुर्णेवीण प्राप्त नोहे बाई ॥ एक॥ ५ ॥

## पद ॥ ३०९ ॥

( राग—परज. ताल—एका. चाल—धाउनिया मज मारि. )

धांवुनियां मज तारीं ॥ आतां कृष्णा धांवुनियां मज तारीं ॥ ध्रु० ॥ दुष्ट नष्ठ खळ कटु वचनाचीं ॥ करिती मज भडमारी ॥ आतां० ॥ ॥ १ ॥ सबळही पतिपरि दैवरतीनें ॥ जाहले रंक भिकारी ॥ आतां० ॥ १ ॥ मज दीनाचें अति संकटहें ॥ तुजविण कोण निवारी ॥ कृष्णा० ॥ ४ ॥

करिती ॥ १ ॥ सद्बुद्धिचें घातलें कडासन ॥ वरि दया सद्गुरुचि कृपा पूर्ण ॥ शमदम आंगीं विभुति चर्चिली जाण ॥ मुखीं उच्चारी केशव नारायण ॥ २ ॥ बोधपुत्र निर्माण झाला जेव्हां ॥ ममता माता ही मरून गेली तेव्हां ॥ भक्ति बहिण धांवुनि आली गांवा ॥ आतां संध्या करूं मी कैसी केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्म जाहलीं कृष्णार्पण ॥ ऐसें ऐकताचि निवति साधुजन ॥ जन नव्हे अवघा जनार्दन ॥ एक जनार्दनि लाधली हेचि खूण ॥ ४ ॥

## पद ॥ ३०५ ॥

( राग,ताल,चाल,वरच्यापदाप्रमाणें. )

निराकारी बांधिलें आह्मीं घर ॥ निरंजनीं राहिलों निरंतर ॥ ध्रु० ॥ नाम आमुचें पर ब्रह्मवासी ॥ वस्ति आह्मां अखंड चिदाकाशीं ॥ १ ॥ अधिष्ठानिं निरास केलि आह्मीं ॥ ह्मणे केशव राहिली सुखधामीं ॥ २ ॥

## पद ॥ ३०६ ॥

[ राग—खमाज. ताल—धुमाळी. चाल—तयावरि देव करिल दया. ]

तसा तूं भजर ॥ आपुल्या मुळाला ॥ ध्रु० ॥ न दावि गोडी ॥ गुंतुनि चाडी ॥ शोधुनि काढि जसि मुंगि गुळाला ॥ १ ॥ कोणतें वन कोठें जीवन ॥ धांवणें करि मृग जसा परिमळाला ॥ २ ॥ चंदन आंगां उमजुनि चांगा ॥ वेधला तो नाग जसा परिमळाला ॥ ३ ॥ सोहिरा देवभक्त एक चिज्योति ॥ मिळे लवण जसें जळाला ॥ ४ ॥

## पद ॥ ३०७ ॥

( राग—यमनकल्याण. ताल—एका. चाल—अहो तुह्मि ऐका. )

अनुहत वाजवि पुंगी ॥ बावा जोगी ॥ ध्रु० ॥ अनंतयुगाचा अतीत ॥ दोनी दोरे पवनसुत ॥ भोळी शिवली सप्त धातूंत ॥

घउखानीचि केली विभुत ॥ लावली अंगीं ॥ १ ॥ चौशून्याचा घातला वांटा ॥ गगन कैलासी गोंविल्या जटा ॥ त्याणें मेरुचा केला सोटा ॥ सप्तसागरीचा केला घोटा ॥ मीन मार्गी ॥२॥ चौदा चक्रांची बांधिली मढी ॥ हातीं घेउन ज्ञान तुंबडी ॥ चंद्र सूर्य दीप जोडी ॥ लावली सिंगी ॥ ३ ॥ ऐसा तो संन्यासी निर्गुण ॥ निरालंब निरंजन ॥ करितो त्रिवेणीचें स्नान ॥ दिसतो भ्रमर गुंफेतून ॥ असतो योगी ॥ ४ ॥ असतो गोसावी भेटला ॥ पेला ब्रह्मीचा पाजिला ॥ रामदास तयाचा चेला ॥ युगानुयुगीं ॥ ५ ॥

## पद ॥ ३०८ ॥

( राग—खमाज. ताल—एका. चाल—भूतलबूर मांठेंगे बा० )

एक नवल देखिलें बाई ॥ माझे डोळां उगवली जाई ॥ ध्रु० ॥ तिचें उफराटें लागलेंसे मुळ ॥ देटांविण आलें एक फळ ॥ एक०॥ १ ॥ तिच्या पाकोळया नेणो किती ॥ गणितां शिणल्या वेद श्रुती ॥ एक० ॥ २ ॥ तिचा गंध पाहतां सर्वभुतिं ॥ अनुभवि भ्रमर सेवितानी ॥ एक० ॥ ३ ॥ व्यास प्रऱ्हाद चक्रवर्ती जनक ॥ कपिल मुनी सिद्धादिक ॥ एक० ॥ ४ ॥ केशव स्वामीची कृपा पाही ॥ गुरुंवीण प्राप्त नोहे बाई ॥ एक॥ ५ ॥

## पद ॥ ३०९ ॥

( राग—परज. ताल—एका. चाल—धांउनिया मज मारि. )

धांवुनियां मज तारीं ॥ आतां कृष्णा धांवुनियां मज तारीं ॥ ध्रु० ॥ दुष्ट नष्ठ खळ कटु वचनाचीं ॥ करिती मज भडमारी ॥ आतां० ॥ ॥ १ ॥ सबळही पतिपरि दैवगतीनें ॥ जाहले रंक भिकारी ॥ आतां० ॥ १ ॥ मज दीनाचें अति संकटहें ॥ तुजविण कोण निवारी ॥ कृष्णा० ॥ ४ ॥

## पद ॥ ३१० ॥

( चाल–ऐकाहो जन ऐका शिवरात्री कथा. ताल–एका· )

अजुनि कां रे न येसी कमलारमणा ॥ तारक तूं हरि होसी आम्हां ल्हाना ॥ ध्रु० ॥ वैकुंठीं· क्षीरसागरीं तूं पहुडे ॥ किंवा मुनिजन यांच्या हृदयींच दडे ॥ गुंतुनि कीर्तनप्रेमें भावाचे कडे ॥ १ ॥ केव्हांचि मी आळविते तूं नायकसी ॥ पहासि काय तमासा ॥ ही वेळ कशी ॥ यावरि काय ह्मणावें ॥ २ ॥ स्नाना गेला तो येईल दुर्वास मुनी ॥ घाबरला जीव माझा करितां स्तवनीं ॥ गिरिधर प्रभु तूं होसी ॥ आमुची जननी ॥ ३ ॥

## पद ॥ ३११ ॥

[ राग–कानडा. ताल–धुमाळी. ]

यादवराया ॥ मैया यावें सोडावया ॥ न दिसे कोणी वर्जावया ॥ सत्वर पावें करुणालया ॥ यादवरा० ॥ ध्रु० ॥ मंदिरीं होतें ऋतुस्नान ॥ तेथें आले कौरवदूत ॥ धरिली वेणी अकस्मांत ॥ नेलेंरे नेलें दुर्जनांत ॥ १ ॥ रंभेपाशीं उभे गज ॥ तैसे वैरी मासति मज ॥ सांगूं कवणा तरि मी गुज ॥ गेली रे गेली माझी लाज ॥ २ ॥ धर्मरायें धरिलें मौन ॥ आज्ञेंत गुंते भीमसेन ॥ धरिली शांती अर्जुनांन ॥ नकुळ सहदेव झाले दीन दीन ॥ ३ ॥ आतां कृष्णा सावधान ॥ थोडें उरलें अवसान ॥ जाउं कोणा मी शरण ॥ गेलारे गेला माझा प्राण ॥ ४ ॥

## पद ॥ ३१२ ॥

( राग–बहिरवी·ताल–त्रिवट. )

तुमबिन मेरो कौन खबरले ॥ गोवर्धन गिरीधारी रे ॥ ध्रु० ॥ मोर मुगुट पीतांबर सोहे ॥ कुंडलकी छब न्यारीरे ॥ तुम भि० ॥१॥ भरो सभा द्रौपदी ठाडी ॥ राखोलाज हमारी रे ॥ तुम०॥ २ ॥ मीराके प्रभु गिरिधरनागर ॥ चरनकमलबलहारी रे ॥ तुम० ॥ ३ ॥

पद ॥ ३१३ ॥

[ राग–मुलतानि. ताल–धुमाळी. चाल–मस्तानो. ]

राखींले याहि ठौर ॥ प्रभुजी० ॥ ध्रु० ॥ खैचो चीर अलवको सहाथन ॥ करत दुसासन जोर ॥ अब द्रुपदी बिलखात ठाडी ॥ चिते हरीकी ओर ॥ प्रभुजी० ॥ १ ॥ कींतो बान पुरान भयो है ॥ गरुड पंख भये हीन ॥ कींदहु चक्र चुराय गये है ॥ कीं भुजबल भये हीन॥२॥भिसम करन द्रोन दुसासनको॥कोई न करत निहोर ॥ तीन पतिनमाहारी आये ॥ जब न कऱ्यो हित मोर ॥ ३ ॥ बाढे चीर अंबार लागे ॥ होत जय जय सूर ॥ सूरके प्रभू किरपासागर ॥ चित्ते तिर छिकोर ॥ ४ ॥

पद ॥ ३१४ ॥

( राग–यमनकल्याण.ताल–त्रिवट. )

ये हरि लोकरि धावत ॥ गोविंदा सदया चपल उडि घाल ॥ ध्रु० ॥ गांजिति हे मज वैरी सारे ॥ नकळति तुजला हाल ॥ चपल उ० ॥ १ ॥ या समयीं प्रभु आश्रय नाहीं ॥ चालुं नको मृदु चाल ॥ चपल उ० ॥ २ ॥ रामकृष्ण कनवाळु दयानिधि ॥ पांडुरंग तव बाळ ॥ चपल उ० ॥ ३ ॥

पद ॥ ३१५ ॥

( राग–सोनीं. ताल–भजनी. )

येईंगा तुं येईंगा तूं पंढरीच्या राया ॥ तुजवीण शीण वाटे क्षीण झाली काया ॥ ध्रु० ॥ यातिहीन मतिहीन, कर्महीन माझें ॥ सर्वहि लज्जा सोडुनि बापा,शरण आलों तूज ॥ १ ॥ दीननाथ दीनबंधू नाम तुझा साजे ॥ पतीतपावन ऐसि जगीं ब्रीदावळी गाजे ॥ २ ॥ विटेवरीं उभा नीट कटावरीं कर॥ तुका ह्मणे आह्मा हेंचीं ध्यान नीरंतर ॥ ३ ॥

॥ पद ३१६ ॥

( राग–झालंमडा. ताल–धुमाळी. चाल–भाईनामरामसे जादा. )

सदया येई उदारारे ॥ आजी नंदकुमारा ॥ ध्रु० ॥ कालिया-फणीवरी नाचे मनोहर ॥ पदद्वय दावि सुकुमारारे ॥ १ ॥ आत्मारामा मनविश्रामा ॥ ललितलीला अपारारे ॥ २ ॥ त्रिंबक वंदी एकाजनार्दनीं ॥ एकाजनार्दनीं गारे ॥ ३ ॥

पद ॥ ३१७ ॥

(राग-झिंझोटी. ताल-दादरा. चाल-गेला मान सावरी.)

गेली लाज आवरील॥कोण यदुपती ॥ ध्रु० ॥ कर्मी निजदासपणें भोगी सुखदुःखा ॥ नेणें तुजवीण नान्यथा गती ॥ गेली० १ ॥ प्रारब्धा धीर धरीं संचित नाहीं उरी ॥ क्रियमाण मान त्यागिती ॥ गेली० ॥ २ ॥ धर्मांचा साभिमान पांचाळी लाजे ॥ धांवलासि सत्वर गती ॥ गेली० ॥ ३ ॥ दीनाची पाठि राखी भक्तांची मायरवी॥कृष्णपदीं अर्पिली मती ॥ ४ ॥

पद ॥ ३१८ ॥

(राग-कल्याण. ताल-त्रिवट.)

लवकरि धांव सख्या यदुराया ॥ अतिदुर्घटसंकट कोण समर्थ हराया ॥ ध्रु० ॥ काय करूं मज कांहीं सुचेना ॥ ध्यान तुझेंचि धराया ॥ लव० ॥ १ ॥ भवजलदुस्तरडोहिं बुडालों ॥ सत्वर ये उद्धराया ॥ लव० ॥ २ ॥ तुजविण नरहरितनया न दिसे ॥ भवसागरूं तराया ॥ लवकरि धांव० ॥ ३ ॥

पद ॥ ३१९ ॥

(राग-कल्याण. ताल-दादरा.)

लवकरिं यदुनाथ हरीं ॥ येई हो ॥ ध्रु० ॥ तामस दुर्वासऋषि॥ आला गतअर्धनिशी ॥ ह्मणतो मज भोजनासि देई हो ॥ लवकरीं ॥ १ ॥ सोडुनि मन पवन खगा ॥ ये सत्वर धाउनि गा ॥ रक्षीं मम सत्वा गा ॥यश तू घेई हो ॥२ ॥ दूर करीं दृढ संकटास ॥ हृदयीं तव चरणाचा ध्यास ॥ पांडुरंग निजपदास नेई हो ॥ ३ ॥

पद ॥ ३२० ॥

(राग—कल्याण. ताल—त्रिवट. चाल—श्रीहरिच्या वेणु नादें मनगा.)

बहु शिणले नेत्र माझे ॥ हरि कांहो येईना ॥ प्रभु कांहो येई ना ॥ ध्रु० ॥ दोन प्रहर रात्र झाली ऋषि आले भोजना ॥ निद्रिस्त आह्मी होतों त्यांनिं केली गर्जना ॥ धावोनी धर्म येती करुं ह्मणती पूजना ॥ स्नानासी पाठविले करुं कैसी योजना ॥ बहु शिण० ॥ १ ॥ दुर्वासऋषी कोपें आतां तो येईल ॥ नसतांची अन्न पात्रीं तो शाप देइल ॥ कैवारी बंधुराया ब्रिद तुझें जाईल केंव्हांचि आळवीतें कां जागा होशिना ॥ बहु० ॥ २ ॥ धांवोनि येइं वेगीं हरि माझ्या भेटिसी ॥ कैवारी बंधुराया धरि मजला पोटिसी ॥ बघतोसि काय आतां घालिं मजला पाठिसी ॥ केंव्हांचि आठवीते कां करुणा येइना ॥ बहु० ॥ ३ ॥ ऐकुनियां दीनवाणी भगिनीची आलासे ॥ उठ सजणे सांग बाई संकट तें कायसें ॥ ऋषि सर्वही तृप्त झाले महिपती गातसे ॥ नरहरिच्या चरणिं असतां संकट राहिना ॥ बहु० ॥ ४ ॥

पद ॥ ३२१ ॥

(राग—झिंजोटी. ताल—त्रिवट. चाल—धांव विभो करुणा.)

काय दयाळा संशय गमला ॥ सांग सख्या रघुरायारे ॥ ध्रु० ॥ क्षुधित असाल वनांत ह्मणुनियां ॥ मी विपिनीं बहु फिरले रे ॥ धांवत आल्यें परि भासत मजला ॥ श्रम गेले किं वायां रे ॥ काय० ॥ १ ॥ मधुररुचि कटु अम्ल कळाया ॥ चाविलीं बोरें निज दंतीं रे ॥ कडू खारट कशासी आणीनरे ॥ राघवा तुजला खायालारे ॥ काय० ॥ २ ॥ राजाराम दयाघन मग तो ॥ शबरिचीं मग बोरें भक्षितसे हो ॥ भाग्य नसेंचि सुरगण ह्मणति ॥ असा प्रसाद मिळाया हो ॥ काय दयाळा० ॥ ६ ॥

पद ॥ ३२२ ॥

(राग—यमनबिलावल. ताल—धुमाळी.)

राम गावा राम घ्यावा राम जिवींचा विसावा॥ध्रु०॥कल्याणाचे जे कल्याण रघुरायाचें गुण गाण॥राम गागावा॥१॥मंगळाचे जे मंगल राम कौसल्येचा बाळ ॥ राम० ॥ २ ॥ राम कैवल्याचा धणी ॥ रामदासा अभिमानी ॥ राम० ॥ ३ ॥

पद ॥ ३२३ ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. चाल–कुजभगिनी कां करुणाकरा. )

गगनि घडड घन गरजे ॥चमचमात चमकतसे चपला व्रजजन कांपे थर थर थर थर गाजे ॥गग० ॥ ध्रु० ॥ मथुरा गोकुळ व्रज वृंदावन ॥ जलमय होउनि बुडे सकल जन ॥ उन्मळोनी तरुवरा दिसू पडनी ॥ वायु सुटला सणणणणण भर भर भर वाजे ॥ गग० ॥ १ ॥ इंद्र कोपला महाभयंकर मुसलधारी पर्जन्य वर्षतो ॥ अडखळोनि गोप गाई पडति धरणी॥नाद घुम घण णणणण घड घड घड वाजे ॥ गग० ॥ २ ॥ त्यासमई स्थूळ गिरी गोवर्धन॥नखाग्रीं उचलुनि धरी सकल जना ॥ कृष्णदास करित नमुना॥अर्पण शिव शिव शिव शिव हर हर हर हर गिरीजेश्वर ॥ गगनि० ॥ ३ ॥

पद ॥ ३२४ ॥

( राग–पूर्वी. ताल–त्रिवट. )

हरी मज तुझे चरणीं दे थार ॥ ध्रु०॥ बसेन तव पदी जसें उटवितां ॥ तुटे भागले ढोर ॥ हरि० ॥ १ ॥ भ्रमें भवसुखा ठिकाण मानुनी॥भ्रमलों तुजविण फार ॥ हरि० ॥२ ॥ सच्चित्सुखदा तुजविण न सुटे॥न करी आन विचार ॥ हर० ॥ ३॥

पद॥ ३२५ ॥

( राग–धनाश्रीचा जिल्हा. ताल–धुमाळी. )

भक्तासाठीं तो जगजेठी बसोनि माळ्यावर ॥ पाखरें उडवी सारंगधर ॥ ध्रु० ॥ भक्तांमध्यें भक्ति पहा त्या बोधल्यानें केली ॥

थोंऱ्या ताटानां कणसें आळीं ॥ ऐसा तो देव अनंत विठ्ठल अनंत रूपें ख्याली ॥ कशी देव भक्ताची माउली ॥ त्याचे चरणापाशीं विनंती जोडुनि दोनीं कर ॥ पाखरें उडवी सारंगधर ॥ १ ॥नामदेवाशीं ह्मणती ब्राह्मण जात तुझी वेंगळ ॥ निघ बाहेर करिशि विटाळ ॥ तेव्हां तो गेला देउळामागें ॥ केले दगडाचे टाळ ॥ हरीनें फिरविलें देउळ ॥ अगाधलीला त्याची द्वारका ॥ एकया खांबावर ॥ पाखरें उड० ॥ २ ॥ जनाबाईच्या घरि भरिल्या देवें पाण्याच्या घागरी ॥ चौंहातानें रांजण भरी ॥ दळण कांडण धुणें धुवुनी पांटी डोईवरी ॥गवऱ्या वेंचुनि आणी घरीं ॥ प्रल्हादाला तेव्हां तारिलें जळत्या अग्नीवरि ॥ पाखरें उ० ॥ ३ ॥ चोख्यामेळ्याचे घरीं देवानें सोडिली द्वादशी ॥ तेव्हां तें श्रुत झालें रायासी ॥ नेलें पाचारुनि रायें तेथवां शिक्षा दिधली त्यासी ॥ देवा तूं मार त्याचा खाशी ॥ अगाध तुझी मात्र कळेना ॥ तुका जोडुनी कर ॥ पाखरें उ० ॥ ४ ॥

## पद ॥ ३२६ ॥

(राग—सोनी. ताल—ददरा. चाल—चालनिरंजनामुख.)

चाल माझ्या राघो ॥ डोंगरीं दिवा लागो ॥ ध्रु० ॥ घर केलें दार केलें घरीं नाहीं वरो ॥ शजारिणी पापिणिचीं पाच पोरें मरो ॥ चाल० ॥ १ ॥ घरीं पांच पोरें तीं मजहूनि आहेत थोर ॥ पांचाचीं बळें खादली बावंन केले चोर ॥ चाल० ॥ २ ॥ घर केलें दार केलें दुकानदार मोठा ॥ पट्टाची राणि तिचा धांगडधिंगा मोठा ॥ चाल मा० ॥ ३ ॥ दुकान केला मोठा पदरीं रुका खोटा ॥ हिजडा ह्मणशि जोगी सोळासहस्र भोगी चाटा ॥ चाल मा० ॥ ४ ॥ तुका ह्मणे वेगीं हरी ह्मणा जगीं ॥ सांडुन देईं सर्व कांहीं करा भक्तिलागीं ॥ चाल मा० ५ ॥

पद ॥ ३२७ ॥

[ राग—झालंगडा. ताल—एका.)

निष्काम राम जपारे ॥ ध्रु० ॥ स्वर्गींचे ज्ञानी ॥ रामा इच्छिती मेदिनी ॥ अमृत प्राशुनी ॥ आह्मा नाहीं नफारे ॥ निष्काम० ॥ १ ॥ निवृत्तिकृपेनें ॥ बोले मुक्ताबाई ॥ नाहीं आह्मां भव भय धोकारे ॥ निष्काम राम जपारे ॥ २ ॥

पद ॥ ३२८ ॥

(राग—काफी. ताल—धुमाळी.)

भज भज गोपालं ॥ गोपीगोकुलपालं ॥ ध्रु० ॥ कंठविलंबितनव-वनमालं ॥ तनुरुचिवीजिततमालं ॥ भज० ॥ १ ॥ करधृतमुरली-वादनलोलं ॥ मृगमदतिलकितभालं ॥ भज० ॥ २ ॥ मणिमयकुं-डलरुचिरकपोलं ॥ श्रीधरपालनशीलं ॥ भज भज गोपालं ॥ ३ ॥

पद ॥ ३२९ ॥

( राग—बहिरवी. ताल—त्रिवट. )

मैया मैं नहिं माटि खवैया ॥ ध्रु० ॥ झूटी साकी संगि कहतु है ॥ झूटोहि बलभैया ॥ मैया० ॥ १ ॥ डरके मारे थरथर कांपे ॥ नैनन नीर बहैया ॥ मैया० ॥ २ ॥ जोरे हात सूरके प्रभुनें ॥ परत ग्वाल हरि पैया ॥ मैया० ॥ ६ ॥

पद ॥ ३३० ॥

(राग—कालंगडा. ताल—धुमाळी.चाल—खेळिया आपहि खेलीर प्यार.)

नव्हतच कैस झालरे खेळिया, नाहीं तेंच दिसूं लागलें रे ॥ न-व्हत० ॥ ध्रु० ॥ अरूप होत तें रूपासि आल, जीव शिव नांव पावलरे ॥ आपुली आवडी धरूनिं पोटीं, आप आपणातें व्यालरें ॥ ओपन्या कारन बायको केली, तिनें हें पोट वाढविलरे ॥ एक अंगीं त्रिविधा होउनि सर्वहि, भूतीं भौतिक दाखवीलरे॥१॥ नव्हतच० ब्राह्मणाच पोर एक व्यालरे खेळिया, बारा वर्षं

लपालरे ॥ कांपत कांपत बाहेर आलतें, नागवच पळून गेलरे ॥ सा तोंड्या एक संब्याच बाळक, बाळकपणा आथीलरे खेळतां खेळतां चकीतचकल, कपाट फोडोनि गेलारे ॥ २ ॥नव्हतच०॥ खेळियामाजी हनुम्या बळकट, न पडेचि काम व्यसनोरे ॥ काम नाहीं तेथें क्रोधचि कैंचा, तेथे कैंचे भांडणा रे ॥ दाहा तोंड्याचें पोर मारिलें, राम्या गड्याचा गडिपणा रे ॥अहिरावण महिरावण मारूनि तेणें, समूळ बुडवि रावणा रे ॥ ३ ॥ नव्हतच० ॥ ब्रह्मयाच पोर एक नाऱ्या खेळिया, हिंडतो त्रिभुवनारे॥कुटाळकी करुनि जग भांडवी, साधु ह्मणवी आपणा रे ॥ गंगा गिरजा भांडण लाउनि, संब्यासि धाडिले वना रे॥ खेळ खेळे परि डावीं न सांपडे, ऐसा तो खेळिया शाहाणा रे ॥ ४ ॥ नव्हतच० ॥ या दवाच पोर एक गोपाळ्या भला त्यान, अनंत खेळ खेळला रे ॥ लाहान थोर त्यान आवघेच मारुन, डावच मोडुन गेलारे ॥ पांडवाच पोर एक धर्म्यागडि त्यान, श्यामकर्णवारु सोडिलारे ॥ संत साधु ऋषि मुनि अवघेहि थकले, भक्ति मार्ग त्यानें दाविलारे ॥ ॥ ५ ॥ नव्हतच० ॥ मछिंद्राच पोर एक खेळिया शाहाणा त्यान निरंजनि खेळ खेळलारे ॥ आप आपणाला शोध करुनियां, आपण निराळा राहिला रे ॥ त्रिकुट भेदुनि श्रीहाट रोधुनि, गोल्हाट गड घेतलारे विष्णुदास नामा ह्मणे पाहा संत हो विचारून देहालारे ॥ ६ नव्हत० ॥

## स्फुट पदें.

### पद ॥ १ ॥

( राग-कालंगडा. ताल-धुमाळी. अष्टमूर्तिप. या चा. )

उमा रमा तशि वदली ज्या प्रती ॥ प्रीतीकोपवचन ॥ रक्षुनि तुझां देवें ऐशा ॥ घावें सुमनमन ॥ ध्रु० ॥ मदर्थ पूर्वी तुझ्या

पाहुनी मीनकेतु दीन ॥ मथन पावला अतां मजपुढें कां दाविशिं वदन ॥ १ ॥ बहु पथ गमना ऐशी तें तूं डोक्यावर धरुन ॥ येशी हें तुज निर्लज्जा वद उचित असे कीं न ॥ २ ॥ सोड सोड हे धूर्त अता हें कृष्ण-गल-ग्रहण ॥ स्वभावकुटिला अशा प्रियेशीं जा हो रममाण ॥ ३ ॥

पद ॥ २ ॥

(राग-कालंगडा ताल-दादरा.)

लक्ष्मीकांता धांव अतां लौकरीं ॥ मुरारि अतां ॥ ध्रु० ॥ तुजवीण मजला आश्रय नाहीं ॥ तूं या दासा तारीं ॥ कृपाळा॥१॥ जीवीता या बहुत त्रासलों ॥ घेई मज पदरीं ॥ सत्वरीं ॥ २ ॥ कृष्णमूख हें दावूं कैसें ॥ पितया दिन कैवारीं ॥ सांग बा ॥३॥

पद ॥ ३ ॥

( राग-जोगी. ताल-धुमाळी. चाल-मजला सोडवा आतां. )

मजला वरिल सुभद्रा काय ॥ कोणी तरि सांगा हो ॥ ध्रु० ॥ आहे मनी लग्नाची बहु आस ॥ कैसा घ्यावा हो संन्यास॥ दिसतिल दाही दिशा उदास ॥ होईल त्रास शरिराला ॥ म० ॥ १ ॥ जन ह्मणतील संन्यासि पार्थ ॥ नाहीं प्रपंच ना परमार्थ ॥ यांत कैसा घडेल स्वार्थ ॥ हें यथार्थ सांगा हो ॥ मज० ॥ २ मजला अंतरतिल हे पाय॥पाहुनि धर्म हि ह्मणेल काय ॥ द्रौपदी करील हाय हाय ॥ मुकेल माय प्राणाशीं ॥ मज० ॥ ३ ॥ ऐकुनि बोले मेघश्याम ॥ कार्या विघ्न करील बळिराम ॥ एका जनार्दनासी काम ॥ करी विश्राम तव चरणीं ॥ मजला ॥ ४ ॥

पद ॥ ४ ॥

( राग-मुलतानि.ताल-धुमाळी. चाल-बरवा नो कृष्ण गुडी आपुला.)

अर्जुन होउनि सन्यासी ॥ झाला द्वारापतिवासी ॥ ध्रु० ॥ बरवा परिकर लंगोटी ॥ गुलाबी लवलवीत छाटी ॥ ह्मणतो-

हार स्थिति मोठी ॥ स्मरणी वाजतसे बोटीं ॥ अंगीं विभू तिची ऊटी ॥ कपटी वेष कांति मोठी ॥ पाहुनि जन भुलले त्यासी ॥ झाला द्वारावतिवासी ॥ १ ॥ लोटली द्वारावति सारी ॥ झाली खेट मठद्वारीं ॥ पुजाया नाना उपचारीं ॥ वेळा साधिताति चारी ॥ दुर्लभ यतिदर्शन भारी ॥ ढोंग माजविता कंसारी ॥ पडल्या भेटीच्या राशी ॥ झाला० ॥ २॥ यतिची सतत मौनवृत्ती॥ समाधि स्थिति बहु एकांतीं ॥ वेदांतस्थ रहस्योक्ती॥ बालका फार सुरसयुक्ति॥उपजली सर्वजना भक्ती ॥ येउनि बसति तयापाशी०॥ झाला०॥३॥वर वर बरवि योगमुद्रा॥ गडबडतसे मनिं सुभद्रा ॥ भरतें यतिस्मरसमुद्रा ॥ रात्रंदिवस नये निद्रा ॥ हें एक ठावें यादवेंद्रा ॥ उपजवी प्रीती बलभद्रा ॥ कुतूहल पंतविठ्ठलासी ॥ झाला० ॥ ४ ॥

पद ॥ ५ ॥

( राग—कल्याण. ताल—झुमाळी. चाल—संतपदाची जोड• )

सोडि आतां व्याकुळ झाला प्राण ॥ ध्रु०॥ फिरउनी नेत्रा पसरूनियां मुख ॥ कंसा सांगेल कोण.॥ सो० ॥ १ ॥ मारूं आली नंदमुलासी ॥ मजवरी आले विंदाण ॥ सो० ॥ २ ॥ आनंदात्मज बोले केलें ॥ तैसें तें फळ जाण ॥ सो० ॥ ३ ॥

पद ॥ ६ ॥

[ राग—देस. ताल—त्रिवट. ]

मातर्जनकराजतनये ॥ त्रिजगज्जननि सदयहृदये ॥ विनंती करुनि चित्त वळवा ॥ प्रभुला केव माझी कळवा ॥ध्रु०॥ मारुतिराया बल भीमा ॥ द्या मज हरिभजनीं प्रेमा ॥ अजि लक्ष्मणजी जगजेठी ॥ करा मज रामचरण-भेटी ॥ विनं० ॥ १ ॥ भरतजी येवढि करा सवडी ॥ द्या मज रामपदीं आवडी ॥ शत्रुघ्नजी करा करुणा ॥ दासत्वा रामरायचरणा ॥ वि० ॥ २ ॥

सुग्रीवजी मीत्र तुझि सर्चा ॥ करा मज दास प्रभुघरचा ॥ लंकानाथ विभीषणजी ॥ द्या प्रभुपाशिं दाद माझी ॥ वि० ॥ ३ ॥ अहो अंगदप्रमुखभक्त ॥ घ्या मज आत्ममंडळांत ॥ विठ्ठल पंत उभा द्वारीं ॥ भिकारी दीन हाका मारी ॥ वि० ॥ ४ ॥

पद ॥ ७ ॥

( राग–पिलू. ताल–धुमाळी. )

विकल करितसे आप्तजनांचा विरह भिनुनीं अंतरीं॥विवेक करुनी आवरितें मन नावरेचि तें परी ॥१॥ कांहीं न सुचे कांहीं न रुचे राहूं कशी मंदिरीं ॥ क्षणभरही मज चैन पडेना काय करावें तरी ॥ २ ॥

पद ॥ ८ ॥

( राग–भैरव. ताल–दादरा. )

कर प्रिय मंगलदायक हें ॥ मंगलदायक हें ॥ ध्रु० ॥ भवभयहारक मोक्षविधायक दुःखविनाशक हे ॥ देई सन्मति रक्षि आह्मां प्रतिं करि फलद्रुपा वसुमति हे ॥ पाठण नर्तन कीर्तन वादन, गायन ॥ कर० ॥ १ ॥ सुरुचिर सुस्वर मधुर मनोहर वाणी पंडित मानसहें ॥ कोकिलरवपरि रमवो संतत ॥ दे सुख भवाब्धितारक हें ॥ सुकृती करिती नृपती धरिती सुमती ॥क०२॥

पद ॥ ९ ॥

( राग–कानडा. (दरबारी)ताल–धुमाळी.

बागनमो नंदलाल चलोरी ॥ अहाहिरी ॥ ध्रु० ॥ चंपाचंमेली दवनामरवा ॥ झुक आई टमडार ॥ च० ॥ १ ॥ बागमो जायें दरसन पाये ॥ बिच ठाडे मदनगोपाल ॥ च० ॥ २ ॥ मीराके प्रभू गिरधरनागर ॥ वाके नयन बिसाल ॥ च० ॥ ३ ॥

पद ॥ १० ॥

( राग–आनंदभैरवी. ताल–दीपचंदी. )

काय वदूं त्या सम्पर्यीचें तें लावण्य जानकीचें॥ध्रु०॥कुटल मनोहर

कुंतल शोभती जिच्या मस्तकींचे ॥ कुंदकळ्या परि दंतहि मृ-
गचक्षी हसणें बघणें बाळपणींचें ॥ काय० ॥ १ ॥ साह्यिक
लीला जीच्या की लाजवी स्वतेजें चंद्रिकेतें ॥ पाहुनि ऐसें कोमल
अवयव मानिति माता मनीं कौतुकातें ॥ काय० ॥ २ ॥

पद ॥ ११ ॥

(राग–कालिंगडा.ताल–धुमाळी.हरिची बहिण ह्मणे सुभद्रा रुक्मिणी०याचालीवर.)

मनुष्यजन्मी ब्राह्मण होउनि; पशुवत् कामें कां करतां ॥ सत्या
चाहो त्याग करोनी, असत्य पंथें कां जातां ॥ ध्रु० ॥ गर्भी
देवें दिधली शोभा, अखंड मस्तकिं ती असतां ॥ आई श्रमली
तेलें लाउनि, धुउनि माखुनि वाढवितां ॥ जीवप्राण ते असति
स्त्रियांचें, वेणी घालिति पति असतां ॥ त्या केशातें चरचर दु-
ष्टहो, नापिक हस्तें कापवितां ॥ मनु० ॥ १ ॥ सुंदर कांता
असूनि तुमची जार स्त्रियांकडे कां पाहातां ॥ प्रभाव ऐसा हा
मदनाचा, पूर्णपणीं जाणत असतां ॥ तरूण विधवा ब्रह्मचारी,
राहातिल कायहो पति नसतां ॥ आश्चर्यातें कशास करितां,
गर्भवती त्या तुह्मि पाहतां ॥ मनु० ॥ २ ॥ डोळे गेले दां-
ताहि पडले, केशा आलि जरि पांडुरता ॥ तरुण समजुनि अ-
शा वृद्धा, द्रव्य घेउनि मुलि देतां ॥ थोड्याच दिवशीं तो
मेला मग, पापि तू सटवे तिस ह्मणतां ॥ पुरुषांनां परि ज्ञान
तत्व हें, कां बरें लागू नच करितां ॥ मनु० ३ ॥ निष्ठुर
घातकी दुष्ट कसायी, मतलबि अन्यायी कां होतां ॥ पुनर्वि-
वाहा संमति द्या हो टांका मनिची निर्दयता ॥ शोभत नाहीं तुह्मा
असें हें, पापि उगिच कां तुह्मि ठरतां ॥ ह्मणे नारायण पं-
डित शास्त्री, व्यर्थ कशाला ह्मणवितां ॥ मनु० ॥ ४ ॥

पद ॥ १२ ॥

( राग–कालिंगडा. ताल–धुमाळी. )

काशीनगरीं एक दरिद्री द्विज जन्मा आला ॥ धुन्यीडेनें पृथ्वीवरतीं भ्रमतां व्याकुळ तो झाला ॥ ध्रु० ॥ बहुत दुःख तें पाहुनि विष्णू मानसांतरी गहिंवरला ॥ वृद्धब्राह्मणरूपा धरुनी येइ मोर्दे अहिवरला ॥ १ ॥ किमर्थ भ्रमसी विप्रा सांगे नित्य कोणतें दुःख तुला ॥ प्रेमळ वाक्या ऐकुनि बोले विप्र काय भगवंताला ॥ २ ॥ ॥

## पद ॥ १३॥

( राग—आनंदभैरवी· ताल—धुमाळी. चाल—भक्तांसि भगवद्भजन. )

उद्धवा शांतवन कर जा, त्या गोकुलवासि जनांचें ॥ ध्रु० ॥ बा नंद यशोदामाता, मजसाठीं त्यजितिल प्राण ॥ त्यागुनी प्रपंचा फिरती, मनिं उदास रानोरान ॥ अन्नपाणि त्यजिलें रडतां अतिदुःखित झाले दीन ॥ चाल ॥ जन्मलों तेंहुनि झटले ॥ मजलागीं तिळतिळ तुटले ॥ कटि खांदे वाहतां घटले ॥ आटलें रक्त देहाचें ॥ उद्धवा० ॥ १ ॥ आइबाप त्यजुनी बाळें, मजसंगें खेळत होतीं ॥ गोडशा शिदोऱ्या आणुनी, आवडीनें मजला देती ॥ रात्रदिवस फिरले मागें, दधिगोरस चोरूं येती ॥ चाल ॥ मी तोडुनि आलों तटका ॥ तो जिवा लागला चटका ॥ मजविण त्या युग सम घटका ॥ आठवतें प्रेम जयांचें ॥ उद्धवा० ॥ २ ॥ पतिसुतादि ग्रह धन त्यजिलें, मजवरती धरुनी ममता ॥ मानिलें तुच्छ अपवर्गा, मज संगें निश्चळ रमतां ॥ मद्वृत्ताचित्त त्या गोपी, नेत्रांतरिं ठेवुनि समता ॥ चाल० ॥ तिळतुल्य नाहिं मनि डगल्यां ॥ दृढनिश्चय धरुनी वगल्या ॥ बहुधा त्या नसतिल जगल्या ॥ भंगले मनोरथ ज्यांचे ॥ उद्धवा० ॥ ३ ॥ हरि आहे सुखरुप ह्मणुनी, भेटतांचि त्यां सांगावें ॥ सांग कीं समस्तां पुसिलें, प्रत्युत्तर त्यां मागावें ॥ करुनियां ज्ञान तयातें, सांग कीं शोक त्यजावे ॥ चाल० ॥

हें कार्य नव्हे तुज जोगे ॥ मजसाठीं जावें वेगें ॥ हें कण्वमुनी-श्वर सांगे ॥ त्या न पवे ज्ञान जयाचें ॥ वदुवा शांतवन कर जा० ॥ ४ ॥

पद ॥ १४ ॥

( राग—झिंजोटी. ताल—त्रिवट. जलभरजात जमुनाके घांट या चा० )

झाली ज्याची उपवर दुहिता ॥ चैन नसे त्या तापवि चिंता ॥ झाली० ॥ ध्रु० ॥ केंवि मिळे पति कुलीन सुंदर ॥ लोकप्रिय धनवान जो ज्ञाता ॥ झाली० ॥ १ ॥ सासु श्वशुर दिर जावा नणदा ॥ छळितिल किंवा करितिल ममता ॥ झाली० ॥ २ ॥ सासरिं मग ही कशि वागेल ही ॥ काळजिं निशिदिनिं पोळवि चित्ता ॥ झाली० ॥ ३ ॥

पद ॥ १५ ॥

[ राग—जोगी. ताल—धुमाळी. चाल—मजला वरील सुभद्रा काव. ]

अंतरली या नृपबाळा ॥ सुंदर वेल्हाळा ॥ ध्रु० ॥ कोमल-तनु ती मृगनयना ॥ सुस्वर शब्दें करोनि मना ॥ ताडन करितां या सुमना ॥ तोष मना बहु झाला ॥ अं० ॥ १ ॥ दैवें दिधली ती कांता ॥ रतीसम रुपी गुणिवंता ॥ दैवें सुटली या कुलवंता ॥ व्यर्थ अहंता जीवाची ॥ २ ॥ तुजविण सख्ये जाती प्राण ॥ तळमळ अंतरीं निशिदिनीं जाण ॥ ईशानकृपा झाली पूर्ण ॥ मजवांचुनि गती नाहीं ॥ अंतरी लि० ॥ ३ ॥

पद ॥ १६ ॥

[ राग—धनाश्रीचा जिल्हा. ताल—धुमाळी. चाल—यश्यानों कृष्णगडी आपुला. ]

कैसें टाकुनियां मजला ॥ वाटलें जावेसें तुजला ॥ ध्रु० ॥ ऐकुनि माझा वध खोटा ॥ झाला शोक तुला मोठा ॥ नेणुनि शत्रूच्या कपटा ॥ केला स्वहिताचा तोटा ॥ कसा बा तुला मोह पडला ॥ वाटलें जावेसें तुजला ॥ कैसें० ॥ १ ॥ पुत्रप्रेमास्तव

बाणा ॥ सहसा टाकुनि धनु वाणा ॥ सोडिलें आपुलिया प्राणा ॥ बा तूं वीरांचा राणा ॥ कांहीं धीर नसे धरिला ॥ वाटलें जावेसें तुजला ॥ कैसें० ॥ २ ॥ जरि मज सोडुनि गेला तात ॥ तरी मीं आहे कीं जीवंत ॥ ऐशा क्रूर मुर्ती संतत ॥ धरिला स्नेह व्यर्थ चित्तांत ॥ अरिनीं कसा घात केला ॥ वाटलें जावेसें तुजला ॥ ३ ॥ ऐसा अश्वत्थामा शूर ॥ झाला पितृशोकानें चूर ॥ वाहनीं नेत्रांतूनि जलपूर ॥ होतां जवळ सूत चतूर ॥ त्यानें बहुत बोध केला ॥ सावध होऊनियां उठला ॥ ४ ॥

पद ॥ १७ ॥

[ राग–पिलु. ताल–धुमाळी. ]

जरि संकोचें प्रेमदृष्टिनें मुखाकडे न बघे ॥ कर धरिलेला भीतीनें जरि सोडाया लागे ॥ ध्रु० ॥ कंठालिंगन देतांनाहीं अपुल्या कुचयुगाला ॥ लावित नाहीं भरांत येउनि दृढ जरि हृदयाला ॥ १ ॥ महत्प्रयत्नें बहु काले जरि आली हाताला ॥ बोले जरि "जाऊंद्या लौकर ॥ सोडाहो मजला" ॥ २ ॥ संकेतस्थळिं चोरुनि आली कामांतुर बाला ॥ ऐशी रमवी अधिकचि तरि हो वाटे पुरुषाला ॥ ३ ॥

पद ॥ १८ ॥✓

( राग–हमीरकल्याण. ताल–धुमाळी. )

अरे मी भीष्म जरी श्रीहरि धरवीन चक्र करीं ॥ श्रीहरी० ॥ ध्रु० ॥ चक्र न धरितां रथिं बैसेन हा ॥ निश्चयो करिसि घरीं ॥ सांप्रत आज कळों येइलरे ॥ हें मजसन्मुख समरीं ॥ श्रीहरि० ॥ १ ॥ क्षत्रियकुलिचा सुत शंतनुचा ॥ जन्मलों शुभजठरीं ॥ हरिपदीं जन्मुनि शिवमौळी वसे ॥ त्या गंगे उदरीं, ॥ श्रीहरी० ॥ पार्थ हें बचडें बालक आजुनी ॥ दुग्ध दिसे अधरीं ॥ बुजवणि यातें पशु पक्षि भिती ॥ निर्भय क्षेत्र करी ॥ श्रीहरी० ॥ ३ ॥

ध्वजरुपी हरि रथिं श्वेतही हरी ॥ सारथी मुख्य हरी ॥ हरि मय रथ हा विजय श्रीहरी ॥ त्यातें मी प्रहरी ॥ श्रीहरी० ॥४॥ तो मी शिष्य भार्गवरामाचा ॥ कोपल्या न उरे उरी ॥ अमृत ह्मणे हें सत्यप्रतिज्ञा ॥ ऐकिजे रण चतुरीं ॥ श्रीहरी० ॥ ५ ॥

पद ॥ १९ ॥

( राग–भुपकल्याण. चाल–पंचतुंड० )

विधि हरिहर नरसिंह महेश्वर वंदुनि अक्षर असुरारी ॥ सुरवर सुंदर परशुधर हिमनग पूजित संकट भयहारी ॥ ध्रु० ॥ सुस्वर मंजुल यद्वरदानें रमविन सज्जन मधुनारी ॥ ममकुल युवति पूज्य भगवति देईल सद्गति भूनी भारी ॥१॥ पूर्णकृपेचे संत महज्जन तोषुनि वर्षिति वरवारी ॥ शेवटिं हृदयीं मातृ पित्याचें कवळिन सत्पद दुरितारी ॥ विधि० ॥ २ ॥

पद ॥ २० ॥

( राग–भुपकल्याण. ताल–त्रिवट. )

नमुनि ईश चरणा ॥ करिन मग गजाननाच्या पादस्मरणा ॥ नमु० ॥ ध्रु० ॥ सुकवी रत्नमाला ॥ अति शोभा दे यदीय सुंदर वक्षाला ॥ जिच्यामधें महामणी प्रकाश पाढित सुवर्णपदकीं बसोनियां कालिदास राणा ॥ नमु० ॥ १ ॥

पद ॥ २१ ॥

( राग–पिलु. ताल–त्रिवट. चाल–भजोरे भया० )

उपवन हें रुचलें ॥ सखे मज उपवन हें रुचलें ॥ ध्रु० ॥ आम्रतरुतळीं निदाघ समयीं, मन हर्षित झालें ॥ सखे० ॥१॥ तृषार्त जन ह्या, परागरंजित, मधुर जलें धालें ॥ सखे० ॥२॥ गंधवह पहा, मंद वाहुनी, सुखवि मला बाले ॥ सखे० ॥३॥ मंजु गान कोकिळा, करिति हे, शिखि नाचत आले ॥ सखे० ॥ ४ ॥

पद ॥ २२ ॥

( वैशाखमास वासंतिक० या चा० ताल–दादरा )

संप्रति हा शरत्काळ किती शोभला ॥ गावयास ज्यास बहुत स्फूर्ति ये मला ॥ ध्रु० ॥ सहकरास नव मंजरी येऊं लागली ॥ उपवनांत शेवतिं ही फुल्ल जाहली ॥ प्यावयास मरंदा धांवती अली ॥ बकुलवृक्ष पुष्पमयीं सर्व जाहली ॥ १ ॥ निशी माजि शुभ्र स्वच्छ किती चांदणें पडे ॥ मौजेनें राजपथीं हिंडती सडे ॥ गच्चीवरी बसुनि पतिस युवति दे विडे ॥ शीतल बहु गंधयुक्त वात सुटला ॥ संप्र० ॥ २ ॥

पद ॥ २३ ॥

[ राग–मुलतानी. ताल–त्रिवट. ]

मान्य नसे निज वचना ॥ स्वामिन् ॥ मान्य नसे० ॥ ध्रु० ॥ भवदाज्ञेचा भाव कळविला ॥ सकळहि येन मना ॥ स्वामिन्० ॥ १ ॥ सेवा नलगे लष्कर नलगे ॥ कांहीं न इच्छि मना ॥ स्वामिन्० ॥ २ ॥

पद ॥ २४ ॥

( राग–आनंद भैरवी. ताल–धुमाळी० )

किती सांगु तुला मज चैन नसे ॥ ध्रु० ॥ हे दुःख तरी मी साहुं कसें ॥ या समयि मला नच कोणि पुसे ॥ हा विरह सखे मज भाजितसे ॥ चाल ॥ मन कसें आवरूं ॥ किति धीर धरूं ॥ कसें करूं किती० ॥ १ ॥ हे बंधु नव्हत मम वैरी खरे ॥ दाविती कसें वरि प्रेम बरें ॥ बोलोनी पाडीती हृदयासी घरे ॥ चाल० ॥ नको नको मला जीव विष तारि पाजीव ॥ सखे सोडीव ॥ किती० ॥ २

पद ॥ २५ ॥

( राग–यमनकल्याण. ताल–एका. )

खिर्स्ती पडली पळी कसी, अवचित ऐसी ॥ ध्रु० ॥ अहा वाढ दिवस चिळ्याचा ॥ दिन हा असुनी आनंदाचा ॥ झाला आजि अपशकुन साचा ॥ या बाळासी ॥ खिर्स्ती० ॥ काय होईल ॥ १ ॥

सांगा आतां ॥ तुमच्या पदीं ठेवितें माथां ॥ कैसी टाळूं हो मी नाथा ॥ या घातासी॥शि०॥२॥ पडतां कधीं होतसे घात ॥ ऐसा समज असे लोकांत ॥ बुडते बाळ हरा या हात ॥ या दीनासी शि० ॥३॥ अंबे तुजला मी वंदीतें ॥ नाकदुरया ही काढीतें ॥ रक्षोनी माझ्या बाळातें ॥ वदे रुचिराशी ॥ शि० ४

पद ॥ २६ ॥

( राग-कल्याण. ताल-त्रिवट. चाल-तुर्ज अर्जुनि कारे करुणा नये )

हरि तुझी मुरली घरघेणी ॥ ध्रु० ॥ मुरलिचें गुण तुज सिकविलें कोणी ॥ गोपि विंचरिता विसरल्या वेणी ॥ हरि० ॥ १ ॥ वृंदावनि धिट चालियेल्या निट ॥ गोपि विपरीतचि ल्याल्या लेणी ॥ हरि० ॥ २ ॥ मध्वनाथ स्वामी पुण्यवंत आह्मी ॥ लोकलाजेवरी सोडियलें पाणी ॥ हरि० ॥ ३ ॥

पद २७ ॥

( राग-कालंगडा. ताल-दादरा. )

किती सोसूं जाच सांग बाई यशोदे ॥ पुत्र तुज हा खातो किं वद भांग ॥ ध्रु० ॥ पतीसेजेला निजली असतां ॥ मध्यरात्रिचा माग ॥ सदनीं येऊनी उभयामध्यें ॥ पहा सोडीला नाग ॥ किति० ॥ १ ॥ वेणिशेंडीसी गांठ बांधुनी ॥ कुळा लाविला डाग ॥ वास गोकुळी पुरे पुरे या॥लागो जिवा आग ॥ ॥ कि०॥ २ ॥ अहर्निशीं मम स्नुषेसी टपतो ॥ जसा आमीषा काग ॥ रामसख्यानें निज तनुजाचा ॥ कां त्यजिला अनुराग ॥॥ ३ ॥

पद ॥ २८॥

(राग-यमनकल्याण. ताल-एका. चाल-अरबरहरि हरि वदा.)

कोण नाहीं कोणाचेरे बाबा॥ध्रु०॥राज्य वृत्ती गांवघर॥ ठांई राह्याचे ॥ कोण० ॥१॥कांतापुत्र धन धान्य॥देह जायाचे॥कोण० ॥ २ ॥ जांवई सासू सासरा मित्र ॥ देण्या घेण्याचे ॥ कोण०

॥ ३ ॥ नाना मामा दादा तात्या ॥ सारे सुखाचे ॥ कोण० ॥ ४ ॥ माता पिता बहीण काका ॥ बंधु देहाचे ॥ कोण० ॥ ५ ॥ यज्ञ दान नेम धर्म ॥ तप कीर्तिचे ॥ कोण० ॥ ज्ञान योग भक्ती कथा ॥ कर्म फुकाचे ॥ कोण० ॥ ७ ॥ रामदास स्वामी ह्मणे ॥ सर्व जीवांचे ॥ कोण० ८ ॥

पद ॥ २९ ॥

( ताल–धुमाळी. चाल–अहा रे दैवा काय हें करवीशी. )

हाहा व्यर्थ मी आले कीं जन्मासी ॥ सजलें माराया खड्गानें बाळासी ॥ ध्रु० ॥ वत्सा कमलाक्षा गोजिऱ्या सुंदरा ॥ तान्हूल्या माझ्या वंशाचा अंकुरा ॥ योजीलें तूतें अतिथींच्या उपहारा ॥ तोडूं मी कैसी बाळा तुझ्या शिरा ॥ हाहा० ॥ १ ॥ नव मास वत्सा उदरीं वाहिलें ॥ लालनपालन बा आनंदानें केलें ॥ कटि खांद्यावरी घेऊनी फिरलें ॥ अंती अतिथींतें तूजला अर्पिलें ॥ हाहा० ॥ २ ॥ आलिंगोनियां चुंबोनियां तूतें ॥ आनंद तूझ्या पाहोनि मुखातें ॥ जाई विसरोनी मी साऱ्या श्रमातें ॥ तुज सम प्रिय लोकीं तूंचि मातें ॥ हाहा० ॥ ३ ॥ नाहीं आभरणें घातली बाळांसीं ॥ वस्त्रें बस्त्यांत बांधिलीं म्यां कैसीं ॥ नाहीं धाडिलें म्यां तुजला बिदीसी ॥ स्वैरक्रीडेची राहीली आसोसी ॥ ४ ॥

पद ॥ ३० ॥

( राग–काफी. ताल–दीपचंदी. )

जाऊनी घोर वनीं ॥ झाले तातातें बहु दिन येथुनी ॥ ध्रु० ॥ स्मरण तयाचें मनीं होउनी ॥ दुःख न मावे हृदयिं ह्मणोनी ॥ मूर्च्छित पडली भूवरि जननी ॥ वाटे ऐसें मन्मनी ॥ झाले० ॥ १ ॥

पद ॥ ३१ ॥

( राग–सोनी. ताल–त्रिवट. )

निष्कपट प्रेम हें ठरलें ॥ वेशा असुनी ॥ महासती ती मांव

जगीं या गाजविलें ॥ ध्रु० ॥ प्रियनिधनाची ऐकुनि वार्ता ॥ मिथ्या मानुनि ममता वित्ता ॥ शरीर अर्पिलें तत्पदिं चित्ता ॥ ठेउनि स्वर्गा सेवियलें ॥ १ ॥

पद ॥ ३२ ॥

( लोपविली बहुत शोभा या चालीवर.ताल–त्रिवट. )

आलस्यें सुवश झाला, निद्रेनें गांठिला ॥ मिष्टान्नें मत्त भारी अभिमानें माजला ॥ नृपतीचे भोग व्हावे, तनख्यातें धांवला ॥ श्रम केल्यावांचुनियां, न मिळे तो त्याजला ॥ १ ॥ जरी आशा वेतनाची तरि करणें नोकरी ॥ हयसेनेमाजि यावें, शस्त्र धरावें करीं ॥ तुज जें जें योग्य वाटे, कृत्यचि तें स्वीकरीं ॥ सांगातें त्यासि ऐसें चतुराक्षा लोकरी ॥ २ ॥

पद ॥ ३३ ॥

(राग–पिलू.ताल–त्रिवट. )

सुखकर होवो हरि सकलां ॥ दुर्बुद्धीचा लेश हरोनी सन्मति देवो भक्तांला ॥ ध्रु० दुःखार्णव हा दूर करोनी ॥ कंसांतक तो भवभयभंजन ॥ भग्न करो तो दुरिताला ॥ सुख० ॥ १ ॥

पद ॥ ३४ ॥

( अभिनव मधुलोलुप हें० या चा० ताल–दादरा. )

दिन दिन टपत अनिश परि मत्त ना कळे ॥ कपटपटुनीं घात जणु निरखिना कळे ॥ कपटिजनीं बुधजना विश्वास मावळे ॥ निपट अरिस मित्रवृंद दिसत ओंवळें ॥ चाल ॥ कुजनि उपेक्षा नलगे ॥ भिरुसि खलपाश लगे ॥ नृपसदनिं हें खळगे लोपवुनि त्वरित करूं याति वेगळे ॥ दिदि० ॥ १ ॥

पद ॥ ३५ ॥

( राग–आनंदभैरवी. ताल–धुमाळी. उद्धवा शांतवन क० या चा० )

अहा हा धन्य धन्य प्रसवे माता ॥ ऐशा सुगुणसुतातें ॥ ध्रु० ॥ कोण पुण्य भरले पदरीं ॥ पूजिलें कोण कुळदैवातें कोण माय

तपली तापें ॥ तोषला शंभु हृदयातें ॥ कोण भाव हृदयीं धरि-ला ॥ तोचि मूर्त उपजे हातें ॥ चाल० ॥ शौर्य धैर्य मनिं तरलें ॥ मन धाम वदनीं भरलें ॥ कीर्तिचें सदन लखलखलें ॥ पार नसे विजयातें ॥ १

पद ॥ ३६ ॥

(व्यर्थ–मी; जन्मलो–थों० याचा०)

हर हर काय दशा जाहाली ॥ जन्मुनि व्यर्थचि राजकुली ॥ध्रु० भृत्यजनांची वाणत सेवा मज न्हवती कसली ॥ परि दुर्दैवें पर सेवा मज लावुन केवि दिली ॥ स्वातंत्र्याचा लेश नसे मज ॥ दैवगति फिरली ॥ हर हर० ॥ १ ॥

पद ॥ ३७ ॥

(राग–काफी. ताल–त्रिवट. चाल–अनन्य शरण दिधा हरिला.)

नको जाउं ऐशा रणा, बाळका नको जाउं ऐशा रणा ॥ ध्रु० ॥ साहसकर्मी जीवितसंशय, तेंच फळित आपणा ॥ बाळका० ॥ १ ॥ तूं अभिमानें साहस करितां ॥ कोण करिल वारणा ॥ बाळका० ॥ २ ॥ अरिच्या सेना सकपट असती ॥ न चुकती पर मारणा ॥ बाळ० ॥ ३ ॥ त्या भीमातें स्मरतां वाटे ॥ पुरविल आपुल्या पणा ॥ बाळका० ॥ ४ ॥ जातों ह्मणसी तरि कां अ-मुची ॥ तूज नये करुणा ॥ बाळका० ॥ ५ ॥

पद ॥ ३८ ॥

(विठाबाई–माउली०याचा० ताल–धुमाळी.)

धांव पांव लौकरी ॥ तारिं मला येऊनि श्रीहरी ॥ ध्रु० ॥ पहा पहा मी बुडलें आहें ॥ महाशोकसागरीं ॥ तारिं० ॥ १ ॥ नको नको तव भगिनीचा हा ॥ अंत पाहुं अंतरिं० ॥ २ ॥ उपाय मजला कांहीं सुचेना ॥ काय करूं मी तरी ॥तारि०॥३॥

पद ॥ ३९ ॥

(शशिकुल–भूषणा.)याचा० ॥

सुखदायक माता मी ॥ वंदिन सुरसरितागीता ॥ ध्रु० ॥ कृष्ण मुखाब्जापासुनि झाली ॥ त्रैलोक्यातें व्यापुनि ठेली ॥ सु० ॥ १ ॥ पतीत पावन हे चिद्गंगा ॥ स्मरणें तारितसे भवसंगा ॥ सु० ॥ २ ॥ शोक मोह अनलातें शमवी ॥ जीवन्मुक्त पदीं जन ठेवी ॥ सु० ॥ ३ ॥

पद ॥ ४० ॥

(राग–कलत. ताल–दादरा. रत हरिपदकमलकंद या चालीवर.)

आर्यजननि वर्णु किति, सुजनिं तुझी ख्याती ॥ ध्रु० ॥ होतिस तूं प्रमुख तयीं, शौर्यबलारोग्यमयीं ॥ कुशलकलायुक्तमही, जोड दुजी नव्हती ॥ १ ॥ स्त्रीसुतादि सर्व सौख्य, अभिलाषुनि बसति मुख्य ॥ करिती आलस्य सख्य, श्रेष्ठ जगीं गणती ॥ २ ॥ गमवियलें वर्ण तेज, पामरांसि नाहीं लाज ॥ तुज दिधला म्लेंछराज, कार्य कसें करिती ॥ ३ ॥ वर्णुनि तंव शौर्य नीती, पुण्यविजय विमलकीर्ति ॥ नाट्य कळे माजि लिहिति, कर्मतुच्छ ह्मणती ॥ ४ ॥ नवरसांत जो असार, मृदु मधुर शृंगारसार ॥ छुमक मधुर वचन सार, येथ पूर्ण प्रीती ॥ आर्य० ॥ ॥५॥ अधुनिक इतिहास खरा, नीति बोधयुक्त बरा ॥ रम्य दिसो सजन वरां, हेचि अह्मां सुमती ॥ आर्य जननि वर्णु कीति० ॥ ६ ॥

* पद ॥ ४१ ॥

(साध्य नसे मुनि कन्या० ) या चालिवर.

सुंदरि आल्या पाहाया, घेउनि मंगलस्नानकशाया ॥ अंतःपुरिच्या चंचलनेत्रा ज्याचा खालीं पदर सरकतां ॥ पीन पुष्ट कुच उघडे दिसतां ॥ हेमकुसंमें मुही स्वीतां ॥ शोभे कैसी ऐशा समया ॥ १ ॥

पद ॥ ४२ ॥

( मजे हो कृष्ण मजी आपुला. या चालीवर. )

राजा दुर्योधन ऐसें ॥ वदतां ऐकुनीं उल्हासें ॥ भीष्म पितामह प्रभु तुमचा ॥ प्रतापदिनकर कुरुकुळीचा ॥ ध्रु० ॥ सिंहनाद तेणें केला ॥ उंचस्वरें करुनि वहिला ॥ राजा० ॥ १ ॥ प्रलय काल घन गडगडीला ॥ शंख तयापरि वाजविला॥राजा०॥ २ ॥ जीवन्मुक्त गुरु हरिपायीं॥लीन विरक्त सदां विषयीं ॥ राजा०॥३॥

पद ॥ ४३ ॥

( ताल–दादरा. दिलछीन लिये या चा० )

वैशाख मासिं वासंतिक समय शोभला ॥ आम्रासव पिवुनि गान करिति कोकिला ॥ ध्रु० ॥ या जाइ जुई मोगरिला बहर तो आला ॥ गुंजारव करण्यांत गुंग मधुप जाहला ॥ नव पल्लव ते फुटति सकल वृक्षगणाला ॥ कुसुमगंधयुक्तमंद वात सुटला ॥ वै० ॥ १ ॥ अति थंडगार चंदनाची उटी लावुनी ॥ वर जाती पुष्प धवलहार कंठिं घालुनी ॥ रमतात युवति चांदण्यांत पतिस घेउनीं ॥ लोकां शीतोपचार इष्ट वाटला ॥ वै० ॥ २ ॥ नगरांत लग्न मंडपांचि दाटि जाहली ॥ नर नारी बसुनि विथींत मिरवीत चालली ॥ बहु वाद्य गजर दुमदुमुनी गर्दि उसळली ॥ दक्षिणार्थ भिक्षुकगण पळत सुटला ॥ वै० ॥ ३ ॥

* पद ॥ ४४ ॥

[ ताल–दादरा. केलीस अशि काय परिक्षा सखे गे० या चा० ]

मी पाळिन चरणीं तुह्मां नित्य तिघांला ॥ धरुनि वदनि ईश नाम सुजनिं हो भला ॥ ध्रु० ॥ आजवरी कवण तुह्मां नाथ मिळाला ॥ परि जडली हे त्रिदशा आजि कपाळा ॥ १ ॥ दुःख सुख क्रम जडतो एक जिवाला ॥ शांति समज उमजुनि द्या सौख्य मनाला ॥२ ॥

पद ॥ ४५ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी.)

धन्य धन्य धन्य ती माय कौसल्या ॥ ध्रु० ॥ प्रेमें बोले वरदधुरीण ॥ आइ मज विषयीं बहु शीण ॥ केलें जन्मांतरि तें रीण ॥ येणें वीण फेडु कसें ॥ धन्य० ॥ १ ॥ केले जरि कां नाना व्याप ॥ तरि हें मद्दर्शन दुष्प्राप ॥ एक मद्भक्तचि ते निष्पाप ॥ पाहुनि ताप विस्मरती ॥ धन्य० ॥ २ ॥ मजविण न रुचे अन्य जयांस ॥ ऐसे माझे विशुद्धदास ॥ त्याची पुरवितसे मी आस ॥ हें तों खास व्रत माझें ॥ धन्य० ॥ ३ ॥ ऐसें बोलुनियां सुरमणी ॥ झाला शिशुसा हो तत्क्षणीं ॥ विठ्ठलपंत कवीचा धणी ॥ मंदस्वनीं रडूं लागे ॥ धन्य० ॥

### पद ॥ ४६ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. ]

अनाथ मी या घोर अरण्यीं काय करूं बाळा ॥ कोठें जाऊं कोठें राहूं न सुचे हें मजला ॥ ध्रु० ॥ निष्ठुर तूंही होउनी आजी अपुले जननीला ॥ व्याघ्र मुखीं तूं देउनि जासी योग्य नसे तुजला ॥ अनाथ मी० ॥ ३ ॥

### पद ॥ ४७ ॥

( राग–भूपकल्याण )

अंबरीं दहा अतीव फेकुनी बुका ॥ दाट अंधकार मातला वसंतका ॥ ध्रु० ॥ त्यांत हीरकादि भूषण प्रभा पडे ॥ दीसती अशांत हे भुजंग फांकडे ॥ शृंगकें फणाकृती धरिति यांकडे ॥ पाहतां स्मरेचि नागलोक हा निकां ॥ १ ॥ अंबरीं ॥

### पद ॥ ४८ ॥

( राग–कल्याण. ताल–धुमाळी. )

बन्सी तु कवन गुमान भरी ॥ ध्रु० ॥ आपने तनपर छेदपरं ये ॥ बालाते बिछरी ॥ १ ॥ जात पात हुतोरी मय जानुं ॥ तूं बनकी

ल्करी ॥ २ ॥ मीराके प्रभु गिरधरनागर ॥ राधासे झगरी ॥ बन्सी० ॥ ३ ॥

पद ॥ ८९ ॥

( राग—बहिरवी-ताल—त्रिवट. )

मोरी आंग नमो मुरली बजावेरे ॥ खिलावना देवगी ॥ ध्रु० ॥ नाच नाच मोरे मनमोहन ॥ मधुर गीत सुनांवगी ॥ १ ॥ मीराकेप्रभु गिरिधरनागर हरिके चरन बल जाऊंगी ॥ २ ॥

पद ॥ ९० ॥

( राग—जोगी. ताल—धुमाळ. चाल—माझा कृष्ण देखिला काय. )

माझें मूल आढळलें काय ॥ स्वामी सांगाहो ध्रु० ॥ चित्तीं वाटतसे हळहळ ॥ अंकीं बैसाया हें बाळ ॥ त्याची केलि असे हेबाळ ॥ मी चांडाळ काय किती ॥ माझें ॥ १ ॥ अंगीं ल्हानसें अंबडे ॥ माथा शोभतसें टोपडें ॥ गेलें रडत रडत बापडें ॥ देवा मजकडे पहा तरी ॥ २ ॥ मा० ॥ कैसा काय निघोनी जाय॥ नीलोत्पलदलकोमल पाय ॥ सर्व जन करिती हायहाय॥न सुचेउपाय काय करूं ॥ ३ ॥ माझें० ॥ नारद ह्मणें नृपा धरिं धीर ॥ पुशि या निज नयनाचें नीर ॥ विठ्ठलपंत प्रभु रघुवीर ॥ कृपा करील त्यावरती ॥ ४ ॥ माझें० ॥

पद ॥ ९१ ॥

(राग—शंकराभरण ताल—धुमाळी.)

पार्थसुताला द्यावी ऐसें येत होतें मनीं ॥ परि पांडव ते राज्य द्रव्यहिन असुनी असती वनीं ॥ ध्रु० ॥ कोणी जावें घोर वना त्या त्याना धुंडाया ॥ ह्मणूनी द्यावी मला वाटतें कुरुपतिचे तनया ॥ त्यासम नाही सुस्थळ दुसरें द्याया निज कन्या ॥ कार्य चांगलें सहज होईल आयासावांचुनी ॥ पार्थ० ॥ १ ॥

पद ॥ ९२ ॥

[ राग—जोगी, ताल—धुमाळी, चाल—मजला वरिल सुभद्रा काय.]

भीमा आतांचि कां रे रोष ॥ केला मजवरती ॥ भीमा० ॥ ध्रु० ॥ पहिल्यापासुनि माझा मान ॥ कां तूं करितोसी अवमान ॥ प्यालों मातेचें मी थान ॥ त्याचें पान केलें त्वां ॥ भीमा० ॥ १ ॥ आधीं म्या रस चाखावें ॥ पिउनि उरले तें त्वां प्यावें ॥ तेणें संतोषा मानावें ॥ तृप्त व्हावें निजचित्तीं ॥ भीमा० ॥ २ ॥ यज्ञामध्यें हेंचि विधान ॥ केलें सोमाचें आदान ॥ मागुनि केलें तुवां पान ॥ त्याचें भान नाहीं कां ॥ भीमा० ॥ ३ ॥ आतां पर कोकीचें जळ ॥ पिसिल एकटाचि केवळ ॥ कैसी नाहीं तुज हळहळ ॥ मी तळमळ करितों कीं ॥ भीमा० ॥ ४ ॥

पद ॥ ९३ ॥

( राग—पिलु. ता० धुमाळी. )

आजि शेवटचा लाभचि हा ममतेचा ॥ मज होय तुमच्या करिंचा ॥ बहु दावियलें प्रेम निरंतर आपुलें ॥ कधिं नाहीं अंतर पडलें ॥ प्रतिदिवशीं कोमलकरिंची ॥ वेणी फणी आतां कैची ॥ त्या आशेचा लेश न उरला साचा ॥ शोक न आवरे मनिंचा ॥ १ ॥

पद ॥ ९४ ॥

( राग—बिभास ताल—त्रिवट. )

स्वप्न असे कीं इंद्रजाल हें ॥ न कळे मज कांहीं ॥ प्रिये गे ॥ ध्रु० ॥ पेटत होता अग्नि ह्यास्थळीं ॥ गेला कोठें तो या वेळीं ॥ १ ॥ अंतःपुर हें दिसतें जवळीं ॥ यथास्थितचि पाही प्रिये गे ॥ २ ॥

॥ पद ९५ ॥

( राग—भूप. ताल—धुमाळी. )

शुभ्र वसनें नेसून बैसली, संचित होऊनी ॥ मम विरहानें व्याकुळ, झाली घर्मबिंदु वदनीं ॥ ध्रु० ॥ पुष्प जेविं कोमेजून जातें दिनकरतापानें ॥ तेवि दिसे मुखइंदु सखीचा, अतितर दुःखानें ॥ मत्पदकमळीं चित्त लावुनि, समाधि लावियली ॥ मानसपूजा अर्पितसे मज, मूर्ति हृदयीं ठसवियली ॥ शुभ्र० ॥ १ ॥

पद ॥ ९६ ॥

( अष्टपदीचे चालीवर, )

शंकरेशान शशिचूड शितिकंठ शिव शर्व शाश्वत शरण्येश शंभो ॥ ध्रु० ॥ भाललोचन भुजगंभसितंभूषण भवानीश भवभीतिहर भद्रभजना ॥ गरलगल गुहंगजाननतात गोवाहं गीर्वाणगण-गीत गुणभाजना ॥ १ ॥ निगमनुत नीरदाभ निधिनाथनत नग नंदिनीनयननलिनाग्नि ॥ विष्णुविधिवंद्य विख्यातवैभव वि-श्ववरद वासवविहतविनतविघ्ना ॥ २ ॥ दोषदरदैन्यदवदाव दितदुष्टबलदमदुर्दर्शदयमानांतरा ॥ मुनिमहित मोदमय मदन-मर्दन मयूरेश्वरमनोमीनमत्स्याकरा ॥ ३ ॥

पद ॥ ९७ ॥

( राग—बिभास. ताल—त्रिवट. )

राम राजीवदलनयन रघुवीर रविवंशभूषणरत्न रावणारे ॥ ध्रु० ॥ वातनंदनमनःकांतकरचरणजलजात कुशतात कारुण्यसिंधो ॥ शातकुंभाभपट पातकापह धरणिजातपःफल दीनबंधो ॥ १ ॥ चापनिगमातंग गमासदापदपहाररत तापसाराध्यपद पूण्यमूर्ते ॥ क्ष्मापवर कुसुरवनितापवादाघसंतापभंजन भुवनगीतकीर्ते ॥ २ ॥ रक्षसामंतचतुर क्षमापालनपर क्षपानाथ जितवदनकांते ॥ रक्ष रामंजमुदार क्षमादिगुणनिकरक्षय स्मृतिरस्तु मयि तवांते ॥ ३ ॥

---

१ भसित—भस्म. २ गुह—कार्तिकस्वामी. ३ गोवाह—वृषभवाहन. ४ गी-र्वाण—देव. ५ निगम—नुत—वेदस्तुत. ६ नगनंदिनी—पर्वतकन्या.

१शातकुंभाभपट—झांतलेल्या सुवर्ण घटासारखी शोभा आहे वस्त्राची ज्याच्या. २ चापनिगम—धनुर्वेद. ३ क्ष्मापवर—राजश्रेष्ठ. ४ कुसुर—भूसुर ( गौ-तम ) ५ क्षपानाथ—चंद्र. ६ रामजं—रामनंदनं ( मयूरं ] ६ निकरक्षयं—समूह-स्थानं ( निकर×क्षय ]

पद ॥ ५८ ॥

( राग,ताल,वरच्यापदाप्रमाणें. )

नंदनंदन नंदयानंदकंद सुखकंद कंदर्पदर्पोपहास्या ॥ ध्रु० ॥ दीन मतिहीन पदलीन जलमीन जळपीनभुज वीनेरथ सर्वभूपा ॥ दुग्धघटभुग्धरणिघृग्धरणदग्धसुविदग्ध मलादिग्धवपु मुग्धरूपा ॥१॥ अभ्रनिभ विभ्रमणशुभ्रगुण विभ्रमननदादभ्रकरुण भ्रमविनाशदक्षा ॥ कामजनकामलसुधामय भवामयहरामरपरामसुतकल्पवृक्षा ॥ २ ॥

पद ॥ ५९ ॥

( राग-भैरवी. ताल-त्रिवट. )

रघुवीरा रामा तूं हितकारी ॥ ध्रु० ॥ तुजवांचुनि भवपारावारीं॥ कोणी अन्य न तारी ॥ १ ॥ उद्धरिली पदपद्मरजें जी ॥ शापशिळा मुनिनारी ॥ २ ॥ वधिले राक्षस लीलेनें जे ॥ वज्रधरासहि भारी॥३॥दिव्यविमानीं वाहुनि नेली॥स्वपदीं नगरी सारी॥४ भक्तमयूर मनस्तापातें ॥ त्वद्गुणवारिद वारी ॥ ५ रघुवीरा ॥

पद ॥ ६० ॥

( राग-यमनकल्याण. ताल-धुमाळी. चाल-सगुण माया आलि कोलाटिन० )

असा धरि छंद, जाय तुटोनि हा भवबंध॥ध्रु०॥छंद लागला टिटवीला तिनें समुद्रही आटवीला ॥ मैनावतिनें कृतार्थ केला ॥ गोपीचंद ॥ जाय तुटोनि हा भवबंद असा० ॥ १ ॥ दुधाचा सागर उपमन्यूला ॥ अढळपदावर तो ध्रुव बसला ॥ मार्कंडेयें यम हटवीला ॥ झाला मंद ॥ जाय तुटोनि०॥ असा धरी ॥ २॥ झाले तीन देह भरताला ॥ रा.ण रामरूप तो झाला ॥ गोपी चढल्या वैकुंठाला ॥ यशोदानंद ॥ जायतुटोनि०॥असा धरी ॥३ अळिस भ्रमराचा हा ध्यास ॥ होता भ्रमरपणा ये तीस ॥ तैसा सोडुनी जीवपणास॥भोगि आनंदा ॥ जाय तुटोनि०॥असा॥ ४॥

१ गरुडवाहन. २ धरणिधृग्धर=पर्वतधारी. ३ मातीनें भरलें आहे अंग ज्याचें असा. ४ मुग्ध=सुंदर. ५ भवामय=भवरोग.

निश्चय०॥ जग०॥२॥ऐसे वेडे छंदचि धरितां॥तरि शेवटिं फसला ॥ समजा ॥ तरि० ॥ जग० ॥ ३ ॥

पद ॥ ६९ ॥

( राग– खमाज. ताल–त्रिवट. )

उगवला सुदिन आजि जणुं खास ॥ पाहुनियां तव रम्य वनास ॥ ध्रु० घडला सुकृतें संतसमागम ॥ नाहीं पार सुखास ॥ उग० ॥ १ ॥ अशना योग्य हीं ऋषिधान्यें॥ असती मुनी जनास ॥ ॥ उग० ॥ २ ॥ बघुनि तव ह्या फलमूलांतें ॥ होतो हर्ष मनास ॥ उग वला० ॥ ३ ॥

पद ॥ ७० ॥

(ताल–दादरा.नर तनु हे मज्हे सार्थ ममता क०या चा०)

फिरत पाहत घोरवनीं माळनी स्त्रियेला ॥ ध्रु० ॥ केलें बहु सहन कष्ट ॥ परी अंतरीं मी न तुष्ट॥ विरहज्वर हाचि दुष्ट ॥ जाचि तोतनुला ॥ १ ॥ आलों नृपनगरीं या मी ॥ कांचनी सह यामी यामी ॥ रतलों ह्मणुनि तिचा ॥ स्वामी अती त्रास त्रासला ॥ २ ॥

*पद ॥ ७१ ॥

(ताल–दादरा. काय मला भूल पडली. या चा०)

दोहीं मात्र मंगल तीं भूषणें धरीं, कष्ट जिला होति बहुत बोलते परी ॥ ध्रु० ॥ तेजरहित वदन तिचें जाहलें जरी ॥ प्रातःशशिकांतिस ते जिंकिते तरी ॥ जी पतिसंगार्थ असे फार आतुरी ॥ आचरुनि व्रतें कशा झाली सुंदरी ॥ प्रेमांकुर उद्भवला जिच्या स्वांतरी ॥ बघण्या तिज होइ माझि दृष्टि घाबरी ॥१॥

पद ॥ ७२ ॥

( राग–हमीर ता० त्रिवट. )

तापद गृह झालें ॥ मज हें, तापद गृह झालें ॥ ध्रु० ॥ अर्थ

हीन भी झालों म्हणुनी ॥ मित्रजनांही त्यजिलें ॥ मज हें० ॥ वृद्धकरीकट सोडिती भुंगे ॥ मित्रा तैसें घडलें ॥ मज हें०॥ १ ॥

पद ॥ ७३ ॥

(जो करितुष्ट–विरीमाळा. बाघा० )

गमतो सत्याचि वंडावा ॥ प्रभुजी दुर्मति दंडावा ॥ ध्रु० ॥ संचिविलें।कीति अहिताची ॥ नुघडे बुद्धिहि कुमताची ॥शक्तिमदान्वित तोडावा ॥ प्रभु० १ ॥ अजांहि अपमानी वाटे॥ बघतां वक्षः स्थळ फाटे ॥ पदिंचा कटंक खोडावा ॥ प्रभुजी० ॥ २ ॥

पद ॥ ७४ ॥ ✓

(माझ्या–बाळा. रघुवीरा–वनासी. जाऊं–नको. )॥ था०

कां रे दैवा तनयाला॥विपरित काळ आला ॥ ध्रु० ॥ करुनि विरांचा अवघा साज ॥ नसतां भेटीविरहित काज ॥ आला होतां सदनीं आज ॥ वाटे चोज कीं मजला ॥ १ ॥बाळक शौर्यें अति अनिवार ॥ पाहिला पूर्ण नसें संसार ॥ अजुनि ओंठावरचा जार ॥ नाहीं फार वा सुकला ॥ २ ॥ पिता नोहें केवळ काळ ॥ येणें गिळिला आपुला बाळ ॥ कहीं दिशा शुन्य त्रिकाळ ॥ झाल्या बोल नशिबाला ॥ ३ ॥ भाजत असतां नाजुक काय ॥ हाका मारित अससिल माय ॥ आतां सखया करूं तरि काय ॥ ह्यास उपाय सांग मला ॥ ४ ॥ प्रभेला हें वृत्त निवांत ॥ सांग जातो गे तव कांत ॥ फार करिल हो ती आकांत ॥ होईल अंत घटकेला ॥ ५ ॥

पद ॥ ७५ ॥

(झालों–निर्दय. मीं कैसा. ) य. बाळीवर. )

व्यर्थ कसा म्यां छळियेला ॥ ऐशा वीर सुधन्व्याला ॥ ध्रु० ॥ सत्कुळ ब्राह्मण मीं असता ॥ वेदाभ्यासानें रमतां ॥ हरिभक्ती

विण नारि आनां ॥ मजला कोण असे त्राता ॥ भक्तिबळीनें हा तरला ॥ पावन केलें वंशाला ॥ १ ॥

पद ॥ ७६ ॥

(राग–खमाज. ताल–त्रिवट.)

साधुंच्या अंतरंग गोष्टी अकपट मे एकरूप असती ॥ ध्रु ॥ विनययुक्त अनिगोड वाणि ही ॥ प्रीति सदोदित ज्यांच्यां चित्तीं ॥ सा० ॥ १ ॥ किमपि नसेची भेद परिचया कल्याणप्रद ज्याची सुमती ॥ सा० ॥ २ ॥ मागें अथवा पुढेंहि प्रेमीं ॥विपर्यास मनिं ज्याच्या नसती ॥ सा० ॥ ३ ॥

पद ॥ ७७ ॥

(राग–कालंगडा. ताल–झुमाळी. चाल–भक्तासाठीं तो जगजेठी.)

मर्यादेपरी भूषण दुसरें कांहीं स्त्रियांशीं नसे ॥ धन्य ती जीच्या मनि हें वसें ॥सर्व सुखाचें मूळ स्वपती जिस वाटे सदां अंतरीं॥ जन्मली साध्वी ती एक खरी ॥ फिरती मर्यादा सोडूनी ॥ धरुनी स्त्रीच्या करा ॥ ह्मणति इतराशी तुह्मी हें करा ॥ स्त्रीशिक्षण हें नविन प्रतीचे टाकुनि उमजा जरा ॥ भगिनिनों ! मर्यादा ती धरा ॥ वाडवडिलां चरणीं नेहेमीं पूज्यबुद्धि ती असों ॥ मार्ग हा तुमच्या हृदयीं वसो ॥ सुंदर वस्त्रालंकारामधीं स्त्रीचें भूषण नसें ॥ धन्य ती जिच्या मनीं हें वसे ॥ १ ॥

पद ॥ ७८ ॥

(जाते कीं मम शकुंतला ही. या चालीचें.)

कमलगर्भसम कोमलतनु तीं नवदर्शनकालीं ॥ प्रीतिभरानें कंठालिंगन देतां मन्मय झाली ॥ ध्रु० ॥ तत्क्षणिं कामें मज मारुनि शर छिद्रें पाडियलीं ॥त्यांतुनि जणुं मम हृदयीं प्रमदा आहे शिरलेली ॥ १ ॥

पद ॥ ७९ ॥

(राग–बेहाग. ताल–त्रिवट.)

रामा नवल कसें बघ हें ॥ कसा मोर हा छुम छुम नाचे ॥ रामा० ॥ ध्रु० ॥ ज्याचे नूतन चित्रविचित्रचि दिसती ॥ पंख अहा हे ॥ क० ॥ १ ॥ किति तरि सुंदर गुच्छ शिरीं हा ॥ ज्याच्या शोभत आहे ॥क०॥ २ ॥ कदंबावरी बसुनी प्रियेला ॥ रंजवी जो रति मोहें ॥ क० ॥ ३ ॥

पद ॥ ८० ॥

( चाल–साकीची. ताल–धुमाळी. )

भ्रू भंगावर घर्मबिंदु हे उद्भवले ज्यावर ते ॥ फार भयंकर मुख कोपानें त्रस्त दुजें दिसतें तें ॥ चंचलता भरली ज्याच्या पूर्ण नेत्र-कमलीं ॥ १ ॥ उडत भृंगीच्या लोलदृष्टितुनि वाटे किती ह-रिली ॥ मुखद्वयानें ऐशा पाहुनि मति गुंगुनियां गेली ॥ भीतो-त्सुख झालों ॥ मी संकटांत पडलों ॥ २ ॥

* पद ॥ ८१ ॥

( बायानों या सोडोनी. या चालीवर. )

कटि तटि मेखला पायीं नुपुरें शब्द करिताती ॥ जे रम्यहार कंठी ते शोभेस कुचाला देती ॥ भूषणें बाजुबंदादी बाहुस भू-षविताती॥हीं कर्णभूषणें कानिं कंक ा करि घालोनी॥ केशांत फुलें माळोनी, दासीगण जमला पाहीं ॥ रम्यता उणी ज्या नाहीं ॥ करि० २ ॥

पद ॥८२ ॥

( राग–भूपकल्याण. ताल–दादरा. )

किती गती बलद याची, फिरतसे धरुनि श्वेतधनुष्य भानु हा ॥ कीर्ण फार प्रखर पडत, धामाधुम सर्व होत ॥ वरचेवर वर्षि पुसत ॥ कैसें निजमुख पहा० ॥ किती० ॥ १ ॥ पक्षी ते तरु-वरातें बसत ॥ छत्रें शिरिं जनसमूह घेत ॥ उद्योगी रत सकल होतकरिती सतत श्रम महा ॥ किती० ॥ २ ॥

धूलिमिश्र पवन वाहात ॥ प्रखर उष्ण त्रासवीत॥ धनवाणी दीन फिरत ॥ निर्धन ही स्थिति ॥ अहा किती० ॥ ३ ॥

पद ॥ ८३ ॥

( मृगजळवत जग उद्भवले हें ही चाल )

भृकुटि चढविल्या देवीनें त्या न दिसाव्या मजला ॥ म्हणुनि तियेनें खालीं अतिशय केलें वदनाला ॥ ध्रु० ॥ हृदया लागे अंशि हसली तरि कठोर ना वदली ॥ बाष्पजलांनीं अतिशय तींचीं नयनें बुडबुडलीं ॥ चाल ॥ तीं दिसतिल यास्तव न वटारलीं सतिनें ॥ अशीं बहुत लक्षणें कथूं किती वदनें॥कोप असा जरी दाविंयेला मज सखिनें॥चाल० प० ॥परि प्रियेनें न सोडिलेंरे अपुल्या विनयाला ॥ भृकुटि० ॥ २

पद ॥ ८४ ॥

( जळभरन जात जमुनाके. या चालीवर. )

जाण मयुरिके त्याच प्रियाला ॥ भव्य कपाळीं तिलक रेखिला ॥ ध्रु० ॥ मुख चंद्राकृति सरल नासिका ॥ सड पातळ तनु पाहासि सख्याला ॥१॥ वृत्त सांगुनि प्रार्थुनि आणी ॥ तारक तूंचि या दासीला ॥ जाण० ॥ २ ॥

पद ॥ ८५ ॥

( राग–आनंदभैरवी. ताल–दीपचंदी. )

जें कर्म कनकमृगरूप धरोनी ॥ मारिचें आचरिलें ॥ सद्यःक्लसें वाटे मजला ॥ जरि तें दुःसह गेलें गतलें ॥ ध्रु० ॥ ज १ थानीं जीं केलीं रामें ॥ असती विलापचरितें ॥ तीं ऐकुनी पाषाणहि रडते वज्रहृदय हो तिळ तिळ तुटलें॥ जें कर्म० ॥१॥

पद ॥ ८६ ॥

( राग–पिलु ताल–धुमाळी. )

स्वर्मीं न कधीं परस्परांचा योग वियोगाचा ॥ सखेग ॥ परि

दुर्दैवें प्रगटुनि करितो छळ कसा आमुचा अहा। होतसे दीर्घ वियोगें ॥ दुभंग हृदयाचा ॥ सखेग ॥ असो पहा तें क्षणभर प्रेमें मुखेंदु मी त्यांचा ॥ स्व० ॥ १ ॥

पद ॥ ८७ ॥

( राग–मुलतानी. ताल–धुमाळी. )

सुरमुनि नारद वदे शिवासीं, द्रव्यहीन जे पती ॥ त्यासीं कांता न मानिती ॥ ध्रु० ॥ वैभव ज्यांचें थोर असे त्यां लुब्ध होति त्यांवरी ॥ देती ठाव त्यांस अंतरीं ॥ द्रव्याभावें दीन होऊनी ॥ झाला जो रोडका ॥ मानिती त्यासीं ..ट्र दोडका ॥ नाहीं वैभव देवा तुजला ह्मणवुनि तूं सोसिशी ॥ कांतावचनें निष्ठुर अशीं ॥ १ ॥

पद ॥ ८८ ॥

( राग–खमाज. ताल–त्रिवट. )

वेशा कर्मा उचित नसे तें ॥ वसंतसेनें वदसी कैसें ॥ ध्रु० ॥ वापि नांव लता उपभोगिती ॥ नृप द्विज शूद्र खगादिक जैसें तैसी गणिका सकलजनांला ॥ उपभोगाया योग्यची असे ॥ १॥

पद ॥ ८९ ॥

( या विरहा कां भीसी ग चालीवर. )

पतिचरणांबुज सेवा ॥ पतिपदसेवन, पतिमुखदर्शन, भक्ति पदीं दृढ ठेवा ॥ अजिहो० ॥ ध्रु० ॥ पति सुविचारें वागविणें मति, कोप मनांत सहावा ॥ निजपतिचा सन्मान राखणें, धर्म असाचि पाहवा ॥ अजिहो० ॥ १ ॥ चिंता पतिपद तनुमनवचनें, दंभ मनांत नसावा॥ संकट पडतां अवधि पतिच्या, छ्या चरणांबुजा धावा ॥ अजिहो० ॥ २ ॥

पद ॥ ९० ॥

( राग–कालंगडा. ताल–धुमाळी. चाल–भाइ नाम रामसे जादा भाईना. )

सब लोकनके अघरि होकर॥सात नही संतनकी ॥ सुरत मुरत तेरी खुब बनीहै ॥ किरपा मुतनाथनकी ॥ १॥ संपत दो दीनमें ॥ जानबी डुब जानी जलमें ॥ ध्रु० ॥ संपत, औरत बुत लोक सब ॥ कारण कारण आवे ॥ गौरीनाथ कहो कोय बिना ॥ कुच एक पलाखन जावे ॥ संपत० ॥ २ ॥ राजपाटकी रहा तुमारी ॥ सबसे जादी ठेरी ॥ ग्यानदीप अजु तेरे मनमें ॥ और केरगा फेरी ॥ बच्या दोदिनकी दुनया जानो डुब नेकी॥३ ॥

पद ॥ ९१ ॥

( राग–शंकराभरण. ताल–झंपा चाल–प्रबंध. )

सती साध्वि राष्ट्रांतुनी स्वर्गि गेली ॥ जिच्यासारखी सुंदर नाहिं झाली ॥ ध्रु० ॥ आजवरि पाहिल्या राजकलना बहू ॥ परी न मी बघितली ऐशि धन्या॥ तोषविलें आझां पोषिलें दीनजन ॥ सद्‌गुणी पुतळी कोणी नेली ॥ थोर राष्ट्राची स्वामीण होती तरी ॥ गर्व स्वप्नीं नसे ज्या जननिला ॥ क्रोध मद मत्सरा ठाव कधिं देई ॥ निज देईना मग कशी रुष्ट झाली ॥ नागरिक जन पहा ढळढळां रडति हे ॥ गुणगणा स्मरुनियां सर्व तिच्या ॥ परम भाग्योदयेची प्रजा माउली ॥ दीनजनसाउली आजि सरली ॥ सती० ॥ १ ॥

पद ॥ ९२ ॥

( राग–मुलतानी. ताल–धुमाळी.)

निर्धनता ही नराला ॥ मित्रा बहु दुःस्सह होते ॥ ध्रु० गेहचि ही चिंतेचें ॥ वैरजनीं दुसरेची ॥ कारण वा निजद्वेषा ॥ विषवल्लिच निंदेची ॥ जायाबुद्धि वनादे ॥ अप्रीति होय प्रियेची ॥ चाल ॥ म्हणतां दीन तयाला ॥ निर्वेद येई मनाला ॥ शोकाग्नी सर्व तनूला ॥ देई संतापातें ॥ नि० ॥ १ ॥

## पद ॥ ९३ ॥

[ राग—जोगी. ताल—धुमाळी. ]

रामा या तव निर्दयकृत्यें काय वदूं तुजसीं ॥ दावुनि प्रेमा बहुत कसें तूं त्यजिलेंस तीजसीं. ध्रु० ॥ हृदय जीव तूं सुधाचंद्रिका विश्रांती मजसीं ॥ यापरि तिजला वदुनी मोहीं जो तूं गुंतविसी ॥ रामा० ॥ १ ॥

## * पद ॥ ९४ ॥

( बलसागर. या चालीवर. )

भोगी नरपति विपदा झाला वियोग मित्रजनीं ॥ मुकुनि घराला दुर्मार्गे मी फिरतों खिन्नवनीं ॥ फलें सर्व या जीवित्वाची विषवत्‌ही असुनी ॥ विधिनें मज तों आस्वादाया दिधलें लावोनी ॥ १ ॥

## पद ॥ ९५ ॥

( समज धर कांहीं, या चालीवर )

देवा अतिमानें ॥ बाहसी तूं तिजशीं ॥ परि ती मनी न वचनासीं ॥ करीते चेष्टा ॥ निर्धन तूं ह्मणुनी ॥ होईल अपकीर्ती भुवनीं ॥ ज्यागृहीं बळरे ॥ वाढे कांतेचें ॥ तेथें तुच्छ वचन पतिचें ॥ तयानें जावें ॥ जावें विपिनासीं ॥ परत न यावें सदनासीं ॥ १ ॥

## पद ॥ ९६ ॥

(राग—पिलु. ताल—दादरा.भजभजभज वभजलधी मानि.गनुजा शिवाला चाल०)

शंखलिखित वदति काय ॥ हंसध्वजाला ध्रु० ॥ मौन्य धरुनि बैसलास ॥ प्रतिज्ञेस विसरलास ॥ कुमार्गास प्रवर्तलास ॥ स्मर रे कुळाला ॥ १ ॥ पुत्र मोहीं गुंतलास ॥ इतर जना दंडितोस ॥ दंड करी सुधन्व्यास ॥ कळवी जनांला ॥ २ ॥ विषयसक्त ह्मणुन तरीं ॥ स्त्रीयेसह विलास करी ॥ पितृवचन भंग करी ॥ मिळुनि रणाला ॥ ३ ॥ हरिश्चन्द्र ब्रह्मदास ॥ अर्पि राज्य कौशि-

कास ॥ दिलें वचन पुरविण्यांस ॥ नाहीं चूकला ॥ ४ ॥ सूर्य वंशीं दशरथास ॥ रामचंद्र पुत्र त्यास ॥ धाडियला कां वनास ॥ त्यजुनि मोहे जाला ॥ ५ ॥

पद ॥ १७ ॥

( राग–जोगी. )

आलीस विपिनिं मृगयेला ॥ सखये मज संगें ॥ ध्रु० ॥ निशा पती जो माध्यानीं ॥ आला नव्हतां तो शयनीं ॥ स्वस्थ मी पडलों तूं चांदणीं ॥ गगनीं दृष्टी ठेविली ॥ १ ॥ व्याघ्रें करण्या प्राणांता ॥ यत्न कीं केला अवचिता ॥ परि तूं सावध एकांता॥ होतीस कांना तूंची प्रिया ॥ २ ॥

पद ॥ १८ ॥

( चाल–लावणीची ताल–धुमाळी. )

सौमित्रासी कपटसुंदरा विनवी नानापरी ॥ परी तो रामचि दृढ मनीं धरी ॥ ध्रु० ॥ वचन ऐकुनी शूर्पनखेचें लक्ष्मण बोले तिला ॥ वडिल तो राघव आहे मला ॥ दास मी त्याचा वरूनि मजला काय जोडिसी फळा ॥ वंदिन त्याच्या मी चरणाला ॥ चाल ॥ तो रामचि केवळ भक्तांचा गे मणी ॥ तो सोडिल सीता योग्य नसे यामिनि ॥ करि सौख्य भोग मग अखंड दिनयामिनी ॥ मीच पाहिजे आग्रह ऐसा खुण आण जा तरी ॥ तयाची आज्ञा वंदिन शिरीं ॥ सौमि० ॥ १ ॥ कपटमती मग ह्मणें अंतरी गोष्ट जहाली बरी ॥ तिघांला भक्षुन जावें घरी ॥ तेथुनि आले श्रीरामातें प्रणिपात ती करी ॥ लीनता दाखवि बहु अंतरीं ॥ ह्मणें भावोजी निजबंधुची करा मला नोवरी ॥ तयाला सेविन मी परोपरी ॥ चा० ॥ ते न वरिती मजला तुमचे आज्ञेविणें ॥ मी वश जाहालें आजि तयांच्या गुणें॥ कशि दया येइना दैवाचि माझें उणें ॥ मी कर्णकुमारी राजकन्या कुलीन आहे खरी ॥ वराया झा-

लें मी घाबरी ॥ सौ० ॥२॥ बोलुनि ऐसें रघूत्तमाला मग जानकिला पुसे॥बाई तुह्मी कां वदाना कसें॥था कीं हो पत्रची तें मजला मी वराया जातसे॥आतां मी तुमचो॥जाऊ असें॥चाल॥ द्या हिला ह्मुण सत्वर॥हा लक्ष्मण इला योग्य असे हो वर ॥ करि राम परिक्षा जाणे सर्वांतर ॥ ह्मणे राक्षसीण आलि छळाया ॥ शिक्षा करणें बरी लिहुनी तीचे पाठीवरी ॥ सौ० ॥ ३ ॥ करुनि लखना राम ह्मणें त्वां जावें सत्वर आतां॥जाहालें कार्य तुझें तत्वतां ॥ तेथुनि आली लक्ष्मणातें उशिर कांहो लाविनां॥ दि लीखुण भावोजीनिं मागतां ॥ चाल० ॥ कां शरम धरितां सत्वर मजला वरा ॥ विधि गंधर्वेचि विवाह हा बरा ॥ तुह्मीं चला गृहा प्रति धरुनि माझिया करा ॥ गोविंदासी तो मनि दाना विद्रूप निजला करी ॥ कीर्तिनें त्रैलोक्यानें भरी ॥ ४

## पद ॥ ९९ ॥

( धनद्रव्याला नाहीं निवंता या चालीवर. )

सत्यपांडधनी दयार्णवा हे ॥ अनादि दीनपाळा ॥ व्योम घटीं तूं व्यापक असशी ॥ निरंजना जगपाळा ॥ १ ॥ इंद्र चंद्र विधी रवि परि जन ॥ ते तव पदीं तल्लीन असती ॥ पूर्ण परायण सेवूनि तैसे पामर हे वर्तती ॥ २ ॥ वात पयोधर पावक पाशी निशीदिनीं तव आज्ञेला ॥ मान्य करोनि चालतीं देवा आवरीं त्या भूताला ॥ ३ ॥ खदरन सागर दिसे आह्मांसी मार्ग नसे मुक्तीचा ॥ अंतकाली तरी विसरूं नको तूं लोभ करीं बाळांचा ॥ ४ ॥

## * पद ॥ १०० ॥

( ताल झांपी. कोपानें या चा० )

भूलोकातें बघण्या आली, नागसुता ही बोलुं जरी ॥ पातालीं अशि कधीं न सुंदरी; दृष्टिस पडली नाहि तरी ॥ मूर्तिमती

चंद्रिका ह्मणूं जरि, दिवसा दर्शन दे न परी ॥ लक्ष्मी करपंकजें भासनें, कोण पातली आज घरी ॥ १ ॥

## पद ॥ १०१ ॥

( राग—खमाज. ताल—धुमाळी. )

जमुनियां तुह्मीं एक जुटीनें अज्ञाना हांकुनि लावा ॥ स्वातंत्र्या तें पुनरपि मिळवुनी यशझेंडा हातीं घ्यावा ॥ जमु० ध्रु० ॥ हाशी मेंढा कां आर्या तूं असुनि सिंहाचा छावा ॥ स्वदेशाचा स्वधर्माचा अपमान त्वां नच सहावा ॥ याचकवाडा झाला अपुला आर्य जनी नाहीं तकवा ॥ यत्न कवाडा उघडुनि आपण उद्योगा लुटुनि घ्यावा ॥ वीरचरणीं मस्तक हें ठेऊं दृढ करुनिया मनिं भावा ॥ कीर्तीं मागें ठेवुनि स्वर्गीं जिव आनंदें सुख व्हावा ॥ जमुनी० ॥ २ ॥

## *पद ॥ १०२ ॥

( शशिकुल भूषण गुणवंता० ) या चालीवर

कोमल रम्य तृणें भूही ॥ झाली अच्छादित याहीं ॥ तृणानें झालां ही मृदुला ॥ शिरिषपुष्प कांतिज्याला ॥ जणु हें पाच खंड वरती ॥ पसरिले ऐसें कीं दिसती ॥ गळोनी देठापासोनी ॥ बंधुक सुमनें वर पडुनी ॥ इंद्रगोपकें अच्छादुनिया गेली दिसते ही अझुनी ॥ रम्य किती पाही ॥ १ ॥

## पद ॥ १०३ ॥ √

( राग—भूपकल्याण. ज्याचे वंशीं कुलधर्म० या चा० )

मदन बाधा, सोसेना क्षणहि जीला ॥ करी तळमळ तळमळेर अशी बाला ॥ ध्रु०॥ कथी हितगुज सप्रेम जें निजसख्यांतें ॥ पुन्हा मैना शुक शिशुहीं बोलती तें ॥ १ ॥ पंडति ज्यांच्या कर्णीं हे मधुर बोल ॥ धन्य तेचि भूभागीं इतर फोल ॥ २ ॥

पद ॥ १०४ ॥

( रागआनंद भैरवी—ताल—दादरा.नको नको विसंग नाम ग्रहण०' याचा० )

दुःखद फार भरतभूमि जाहाली असे ॥ शौर्यहीन आर्य हो-नी शर्ग ती नसे ! ॥ ध्रु० ॥ कलह नीच येथ वसन सौख्य मग कसें ? नकळे भुल आर्यजनां काय पडतसें? ॥ रंकराव सकल कलहीं मग्न होतसे ॥ थोर थोर भूपति-ही लया जातसे ॥ अंग श्रम करूनि जे किं उष्णीं दंतसे॥विविधसौख्य आपणांस स्वास्थ्य त्यां नसे ॥ अन्नवस्त्र नाहिं ह्मणुनी दीन रडतसे ॥ व्यक्तीस्वातंत्र्य नष्ट सतत होतसे ॥१॥

*पद ॥ १०५ ॥

( उद्धवा शांतवनकरजा० या चा० )

तेव्हांच स्त्रियांनीं त्यांच्या सहगमन तयाशीं केलें ॥ तज्जन हीं पळोनि सारे विंध्याचलीं भूपा गेले ॥ गेहांतरि त्याच्या बघतां निर्जन जें होतें झालें ॥ सुंदरी दृक्पथिं आली यज्जन्म उच्च कुलि झालें॥ ती दीन काढूनि वाणी ॥ हा तात तात बोलोनी ॥ आळवि जी रुदन करुनी॥तत्सुता मनि हें आलें घेवोनी पातलों ॥ तिजशीं, जी उभी असे द्वाराशीं ॥ १ ॥

पद ॥ १०६ ॥

[ राग—पिलू ताल—दादरा. ]

शिणवूं नको पदकमलें, व्यर्थ सखे गे ॥ विनयानें त्यजुनि अतां बोल मजशीं गे ॥ ध्रु० ॥ कामानलें दग्धतनू यासि प्रिये गे ॥ आलिंगन देउनियां शांत करीं गे ॥ नव अधरामृतलोलुप हा मधुप जाणगे ॥ वासंतीपुष्प तूंचि मधू सेवूं दे गे ॥ शि० ॥१ ॥

पद ॥ १०७ ॥

( रागिणी भैरवी. ताल—दादरा )

प्रार्थितसें नाथा तुह्मि क्षमाकरा मला ॥ मजसाठीं बहुत सख्या

कष्ट पावला ॥ ध्रु० ॥ दुष्टानें निरपराध तुह्मां गांजिलें ॥ विस रुनि तें सकल मला पदरीं घेतलें ॥ पूर्वपुण्ययोगें मज रत्न गवसलें ॥ पार्वतिपति शंकर हा अंतिं पावला ॥ प्रा० ॥ १ ॥

पद ॥ १०८ ॥

( आवड तुला बेलाची शंकरारे या चा० )

आनन तुझे पाहूं दे ॥ प्रिय सखये गे ॥ ध्रु० ॥ गळां हार शोभा । मुखीं चंद्रप्रभा । अधरसुधा चाखूं दे ॥१॥ आतां नको पाहूं अंत ॥ चल गे एकांत॥ बोल मसी ऐकूं दे ॥२॥ प्रेमे तव महालीं॥ वेळ व्यर्थ गेली ॥ अंकावरी घेऊं दे ॥ ३ ॥

पद ॥ १०९ ॥

( राग–जोगी. चाल–माझा कृष्ण देखिला० या चा० )

धन्य धन्य धन्य तूं बा ॥ भरतसख्या ॥ ध्रु० ॥ समरीं लक्ष्मण होतां घाय ॥ कपिगण करिती हाय हाय ॥ तंव तुज स्मरला श्रीरघुराय ॥ तुज किति काय, भाग्य वदूं ॥ ध० ॥ १ ॥ तुझा रघुपतिचरणीं ठाव ॥ गंगाजलसा निर्मलभाव ॥ या रघुवंशीं भरतराव ॥ हें तुज नाव साजतसे ॥ ध० ॥ २ ॥ जैसी ही तव चापाकृष्टी ॥ ऐसी न दिसे पाहतां सृष्टी ॥ झाली पोटीं मज बहु तुष्टी ॥ होयिल दृष्टी, बा तुजला ॥ ध०॥ ३॥ ऐसे सद्भक्ति श्रीमंत ॥ मिळतां एकठायीं संत ॥ आला प्रेमापूर अनंत ॥ विठ्ठलपंत वाहतसे ॥ धन्य० ॥ ४ ॥

पद ॥ ११० ॥

[ भजन–तव, गजवदना मजला. या० चा० ]

वदन आज दाखविणें तिजला ॥ वाटतसे दुःखाला ॥ काय प्रभेला जाऊन सांगूं ॥ मरण नये मजला ॥ १ ॥ पतिव्रतेतें वदतां वाटे ॥ संकट समय मला ॥ २ ॥ प्रसंगदुर्घट ऐकुनि हृदयीं ॥ आत्मा तळमळला ॥ ३ ॥ हेंच कळविणें देवीं ये कीं ॥ सुख-

संचय सरला ॥ ४ ॥ नित्य सुखानें नांदत असतां ॥ संसार बिघडला ॥ ५ ॥ असो कसेंही वृत्त कथावें ॥ कृतनिश्चय ठरला ॥ ६ ॥ वदन० ॥

पद ॥ १११ ॥

( राग पिलु–ताल–धुमाळी. )

हें तट गिरिचें भव्य मनोहर गोदातटींचें ॥ ध्रु० ॥ असाते गुहा बहु जेथें वहाती ॥ ओघंह निर्झराचे ॥ हें० ॥ १ ॥ ज्यांतिल तरुमृगसंवहि झाले ॥ बंधुवर्ग मम साचे ॥ हें० ॥ २ ॥ प्रियेसहित मी बहु दिन येथें ॥ क्रमिले दिवस सुखाचे ॥ हें० ३ ॥

पद ॥ ११२ ॥

( राग आनंद भैरवी ताल–दीपचंदी. )

धांव आतां मयुरेशा, अंत किती बघसी मम ॥ जन्माचें सार्थक झालें ॥तव पदवासचि बरवा यासी ॥ध्रु०॥जरि या जन्मीं संग न सखिचा ॥तो मज तेथअसावा॥हेंचि मागतों तुजशीं देवा॥ दे मज इतुकें तव दासासी ॥ धाव ० ॥ १ ॥

पद ॥ ११३ ॥

( वस्त्रानें देहसारा यासु०याचालीवर )

पाहुनिया रम्य बाग मन माझें मोहतें ॥ ऐकाया हंसवाणी गोड बहू लागतें ॥ मंजुल जी तोषदायी हृदयाला वाटतें ॥तो स्त्रीच्यापैंजणाचा शब्द मला भासतें॥पाहुनि ध्रु०॥उदकाचा भाग सारा कमलानी वेढिला॥मद्घ्राणा तोष दे जो परिमल हा पसरिला॥जल संगें शीत वायु गंधित हा सूटला ॥ मंद असा ऊष्णकाळीं देत असे शांतिला ॥ पा० ॥ २ ॥

पद ॥ ११४ ॥

( भक्तांसाठी तो जग जेठी. याचाली वर. )

सुधन्व्यासी संकट पडलें ऐकुनि फाटे ऊर ॥ कोसळे पर्वत अं·

गावर ॥ ध्रु० ॥ दुर्दैवांच्या विचित्रगतिहि सुटति न ब्रह्मादिकां॥ हेतो सकळांला ठाऊक ॥ पडलें संकट प्रभावतीला फार दुःखदायक ॥ दिसे निस्तेज देह नाजुक ॥ मुर्च्छागत ती होऊनि पडली व्याकुळ धरणी वर ॥ कोसळे पर्वत अंगावर ॥ १ ॥

## पद ॥ ११५ ॥

[ राग—कालंगडा. ताल—धुमाळी. ]

सेवक जन विश्रांति न घेती शोका भूपति करी ॥ पशू पक्षीते मौन्यावरी ॥ रोग भयंकर त्यामातेसी स्वास्थ्य मुळीं तिस नसे॥अन्नोकीह वर्जिलें असे वैद्य विविध औषधें देई परि गूण नसे लेशही ॥ दिसते पहा कशी नगरि ही ॥गृह पाहती राणीचे ज्योतिषी एकत्रचीं मिळुनी ॥ असती खिन्न सकल जनमनीं ॥ बाळपरीं युवराज टाकितो अश्रु नेत्रांतुनी ॥ वरचेवर जननिस पाहुनी ॥ वाटे सुख नच कवणासी॥असे वैभव राज्यीं जरी ॥ पशूपक्षीते मौन्यावरी ॥ १ ॥

## * पद ॥ ११६ ॥

( सखये अनुसुये थांबकीं० ॥ याचा० )

अग सखये तूं थांब जरा मी आलें॥ किति थंडगार जल झालें ॥ माझे अति पाय गारठुनि गेले ॥ गडे हळू हळू तूं चाले॥अग० ॥ १

## पद ॥ ११७ ॥

( देती शिकारिस दोष या चालीवर )

भृत्यजनानीं संकट येतां त्याग न माझा हो केला ॥ सचिव मन कसा योग्य लावण्या सहज समय आला मजला ॥ ध्रु० ॥ मित्र जनेंही विपत्ति काळीं न दिलें अंतर कीं मजला ॥ सन्मन पौरे तोषविलें बहु दावुनि मोठ्या प्रेमाला ॥ संग्रामाची हौस पुरविली करुनि दीर्घ प्रयत्नाला ॥ सुटलों बंदींतुनीं मिळुनियां अनुपम शास्त्रीरत्नाला ॥ जेवि मिळे निष्कपटें तेवि धरुनि त्या

सद्धर्माला ॥ याही तैसा बंधनयोगें लाभ सुखाचा मज झाला ॥ भृत्य० ॥ ३ ॥

## पद ॥ ११८ ॥

( चाल–उखा भयें थरथरां कांपती )

कशी तुला तरि बुद्धि उपजली मूढपणा धरिला ॥ रतीपतीला सेवुनि होसी विन्मुख कां हरिला ॥ ध्रु० ॥ कुळा लाविला कलंक माझे भंगुनियां वचना ॥ मजला गमतें लाज जगीं ह्या मुख दाखवितांना ॥ कामातुर मन करुनी कैसें वरिलें मदनाला ॥ कृष्णवदन हें दावितोसी लाज नये तुजला ॥ १ ॥

## पद ॥ ११९ ॥

( कां आड सख्य तूं येसिगे या चालीवर. )

घ्या हें वंदोनि गे ॥ ध्रु० ॥ पति हें दैवत अंतरिं मानुनि ॥ वदनिं तयाचे गुण गाऊनि ॥ सत्य सुनिश्चय हृदयीं ठसावुनि ॥ भाव धरा समपदिं ॥ बायानों ॥ १ ॥ गति नच दुसरी निजपतिवांचुनि ॥ विधिहरिशंकर लघुहि तयाहुनि ॥ नम्र असावें तत्पद वंदुनी ॥ २ ॥

## पद ॥ १२० ॥

( राग–कल्याण. ताल–त्रिवट. कितो तरी करूं मन धरणीं या चालीवर. )

सोड सोड आस तव मनीची ॥ संग्राम करुनि बधण्याची ॥ ध्रु० ॥ शूळपाणी मज साह्य कराया ॥ भूतगणसह असतां ॥ शरतांडव तव व्यर्थचि जाणें ॥ इच्छा थोर प्रभूची ॥ १ ॥ शीतभानु जरि तीव्र कोपला ॥ पूर्ण कला विखरोनी ॥ तरि रविवरि करि धृतितें धरोनि ॥ कैशी प्रभा तेजाची ॥ २ ॥

## पद ॥ १२१ ॥

( वक्रतुंड गणपती, गणाधिपती. या चालीवर. )

तूं प्रभु थोर तापसी, नित्य वनवासी, सूर्य भक्तिसि तव मन

जडलें ॥ आह्मी शेषसुता मागतों मनीं कीं जें आलें ॥ १ ॥
आह्मी दीन चरणीं तंव लीन जळाविण मीन ॥ होउनियां क्षीण॥
विनवीतों तुजला ॥ अमरतरु तूं पूर्ण करि रे हेतुला ॥ २ ॥
चाल ॥ उन्मेष शुन्य पडलों आह्मीं नारी ॥ द्यावें दर्शन आपुले निरंतरी ॥ तरि कृपा करील तो मदनारी ॥ हे श्रेष्ट मुनी हो तुष्ट ऐका हिच गोष्ट ॥ आह्मी जरी नष्ट विनवीतो दासी॥ पती देउनि सुंदर तोष करी आह्मांसी ॥ ३ ॥

पद ॥ १२२ ॥

( नको हरिनिशीं बाहेर जाऊं. या चालीवर. )

नको सखे अति शोक करूं तरी । कोमल मुख बहू सुकलें गे ॥ ध्रु० ॥ नयन पहा कसे लाल जाहले ॥ अश्रु गाळुनि सुजले गे॥ १ ॥ असतें भाळीं घडने वेळीं ॥ ब्रह्मलिखितें न टळे गे ॥ २ ॥ पूर्वजन्मींचें दुष्कृत साचें ॥ जैसें तैसें होणें गे ॥ ३ ॥ कुळदेविशीं हृदयीं स्मरसी ॥ रक्षिल तरि पति प्राणागे ॥ ४ ॥

पद ॥ १२३ ॥

[ शशिकुल भुषण गुण. या चालीवर. ]

भेदुनि छाती एकाकीं, मारुनि पायदळा टाकी ॥ सोडुनि स्वारावरि बाणा ॥ पिटाळी जेवी त्या हरिणा ॥ अस्त्रें सोडुनियां स्वकरीं, उपसुन घेई तरवारी ॥ करिकर कदलीकानन तोडी दावी लीलेला ॥ समरीं धैर्यें तो लढला ॥ १ ॥ असिकर ज्याच्या खांद्याला, देती अतिशय शोभेला ॥ तों ती भिषिधचमुसारी, शौर्यं एकटाच मारी ॥ छिन्नवपु होउनियां पुढती, झाला व्याकुल जो अंतीं ॥ विंध्यकेतु तो टाकुनि देहा परलोकीं गेला ॥ समरीं शौर्यें जो लढला ॥ २ ॥

पद ॥ १२४ ॥

( राग—काफी. ताल—दीपचंदी. )

साध्य नसे मुनि कन्या मज ही ॥ परि वेडें मन ऐकत नाहीं ॥ ध्रु० ॥ पाहुनि सखिच्या विविधविलासा ॥ मन घेई हें बहु विश्वासा ॥ स्मर जरि तुष्ट न होई ॥ मी परि बहु सुख यांतचि घेई ॥ साध्य० ॥ १ ॥ डोळे मुरडुनि सहज बघे ती ॥ ठुमकत मुरडत चाले गजगती ॥ चेष्टा केली सखिंसी ॥ ते मी मजकडे लावुनि घेई ॥ साध्य० ॥ २ ॥

पद ॥ १२५ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. )

कामकंदले, सोडुनि गेलीस, करुणा नच आली ॥ मातें ढकलुनि विहरसागरीं, स्वर्गपुरि त्वां कीं वरिली॥ध्रु०॥ जिवंत असतां सोडविण्या तुज कां घाई केली ॥ सुजाण असुनि वेडी झालिस, कर्मगती फिरली ॥ का० ॥ १ ॥

* पद ॥ १२६ ॥

( कीति सांगूं तुला मन चैन नसे. या चा० )

मम दुःख कुणाला, सांगु कसें? ॥ दुर्भाग्य कसें मज ग्रासितसे ॥ परसेवाग्नी मज जाळितसे ॥ चाल ॥ कोण सदय तरी, मज मज साह्य करी, ताप हरी, ॥ १ ॥

पद ॥ १२७ ॥

( राग–झिंझोटी. ताल–त्रिवट. )

हा सुखदायक चंद्र उगवला ॥ जो बहु सुंदर दीप नभाचा ॥ ध्रु० ॥ कविगुरु मंगल ज्याच्या सन्निद्ध ॥ शोभती जो हरि ताप जनांचा ॥ हा० ॥ शीतल शुभ्र प्रभा अति तोषवि ॥ जी करि नाशहि घोरतमाचा ॥ वृक्षालता किति सुंदर दिसती ॥ होय रम्य सहवास स्त्रियेचा ॥ हा० ॥ १ ॥

पद ॥ १२८ ॥

( राग–हमीरकल्याण. ताल–त्रिवट. )

लज्जित हा मी, जिवलग सुंदरी॥ मस्तक घासुनि तव चरणावरी॥ ध्रु० ॥ काठिन लाक्षाकृत ही लाली ॥ परि तव मुखेंदु बिंबावरली ॥ कोपग्रहणें, जोगे आली ॥ हरिन ती दया करशिल तूं जरी ॥ लज्जित० ॥ १ ॥

पद ॥ १२९ ॥

( राग–आनंदभैरवी. ताल–दादरा. चाल–वैशाखमासिंवासंतिकस० )

पंचप्राण जाउं पहात दुःख होतसें ॥ बघुनि दशा माझि सर्व जाहलें कसें ॥ चित्रापरि दिसति नेत्रीं अश्रु वाहतसे ॥ वाटलें न येति दिवस अंति हे असे ॥ मानपान भोगण्यांत तुह्मां दीधला ॥ त्रास बहू आजवरी करा क्षमा मला ॥ हा कुमार सोपितें मि बाई तूजला ॥ सुखवि प्रेम करुनि सखे। नित्य याजला आठवूनी यासि मनीं शून्य दिसतसे ॥ पंचप्राण० ॥१ ॥

पद ॥ १३० ॥

( व्यर्थ मी जन्मलें थोरकुळीं. या चालीवर. )

मनिंचा क्रोधचि दूर करा, उभयतां तुह्मी प्रीती वरा ॥ पक्षी कीटक ऐक्य कीं, इच्छिती कैसें हें विसरा ॥ कलह असे जरी राज्य कुळीं, मग तोटा कवण दुसरा ॥ मनिंचा० ॥ १ ॥

पद ॥ १३१ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. )

नेती हे मज वधस्थळीं कीं ॥ वत्सा वधण्याला ॥ दुःखानें उर येई भरुनी ॥ काय कथूं तुजला ॥ ध्रु० ॥ घालुनि कंठीं यज्ञपशूपरी ॥ ह्या रक्तसुमनमाला ॥ स्थापिती स्कंधावरती ऐशा ॥ दुर्धर लोहशूला ॥ नेती० ॥ जाती बघुनी मम मित्र कसे हे ॥ झांकुनि स्वमुखांला ॥ आली कुदशा ह्मणुनी त्यजिती ॥ मित्रही मजला ॥ नेती० ॥ १ ॥

पद ॥ १३२ ॥

( राग–सोहनी. ताल–दादरा. )

धन्य धन्य धन्य विधी निर्मिलें इला ॥ अनुपमकृति उद्भवुनी गुण दाविला ॥ ध्रु० ॥ सौंदर्या एकवटुनि, लीलेनें मूर्ति केली ॥ पाहुनि इस मति भ्रमली, काम चेतला ॥ धन्य धन्य० ॥ १ ॥

पद. ॥ १३३ ॥

( राग–बिलावल. ताल–दादरा. )

जन्म तुमचा असो वाया ॥ जन्म घेऊनियां॥ असुरकुलीं या ॥ ध्रु० ॥ मानवाचें बालक तें ॥ काय म्हणतां शूर त्यातें ॥ भिऊनि आलां त्यासि येथें ॥ वृत्तकथन कराया ॥ ज० ॥ १ ॥ करुनि- यां समर तेथें ॥ कां न गेलां मृत्युपंथें ॥ दाखवाया तोंड मातें ॥ आलां तुम्हीं कासया ॥ ज० ॥ २ ॥

॥ पद १३४ ॥

( राग–आनंदभैरवी. ताल–धुमाळी. उद्धवा शांतवन कर जा० या चालीवर. )

मर्यादा सोडुनि वदणें योग्य न, हें मजला ठावें ॥ परि धीर मनीं धरवेना हें दुःख मनीं सोसावें ॥ ज्या प्रेम निरंतर करिती, हितगुजही त्यां सांगावें ॥ आणुनि त्या राजेंद्राला ॥ भेटवाचि सत्वर मजला ॥ त्यावांचूनि शेवट झाला ॥ या सखिचा मनिं समजावें जरि ममता मजवर तुमची ॥ प्रिय माझें हेंचि करावें ॥ १ ॥

पद ॥ १३५ ॥

[ राग–भैरवी. ताल–त्रिवट. )

धन्य जगीं तूं होसी ॥ बाळा धन्य० ॥ ध्रु० ॥ कार्य भाग मम तव साह्यें अजि ॥ गेला हा सिद्धीसी ॥ बाळ धन्य० ॥ १ ॥ हर्ष न मावे हृदयीं माझ्या ॥ पाहुनियां सुदिनासी ॥ बाळा धन्य० ॥ २

पद ॥ १३६ ॥

( कौन भरोंहि, जगन बनाहि. या चालीवर. )

जगचालका, विश्वपालका दीनपालका नेइ मला ॥ तव मायेचा अंत कशाचा भ्रमदुःखाच्या फेऱ्याला ॥ समजुनी उमजुनि

भुलतों आह्मीं मानुनि सुखद असे त्याला ॥ स्मरणीं, भजनीं कीर्तनीं तुझ्या रत करिशी प्रभू या सकलां ॥ १ ॥

पद ॥ १३७ ॥

(राग–जिल्हा. ताल–दीपचंदी. इसतन–धुनकी. कान–चल्हाई, या चा०)

भूमी–स्मशान कशी ही दिसते, क्रोध, कपट, छल दंभा हरिते ॥ ॥ ध्रु० ॥ गृह सोडुन आल्यावरी येथें, वृत्तीलानता अंतरिं जडते ॥ कल्प विकल्प कीं जात मनांतुनी, वैराग्याचे येतसें भरते ॥ ऐहीक वैभव सर्व पसारे, टांकावें ऐसें मनीं येतें ॥१॥

पद ॥ १३८ ॥

(राग–जंगला जिल्हा. त्रिवट.)

नाहीं जगती सार जराहो ॥ नाहीं ॥ ध्रु० ॥ चौदा चौकडी राज्य मिळे तरी॥तृष्णेचा नच पार॥ ॥ भोग भोगती इंद्र अप्सरा॥ तृप्ति न मनीं साचार॥जरा०॥१॥कामबलें जन बहुत किं करिती॥ संसारी व्यभिचार ॥ रूप वीर्य धन धुळिस मिळालें॥मग कोणाची नार ॥जरा०॥२॥साहण्या शक्ति उरली नाहीं॥या मायेचा भार॥ ह्मणनी भवसागरतरण्याला प्रभुपद एकाधार ॥ नाहीं जरा० ॥ ३ ॥

पद ॥ १३९ ॥

(राग–जंगला जिल्हा.)

मृतस्त्रीविरहें दुःखित पहा, तो नृपवर कैसा क्षिण झाला॥ सर्व रम्य वस्तुचा याला कंटाळा कीं आजि आला ॥ उदास जग हें वाटे सारें शोक वृत्तिशी हा रमला॥वर्णु किती मी भूपती शोका॥ बोलुन कंठा हा दाटला ॥ मृतस्त्री० ॥ १ ॥

पद ॥ १४० ॥

(चाल–लावणीची ताल–धुमाळी.)

सुटला पितृदिशेचा वारा ॥ झांकी मेघही नभपथसारा ॥ घन गर्जत ताफेपरी वर्षती गारा ॥कडकडाट करिती विजा येती जल धारा ॥ भरलीं तुडूंब वापी तळीं न्हाले पर्वत नभ घनजलीं नद

नदीला आले पूर मुतरूवर समूळी ॥ उपटूनीयां गेले उलटे रु-तले गाळीं ॥ जिकडे तिकडे जलमय असे जंगल सर्वही हिरवें दिसे ॥ बघण्यांला सूक्ष्मकुसुमें परि वास नसे ॥ मत्तपतिवि-युक्त वधू अति दीना विलसे ॥ राजा वसंत जणूं मृत झाला ॥ ग्रीष्म कीं तापवी सकल जगाला ॥ हा प्रावृट जन नेत्रांत पुरची आला ॥ बुडवीतो तैसा ॥ वर्षे स्वादु जलाला ॥ १ ॥

पद ॥ १४१ ॥

( अर्जुना तूं जाणर होशील सुजाणरे या चा० )

सप्त ऋषीश्वर रे ॥ आणी मनू चार रे ॥ तयापासुनीं जें झालें ॥ दृश्य चराचर रें ॥ १ ॥ माझा हा विस्तार रे ॥ सकळ जगदाकार रे ॥ मजवांचुनी नाहीं ऐसें ॥ जाणें जो साचार रे ॥ ध्रु० ॥ अपरोक्ष जें ज्ञान रे ॥ झालें त्या आधीन रे ॥ ह्मणवु-नि न देखे द्वैत- ॥ भावाचें हें भान रे॥२॥ येणें अचळयोग रे ॥ मनाचेनी आंग रें॥मीनला तो मजमाजी॥ निःसंशय जाण रे ॥३॥ तोचि योगयुक्त रे ॥ तोचि जीवन्मुक्तरे॥अर्जुना त्रिभुवनामाजी ॥ माझा तो निजभक्त रे ॥ ४ ॥.

पद ॥ १४२॥

( जय जय मदना मुहाम्य वदना, या चालीवर. )

जव्हां जव्हां वाढायातें ॥ येइ सुभद्रा ती त्या यतितें ॥ भुलुनि पाहुनि तद्रूपातें ॥ तैसें नाना ढंग करी ॥ १ ॥ पंक्तीमध्यें न-सतों जरि मी॥भोळे तुह्मा पाहुनि नामी॥भलतें भलतें करितों स्वामी ॥ निश्चयपूर्वक मज वाटे ॥ २ ॥

पद ॥ १४३ ॥

( राग—मालकंस. ताल—त्रिवट. )

जात स्त्रियाची कपटी कपटी ॥ नरा फसविनी करुनि खटपटी ॥ ध्रु० ॥ युवतीचरित्रा कोण न जाणती ॥ हरिहरब्रह्मा कुंठि-

न होती ॥ योगीजन ही किती तरि लटपटी ॥ जातस्त्री ० ॥ १ ॥

पद ॥ १४४ ॥

( राग–आनंद भैरवी.ताल–झुमाळी. भक्तासी–भगवद्भजनें, भवसागर–या०चा० )

कुळदीपक माझ्या बाळा ॥ कार्य करी तूं जननीचे ॥ ध्रु० ॥ दाखवी तिला यदुराणा ॥ जन्मलास उदरीं जीचे ॥ बा कीर्ति रणीं संपादी भूषण हो तूंच कुळाचे ॥ १ ॥ वीरमाय मजेरे भुवनीं जनमुखें वदवी साचे ॥ इच्छा ही सिद्धिस जातां ॥ सार्थक तुज जन्म दिल्याचें ॥ २ ॥

पद ॥ १४५ ॥

( ताल–त्रिवट–चाल–मात:स्वामिनिसीताबाई )

शिणलासि माझा बारे ॥ ध्रु० पाई अनवाणीं संगें रुक्मिणी ॥ कांटे कर्नाटकच्या वाटे चालतांना उपवाशीं ॥ शिण० ॥ १ ॥ अतिसुकुमारा नंदकुमारा नागर गिरिवरधारी पंढरपुरचा रहिवाशी ॥ शिण० ॥ २ ॥ आदि नारायण जगजीवन ॥ पतीतपावन भक्ताकारितां ब्रीद बाळगीशी ॥ शिणला० ॥ ३ ॥

पद ॥ १४६ ॥

(राग जोगी .माझा कृष्णदेखिलाकाय . याचा०)

देवा दुर्गति मात्र नहों ॥ याकीं मतिपतया ॥ धृ०॥ पिडिले गायी विप्र विशेष ॥ धर्म बुडविले निःशेष ॥ सत्कर्माचा मोठा त्वेष ॥ त्यांतुन द्वैष याचरणीं ॥ देवा० ॥ १ ॥ संत्रासले दिव्यमुनी ॥ देववृंदाला जाचणी ॥ केवळ पातकीचुडामणी ॥ किंति अवगुणी वर्णावा ॥ देवा० ॥ २ ॥ याच्या दुश्चरितज्वलनांत ॥ होरपळुनि प्राणी जात ॥ देवा ऐसा हा मम तात ॥ यास्तव हात जोडितसे ॥ देवा० ॥ ३ ॥ याचे स्मरतां दोष अनंत ॥ कैसा काय होईल पंथ ॥ चित्तीं वाटतसे बहु खंत ॥ विठ्ठलपंतमतिदात्या ॥ देवा० ॥ ४ ॥

## पद ॥ १४७ ॥

( अस्तमान झाला टाकुनि पुद्रायआला यावा. )

बघुनि सुभद्रेला ॥ कसा यति वेडावुनि गेला ॥ धृ० ॥ हस्तांतिल ती गोमुखि गळली ॥ आशीर्वचनीं जिव्हा चळली ॥ नासिकाग्र दृष्टीही वळली ॥ चाल ॥ निर्लज्जचि झाला ॥ टकमक मुख तें बघण्याला ॥ बघुनि ॥ १ ॥

## पद ॥ १४८ ॥

( चाल–मात:स्वामिनि सीताबाई. ताल–त्रिवट. )

प्रियकरभगिनी तुझिये मनाचें ॥ होतील पूर्ण मनोरथ साचे ॥ धृ० ॥ वीर धनंजय जिंकीन समरीं ॥ असतांही साह्य तया श्रीहरीचे ॥ १ ॥ शूरपणाची करितां मी ख्याती ॥ गातील लौकिक जन माहेराचे ॥ २ ॥ श्वशुरगृहासीं शूरपणाचे ॥ होईल श्रवण हें वचनामृताचें ॥ ३ ॥ अंतःपुरीं त्वां स्वस्थ रहावें ॥जय इच्छुनियां प्रियबांधवाचे ॥ ४ ॥ प्रिय० ॥

## पद ॥ १४९ ॥

( राग कालंगडा–ताल–धुमाळी )

वीरा भ्रमरा जन्मुनि सार्थक केलें तूं या जगीं ॥ बसलों विचारांत आह्मि उगी ॥ या प्रमदेच्या वक्रकटाक्षा पात्र होसि तूं गड्या ॥ आमुच्या गप्फा मनि कोरड्या ॥ कर्णी कथिसि गोष्टि संवगड्या ॥ झिडकारित असतां निजहस्तें मानेनें वांकड्या ॥ पीशी अधरामृत फाकड्या ॥ ईर्ष्या जातीची ती शंका मनिं नाउगी ॥ बसलों विचारांत आह्मि उगी ॥ १ ॥

## पद ॥ १५० ॥

( अभग्याचे–घरी, बाबा–कामधेनु–आली, या० चा० )

प्राप्त होय जें निधान करिं तें दवडुं नये वायां॥चारमास गृहिं ठेवुनि घेऊं सुखदा यतिराया ॥ प्रा० ॥ धृ० ॥ आयासावांचुनि ती

आह्मां सत्संगति घडते ॥ दुर्मिल जें वच गृहस्थांसि तें सहज कानीं पडतें ॥ सूर्योदय होतांचि तमापरि पातक तें दडतें ॥ चाल ॥ होय नित्य दर्शन त्याचें॥तरि सार्थक जन्मुनिया॥ प्रा० ॥१॥

## पद ॥ १९१ ॥

(खरि–झाली, दृष्ट–माझ्या, श्री हरिला–वाटतें. या० चा० )

पतिराया परिसावें मम वचना स्पष्ट तें ॥ क्षण एक थांबुनिया मग जा मी इच्छीतें ॥ ध्रु० ॥ श्रीहरींदर्शनाची बहु इच्छा दीसतें ॥ जे गेले कृष्णभेटी परत आले कोणते ॥१॥अति दुःखरुपी मन संसारा वीटतें ॥ यास्तव मी विनवितें आस मनिची रहाते ॥ २ ॥ लवण हें जलधीसी कर्पूर अग्नितें ॥ तात्काळ भेटतांचि तद्रूप होति ते ॥३ ॥ तैसेंची होय येथें मजलाही वाटतें ॥ कळतें हें मज सारे ह्मणुनि आज वोलते ॥ पतिराया० ॥ ४ ॥

## पद ॥ १९२ ॥

(राग–जोगी. ताल–धुमाळी.)

हर हर दैवा; निष्ठुरहृदया घात कसा केला ॥ सुखद आशा, लावुनि ऐसा, शेवट कीं झाला ॥ ध्रु० ॥ क्षणभर दावुनि, लेश सुखाचा, तोषविलें मजला ॥ पुनरुपि अकरुण होऊनि कां त्वां अघटित व्युह रचिला ॥ अजिंक्य होसी सार्थक मानिसी, छळुनीयां अबला दीनाची किं वतुज येऊं दे, प्रार्थितसें तुजला ॥ १ ॥

## पद ॥ १९३ ॥

(राग–मुलतानी. ताल–धुमाळी.)

मित्रा ही सुंदर शोभा! पहा ह्या उद्यानाची ॥ ध्रु० ॥ फलपुष्पित तरुवर कैसें ॥ आनंदें डोलताती ॥ टवटवीत ह्या नव वेली ॥ ज्यालागी दृढ वेष्टीती ॥ सदारमर्त्यंची. जणु हे ॥ त्या योगें दिसताती ॥ चाल ॥ सेवाया मधुप मधूला ॥ आच्छादिति पुष्पलतेला॥तोषवी तशींच मनाला॥वाणी ही मधुर पिकाची॥१॥

## पद ॥ १९४ ॥

( बारे बिभिषण बोलत० या चा० )

उरला भेदन ज्या कांहीं ॥ त्यांना कोठें भय नाहीं ॥ ध्रु० ॥ रंभा मोही सकलांला॥परि निज शुक तो गुरु झाला ॥ वश करि मन्मथ जगताला ॥ पण तो हर जाळी त्याला ॥ शिवसुत गुह मारुति यांला ॥ कोणी नच करि वश अबला ॥ भीष्म गुरू तो जिवंत आहे ॥ यायां साक्षी ही ॥ शोभवितो जो सकल मही॥ उ० ॥ १ ॥

## पद ॥ १९५ ॥

(राग–काफी. ताल–दीपचंदी. )

प्रसन्न हो तूं मला ॥ अंबिके परिसुनि विननिला ॥ ध्रु० ॥ दशनखचंद्रविभुषित कर हे जोडुनि ॥ मी तुजला ॥ नम्र करुनि हा मस्तक सुंदरीं ॥ नमितों तव चरणाला ॥ अं० ॥ १ ॥ का मुक होउनि पूर्वी तुझा म्यां ॥ अपराध जो केला ॥ त्याची क्षमा मज कर मृगनयने ॥ दास तुझा हा झाला ॥ अं ॥ २ ॥

## *पद ॥ १९६ ॥

( चाल–भक्तासाठीं तो जगजेठी बसुनी माळयावर. )

चंद्रापासून सदा होतसे अमृतवृष्टी जशी ॥ पाहतां प्रीति देही तशी ॥ धु० ॥ विस्कळलेल्या पयोधरपटें शोभा पावे कशी ॥ असुनी चंद्रतनु ही अशी ॥ हस्ताब्जना मिटती मित्रा अद्यापी हीं कशी ॥ वाटतें नवल हेच मानसीं ॥ १ ॥

## पद ॥ १९७ ॥

( राग–पिलु. ताल–धुमाळी. )

शोकभरें रतिविव्हल पाहुनि, कालांतक द्रवला ॥ स्वांग अर्पुनी सजीव केलें, पुनरपि कामाला ॥ ध्रु० ॥ ईशरूपची अद्भुत घटना, अति सुंदर कला ॥ मजला मूर्ती तेवि भासली कीं, तोच

स्वयें आला ॥ पाहुनि त्यांना मोह उपजला, माझ्या चित्ताला ॥ वेडि झालें नाथाविण मी, विधि दारुण बनला ॥ शोक० ॥ १॥

पद ॥ १५८ ॥

( राग–झिल्हा. ताळ–धुमाळी. चाल–कोण करील तूं चोर जार. )

उमावचन तें ऐकुनि निघती सत्वर त्या रमणी ॥ निघती गे० ॥ हिमगिरिकाननीं शिव बैसला पाहती त्या दुरुनी॥आडुनी गे०॥ पार्वतिसीं मग सांगायातें आल्या परतोनी ॥ तेथूनि गे० ॥ कथिती निजशीं हिमगिरिकाननीं बसला तो रुसुनी ॥ सखये गे० ॥१॥

पद ॥ १५९॥

(चाल–झाला विठ्ठल संग हा मानें भरला रंग.)

तुझिये शूरपणाला ॥ बट्टा न लागो गुणाला ॥ ध्रु० ॥ नर नारायण जिंकुनि येसी ॥ भूषण होय कुळाला ॥ विन्मुख होऊन मुख दावितां ॥ व्यर्थ जिणें ह्या देहाला ॥ क्षत्रियवर्तन विपरीत होतां ॥ लागेल डाग मुखाला ॥ सासू नणंदा हंसतील जावा ॥ दूषण हें माहेराला ॥ हीच विनवणी आहे सारी ॥ लज्जा ही माझी तुजला ॥ तु० १ ॥

पद ॥ १६० ॥

( शिवाजीची वाट न पाहतां, या चा० )

अर्जुन तर संन्यासी होउनि रैवतकीं बसला ॥ झालि सुभद्रा नष्ट असा ग्रह त्याच्या मनिं ठसला ॥ वैराग्याचा पुतळा केवळ सांप्रत तो बनला ॥ ब्रह्मनिष्ट वेदांती होउनि तुच्छ मानि तो विषयाला ॥ प्राणायामें कुंभक करुनी साधित योगाला ॥ सुभद्रेची मूर्ती हृदयीं धरुनि करितसे ध्यानाला ॥ चाल० ॥ ही एक गोष्ट मज अनुकूळचि जाहली ॥ कीं ढोंग नसुनि खरि वृत्ति यतिस साधली ॥ नासिकाग्रदृष्टी सर्वकाल लागली ॥ चा० ॥ भोळे अमुचे दादा तेथें जाति दर्शनाला ॥ तरी खचिन सांगतों तयाच्या लागति नादाला ॥ १ ॥

## पद ॥ १६१ ॥

( राग–बिभास. चाल–घनश्यामसुंदरा० )

निजध्यास मनोहरा या नरा लागो तव सुंदरी ॥ जपतप माझें स्मरण कीं तूझें सदोदित अंतरीं ॥ चित्र तुझें हरिणाक्षी काढिलें कठोर हृदयावरी ॥ विस्मृतिचें मग नांव कशाला कांहीं केलें तरीं ॥ मन रंजवुं पाहती हे सज्जन करुनी नाना परी ॥ परि विरहाग्नीनें मी जळतो सखये भवसागरीं ॥ निज० ॥ १ ॥

## पद ॥ १६२ ॥

( राहेना–गोविंद. गणे–तुल्या. मुहा–नेहं. ) या चा०

राहुं दे सुगंधी प्रभे पिता पुढें गेला ॥ ध्रु०॥ कीर्तिपत्नी घाली माळा ॥ प्राणप्रिये माझे गळा ॥ व्यर्थ लाविसी कां चाळा ॥ गुंतुनि मोहाला ॥ १ ॥ होता आज विलंबानें ॥ क्रोध येई मनिं तयाने ॥ तेव्हां वदूं कैसें त्यानें ॥ देई निरोपाला ॥ २ ॥ घरीं विनोदें तो निजसीं ॥ बळें घेई चुंबनासी ॥ वदे काय प्रभावतिसी ॥ असूं दे लोमाला ॥ ३ ॥

## पद ॥ १६३ ॥

चाल–कटावाची.

प्रभावतीच्या नयनकटाक्षमोहें कसा पडला ॥ सुधन्व्या ॥ ध्रु० ॥ निरखुन पाहतां सुंदरबाळी सरळनासिका विशाळभाळी ॥ गौरांगाशीं सुगंध चोळी ॥ शरिरीं मद चढला ॥ सु० ॥ मोह० ॥ १ ॥ अधररंग हा पोंवळ्यावाणी ॥ सुहास्यवदना मंजूळवाणी ॥ फारच चंचल लोचनपाणी ॥ पाहुन मृग झुरला ॥ सु० ॥ मोह० ॥ २ ॥ गालमनोहर गुलाबरंगी ॥ नवमळ झाली पाहुन अंगीं ॥ वीर सुधन्वा अशा प्रसंगीं ॥ व्यसनीं आकळिला ॥ सु० मोह० ॥ ३ ॥ वर्तुळ कुच हे लटकुन हृदयीं ॥ कनक कुंभ जणूं ह्मणुन सवाई ॥ अनुपम शोभा तरि तें ठाई ॥ दिसतें

सबळ तुला ॥ सु० ॥ ४ ॥ बारिककंबर पाहुन जीची ॥ सिंहें धरिली वस्ति वनाची ॥ कांती फारच नाजुक तनुची ॥ काय उणें निजला ॥ सु० ॥ मोह० ॥ ५ ॥

## पद ॥ १६४ ॥

(राग—झिंझोटी. ताल—दादरा.)

दिसली पुनरपि गुप्त जाहाली।प्रिया सुभद्रा. घोर वनीं ॥ येथें सुंदरि कैशी आली हेंचि कळेना मज अजुनी ॥ध्रु०॥ माझ्या सोंगा खरें मानुनी हलधरही लागत भजनीं ॥ त्रिकालज्ञ परि मोह पावले कैसें न कळे गर्गमुनी ॥ कपटी कृष्णाचीही बुद्धि गेली कैशी ती भुलुनी ॥ या सर्वांचा विचार करितां जातों मूढचि होवोनी ॥ दिस० ॥ १ ॥

## पद ॥ १६५ ॥

( राग—आनंदभैरवी ताल—धुमाळी. उद्धवा शांतवन करजा. या चा० )

बायानों घ्या सोडोनी, थकलीही पाणि आणोनी ॥ घटभारें स्कंध गळाले, कोमल कर लालचि झाले ॥ श्वासानें उर थर थरलें, अद्यापि किति तरि हाले ॥ घामानें मुख डवडवलें, कर्णावरि ओघळ आले ॥ चाल ॥ गडबडिनें धांवत येतां । विखुरले केश सावरितां । वरचेवर फिरवी हातां । ऐशामधिं सुटली वेणी ॥ बायानों० ॥ १ ॥

## पद ॥ १६६ ॥

[ राग—झिंझोटी. ताल—धुमाळी. ]

विपरितकरणें दुर्दैवाचें ॥ जेणें हरिलें वैभव आमुचें ॥ कैसें घेसी बा सोन्याचें ॥ नांव प्रियवत्सा ॥ विपत्ति जाउनि तुझ्या पित्याची ॥ पुनरपि वृद्धि संपत्तीची ॥ होतां देइन तुज सोन्याची ॥ गाडी मी तान्ह्या ॥ १ ॥

## पद ॥ १६७ ॥

( राग-कालंगडा. ताल-दादरा. )

त्यजुनि येथें व्यर्थ आलों ॥ प्रिय सखे तुला ॥ ध्रु० ॥ घडि-भर तव विरह मला नाहीं सोसला गे ॥ राहुं कसा तुजवरीं मम, लोभ गुंतला ॥ त्य० ॥ १ ॥ तपसाधन न घडे मज ॥ वाटे कधीं बघेन तुज ॥ सुरमुनिनें कथुनी गुज ॥ ठकविलें मला ॥ त्यजुनि० ॥ २ ॥

## *पद ॥ १६८ ॥

( प्रीतिस पात्र कोण तु० या चा० )

हे भीरू विषादास जरा धरुं नको मनीं ॥ त्वन्मुखकमलास म-धुर गंध म्हणोनी ॥ ही भ्रमरपंक्ति तयावरी बसे येउनी ॥ जरि त्रास लोलनयना तूं सुंदरी म्हणी ॥ कमलवनप्रभस दा-विसील विकसुनी ॥ जासिल तरि सांग कशी मुक्ति होउनी॥१॥

## पद ॥ १६९ ॥

( राग-भैरवी. ताल- त्रिवट. )

वर्णूं सखीच्या किति सुगुणांला ॥ आले एकदांचि ने उदयाला॥ ध्रु० ॥ प्रियसखीसह अत्यानंदें । केल्या मी बहुविध लीला॥ आठवतां त्या किति तरि होतें । माझ्या दुस्सह दुःख मनाला ॥ वर्णूं ० ॥ वयपरत्वें प्रेमा जीचा । दृढतर मजवरि जरि झाला ॥ परि लज्जा कुलीनत्वें तीच्या । क्रिया धरिती बहु मु-ग्धत्वाला ॥ वर्णूं० ॥ १ ॥

## पद ॥ १७० ॥

(राग-धनाश्री. ताल-धुमाळी.)

विपरित काल अहा आला ॥ करें हें दैन्य छळी मजला ॥ ध्रु० ज्या मम सदनांगणीं होते ॥ भक्षित बलि हंसादिक ते ॥ उग-वलें वृक्ष तृण तेथें ॥ देहलि ही उदास बहु दिसते ॥ भक्षिति कीटक त्या बलिला ॥ विपरित० ॥ १ ॥

*पद ॥ १७१ ॥

( बल सागर तुम्ही वीर सि° या चा° )

दुर्भाग्या मम मना वेडप्या ॥ व्यर्थचि तळमळशी ॥ पुरुष असे जो दुर्लभ त्याची इच्छा कां धरिसी ॥ ? वरचेवर आणुनि खिन्नता उगाच कां भजसी ॥ ? मौजेनें अदयेतें वरुनियां दुःख असें देसी ? ॥ सौंदर्या पाहतां जयांच्या तोषक बहु व्हावा ॥ पाहतांच त्याकडे असा कां ताप मला व्हावा ॥ काय नवल यामध्यें उगा कां दोष तया लावा ॥ नशीब माझें फुटकें त्याचा विक्रम जाणावा ॥ १ ॥

पद ॥ १७२ ॥

( राग–सांरग. ताल–धुमाळी. )

त्रिपूरमर्दन मोह पावला, भुलुनीं गेला गंगेला ॥ विलास नाना करी तियेसीं, विसरला प्रियनगवाळा ॥ ध्रु० ॥ नर्तन, वादन, गायन करितो तिजशीं घेऊन एकांतीं ॥ वस्त्रें सुंदरभुषणें प्रतिदिनीं परस्परें तीं लेवविती ॥ नग्न होऊनी क्रीडा करिती, न घेती मनीं शंकेला ॥ ऐसें अपार भोगिति सुख परि वीट नये चित्ताला ॥ त्रिपुर० ॥ २ ॥

पद ॥ १७३ ॥

( राग–पिलु. ताल–धुमाळी. )

सखये अनसूये थांब कि बाई ॥ येतें मी, अशि कां घाई ॥ रुतला दर्भांकुर माझ्या पाई ॥ मजला तो दुःखद होई ॥ साडी कोरांटीस गुंतून जाई ॥ सोडवितें तोंवरी राही ॥ सखये० ॥ १ ॥

पद ॥ १७४ ॥

( वीरा भ्रमरा जन्मुनी सार्थक या चा० )

कोमलकमलदलांची शय्या, ही बघ, हिंचि काहली ॥ दाविजी स्मरतापें जाहली ॥ पीनस्तन जघनाच्या संगें, ही ह्या

दोन्ही स्थळीं ॥ दिसे मज अतिशयरे करपळी ॥ बारिक कटि-च्या योगें मध्यें स्पर्शाविण राहिली ॥ शोभते हिरवी कशी चां-गली! ॥ चैन पडेना वास्तव लोळुनि शिथिलतर भुजवल्ली ॥ प्रसंगें फारची विसकटली! ॥.१ ॥ ॥

पद ॥ १७५ ॥

( भूपाळीच्या चालीवर. )

जीं जीं कर्में त्या योग्याच्या हस्तानें घडती ॥ निष्कामत्वें स-हजपणें तीं झालींसीं दिसती ॥ हांसे बोले विषयींजनांसह परि ती त्याची मती ॥ गुंतुनि गेली ऐसें वाटे सद्रूपावरती ॥ ब्रह्मानंदीं मग्न सदा जो भान न तनुवरती ॥ बुडुनि राहिला सौख्यसागरीं सेवित भरभरती ॥ १ ॥

* पद ॥ १७६ ॥

( वस्त्रानें देह सारा यास० याचा० )

सोन्याचे स्तंभ जेथें रम्य असे घडविले ॥ ज्याला हे मोठमोठे रत्नमणी जडविले ॥ मोत्याचे घोंस मोठे ज्यामध्यें लाविले ॥ त्याचे या नृत्यशाले तेज बहू फाकलें ॥ १ ॥ सो० ॥

पद ॥ १७७ ॥

( चाल ॥ पांव विभो करुणाकर )

विमलकमळदलसमनयना हे मदना, करितें नमन तुला हें ॥ ध्रु० ॥ तव दर्शन हो शुभदायक मज इष्ट द्यावया सत्वर बा सज ॥ १ ॥ अह्मां सारिख्या युवतिजनांनीं ॥ जावें कोठं मृदु चरणांनीं ॥ २ ॥ तुजविण सुंदर इतर न कांहीं धन्य सती तव रति वाटे ही ॥ ३ ॥

पद ॥ १७८ ॥

( राग—जोगी—ताल—धुमाळी. )

मम हृत्पकज भ्रमरा ॥ सोडुनि जाउं नको ॥ ध्रु० ॥ तुजवि-

ण मजला नाहीं कोणी॥ सत्य जाण हें तुझीच आण ॥ तव पदीं माझे पंचहि प्राण॥ हृदयीं आण, विसरूं नको ॥ १ ॥ आहे भेटिची मनिं आस ॥ नित्य असावा, तव सहवास ॥ हें तों वाटे मम चित्तास ॥ या दासीस, त्यागुं नको ॥ २ ॥ पिता बंधू तूं गण गोत ॥ इष्ट मित्र तूंचही अंत ॥ तुजवर जडली माझी प्रीत ॥ स्नेह रीत मोडुं नको ॥ ३ ॥

पद ॥ १७९ ॥

( राग–आनंद भैरवी. ताल–धुमाळी. उद्धवा शांतवन कर जा–या चालीवर )

तव कांतें तुजला सोडुनी केलीगे दुसरी भार्या ॥ ध्रु० ॥ क्रीड तसे अत्यानंदें करितो बहु तिजवर माया ॥ पाहुनि मी त्याची चर्या आलों गे तुज कळवाया॥चाल॥तत्प्राप्ती व्हावी ह्मणुनि का॥ करिसी श्रम हे वांया ॥ गंगेसह हिमनगरानीं, करि विलास तो शूलपाणी,॥दुष्प्राप तुजलागोनी॥कां ठेविसी आपुली काया ॥१॥

पद ॥ १८० ॥

[राग–बिभास. उठि गोपाळ जी० याचा०]

सजल जलदा परि, प्रियकरा हिजवरी वृष्टि विपुला करी हे दयेची ॥ ध्रु० ॥ येथ नाहीं इचें ज्ञाती कुल सोयरें ॥ ह्मणुनी करुणास्वरें विनवितें मीं ॥ १ ॥ कर हिचा धर आतां क्षण न मजलाजतां किमपि मनिं वक्रता तूं न ठेवी ॥ २ ॥

*पद ॥ १८१ ॥

( बता दे सखि कोन गली०या चा० )

कितिग तरी उत्सुक होई मनीं ॥ ध्रु० ॥ पीनपयोधर अंबर ऐसें राजहंस बघुनी ॥ १ ॥ जाण्या सखिसह मानस स्थानीं ॥ ध्यास बसे धरूनी ॥ २ ॥ मधुकरी प्रिय चिंतन करिते ॥ ध्रु० ॥ हृदयीं अभिनव प्रीति उपजुनी काम व्यथित होते ॥ प्रियदर्शन कांताला तेथें बघण्या हुर हुरतें ॥ कितिग० ॥ ३ ॥

पद ॥ १८२ ॥

( राग-ताल धुमाळी.-उद्धवा शांतवन कर जा० याचा० )

प्रिय बाळा माझ्या आतां फळ काय मिळेल रडोनी ॥ कां टाकिशि दीर्घश्वासा मुख गेलें कोमेजोनी ॥ अश्रुधारा या वाहती नेत्रहि हे आले सुजुनी ॥ पांढुरता गालावरती दिसती टवटवी जावोनी ॥ चाल० ॥ अनिवार दुःख अजि झालें ॥ उर धडधड तूझें हालें ॥ पर्वत मजवर कोसळले ॥ कांत मम नाहीं ह्मणुनि॥ झालास तूं सकुमारा ॥ मातृहीना आजपासोनी ॥ १ ॥

पद ॥ १८३ ॥

( राग-झिंजोटी-ताल त्रिवट. )

गणिका केवळ साक्षांत विवशी ॥ द्रव्य हरूनिप्राण हरिति ॥ ध्रु० ॥ धनवंतासि बहुत भजती परी॥उलट झालिया त्यावरी फिरती ॥ धन यौवन रूपा मोहित होती ॥ परि नच प्रीती मानसि धरिती ॥ २ ॥ गणिका० ॥

पद ॥ १८४ ॥

( राग जिल्हा सुटला पित् विशंचावारा० याचा० ]

लागो लक्ष्य पतिचे चरणीं, वाढो सन्मति अंतःकरणीं ॥ असतां ऐसें भीति न मरणी? सर्वां सदयें मनानें पहावें मर्यादा भूषण सेवावें कुलशीलासी ॥ सांभाळावें हृदयीं ईशा सतत भजावें आशिष मागावें भवतरणी ॥ लागों लक्ष्य पतीचे चरणीं ॥ १ ॥

पद ॥ १८५ ॥

( हे मना सोड कल्पना. या चा० )

बघ मुली भ्रांती पडली तुला ही भली, खरोखर पाही, ॥ या नृपवेषा कशि मनोरमा होई ॥ हा खरा राजचेहरा वेष साजिरा वाटतो मातें, ॥ पाहतां देतसे दोष अठि नेत्रातें ॥ जो करी-मत्त त्या परी-मती ही धरी मंद बहु पोह, ॥ दाविते अभिनयीं किती कुशलता आहे ॥ १ ॥

पद ॥ १८६ ॥

( राग–खमाज. ताल–त्रिवट. )

।किं तूं मोहित कां होसी । ऐक मी कथितें तें तुजसी ॥ ध्रु०॥
।राशेनें खिन्न उदासिन । चित्तीं गे बहु असती ॥ १० ॥ प्रि-
पति करुणावचनें ऐकुनी ॥ चंद्रकांतसम द्रवसी ॥ १० ॥
।र्घवियोगें उत्सुक तव मन ॥ कांतसंगमासि ॥ १० ॥ अस-
।ं अवचित पाहुनि त्यातें ॥ प्रेमपूर ये ज्यासी १० ॥ ३ ॥

पद ॥ १८७ ॥

( राग–जोगी. ताल–धुमाळी. )

वेश्रांती अजी सर्वहि माझी कोठें तरि रमली ॥ आम्रतरुशी
सुखद लता ती सोडुनि कां गेली ॥ ध्रु० ॥ प्रितीभरें कीं सखि
गोषयली म्यां ती कशि सजली ॥ फसवाया या दीना? अथवा
काले तिस हरिली ॥ विश्रांती० ॥ १ ॥

पद ॥ १८८ ॥

( राग–ललिता गौरी. ताल–धुमाळी. चाल–जगहो श्रीपादपद्मीं)

नोहे नारी ही चंचलवल्ली ॥ मति माझी ठसली ॥ काय ह्मणावें
इसही शंका सखिनें ती घालविली ॥ नोहे० ॥ ध्रु० ॥ असती
लुसलुशीत ओष्ठ इयेचे ॥ पल्लव वेलीचे ॥ बाहू अति कोमल
गोंडस साचे ॥ टांपे लतिकेचे ॥ अंगीं यौवनभर भरला तीचे॥
पुष्पचि नवतीचें ॥ ऐशी चालकि बोलकि लतिका निर्मुनि विधि-
नें कमाल केली ॥ नोहे नारी ही० ॥

पद ॥ १८९ ॥

[ राग–पिलु. ताल–धुमाळी. चाल–पातळ पुतळी. यावर. ]

सूतवचन तें परिसुनि साध्वी बहुकालि बहु चिंती ॥ घेउनि-
यां मम निरोप समेसि जाई हे सुमती ॥ भीष्म द्रोण गुरु विदुर

श्रेष्ठ हे सभेस्थानें असती ॥ रजस्वला मी अबला आहें सांग शीघ्र त्यांप्रती ॥ सूत० ॥ १ ॥

पद ॥ १९० ॥

( देव स्त्री मेनिका अप्सरा या चा० )

इच्छियलें जें मनीं सर्व तें पूर्णचि होण्याला ॥ वेळ नसे तिळ खचित खचित कीं दिसताहे मजला ॥ धृ० ॥ जाणुनि बुजुनी माझ्या पशुंतें मारायां सजला ॥ सत्व अशांचें वानिती मुनि न कळे हें मजला ॥ घेउनि संगें तारामतितें घोर वनीं आला ॥ दुःखसागरीं अवचित ढकलिन बघ आतां त्याला ॥ श्रीवर्गेंही सत्व रक्षिती ऐसें तो वदला ॥ वसिष्ठ गर्वें ह्मणुनि मला हा कोप अती चढला ॥ दुःख अतीतर देउनि यानां हरितो सत्वाला ॥ बघतों सद्गुरु हर्षें कैशी गर्वोक्ति भकला ॥ २ ॥

पद ॥ १९१ ॥

( राग–शंकराभरण ताल–धुमाळी. चाल–नाहीं सुभद्रा या धाटीतें. )

दुर्योधन हा क्रोधें बोले अपुलें बंधुला ॥ उठ लौकरि दुःशासना तूं आणाया सतिला ॥ धृ० ॥ जये जरी ती बळेंचि आणी धरुनी वेणीला ॥ महादुष्ट तो व्याघ्रापरि मनीं खवळुनी चालीला ॥ खळ पाहुनि तो याज्ञसेनिला कंप बहू सुटला ॥ हस्त जोडुनी ह्मणे भाउजी अवचित कां आलां ॥ दुर्योधन हा० ॥ १ ॥

॥ पद १९२ ॥

( राग–च्याहाग–ताल–दादरा )

सुखद किती शीतल हा स्पर्श तरी असे ॥ परी सखये मम ननु कां तप्त करि तसे ॥ धृ० ॥ होती सजउ कंपित कर ॥ रोमांचित शरीर ॥ सुस्थिर मम झालें अथिर नकनी येत प्रेम पूर ॥ पळलें जणूं प्रीति हीं करुं तरी कसें ॥ सु० ॥ १ ॥

## पद ॥ १९३ ॥

( बायानों, या सोडोनी या चा० ॥)

श्री द्या मज पाणी ॥ कुठें तरि लवकर शोधोनी ॥ तृष्णेनें बघ माझा ॥ शुष्क गळा कीं झाला ॥ चालवे न पदतळ ला ॥ डोंगर अग्निच केवळ बनला ॥ प्रखर त्रासानें या म- ा ॥ घर्मपुर बहु आला ॥ चाल ॥ विश्रांति क्षणभर घ्या- ॥ न दिसे कीं तरुची छाया ॥ ऐशा रितिनें व्याकुळ व्हाया भानू ही जाय तपोनी मातु० ॥ १ ॥

## पद ॥ १९४ ॥

(राग—कालंगडा. ताल धुमाळी·)

ु ईची सुंदरा सहज मनोहरा ॥ भूषण कारण नच इस जरा ॥ ाय ही जातीची अप्सरा ॥ पंकज कोमल तरा ॥ अशा या क- ॥ लावी कामाजो खडतरा ॥ भासतो अविचारी मज खरा वाटे मज हा मुनी ॥ वस्त्र ह्मणउनी ॥ तोडिल कमलदलें ामिवनी ॥ शंका नकरिल किमपी मनीं ॥ १ ॥

## पद ॥ १९५ ॥

(अर सखि किति हा शेला ) याचा० ॥

मभागि जीव हा उरला ॥ नकळे कोठे पति सुत गेला ॥ धृ० । अग्निनें नाहीं गिळिला ॥ काय हा माझा कठिणचि झाला ॥ ाणपती कीं मजला ॥ टाकुनि गेले निज अबलेला ॥ रोहि- दासा तुजला ॥ कोण तनया देईल खायाला ॥ वृक्ष हो सांगा मजला ॥ प्रियतम मत्सुत कोठें गेला ॥ शोधुनी कळवा इजला ॥ मातें भूमी ऐकें हाकेला ॥ १ ॥

## पद ॥ १९६ ॥

(राग—जोगी. ताल—धुमाळी. माझा कृष्ण देखिला कायॅ या चा० )

वत्सा दुर्गति काय तुझ्या ॥ होईल पितयाला ॥ ध्रु० ॥ ऐकुनि प्र-

ड्रादाची वाणी ॥ जैसी पीयूषाची खाणी ॥ नरहरिलोचनाला णी ॥ ये तत्क्षणीं गहिंवरला ॥ वत्सा० ॥ १ ॥ तुजसारिखा न्मणीं ॥ आला ज्याचे उदरांतुनी ॥ त्याच्या दुर्गतिला चिंतु- ो ॥ व्यर्थ मनीं, कां झुरसी ॥ वत्सा० ॥ २ ॥ ज्याचे वंशीं झा दास ॥ त्याला वैकुंठीं बा वास ॥ व्यर्थ होऊं नको उ- ास ॥ धरिं विश्वास मद्वचनीं ॥ वत्सा० ॥ ३ ॥ ठेउनि पद्म स्त तो शिरिं ॥ प्रेमें घेउनि अंकावरी ॥विठ्ठलपंत--प्रभु--नरहरी॥ कृतार्थ करी निजदासा ॥ वत्सा० ॥ ४ ॥

## पद ॥ १९७ ॥

चाल—कटावाची

ांव रमापति ज्ञानविलासा, पूर्णपरात्पर शांतिनिवासा ॥ ध्रु० ॥
ावण हा खल दुर्मदभारी, गोद्विज पाहुनि येउनि मारी ॥
र्म न ठेवित हा अविचारी,तोड विभो भयदायक फांसा. ॥१॥
ाक्षस गांजिति काय करावें, दुःखनिधीप्रति केंवि तरावें ॥
चित्त किती कवळोनि धरावें, जाणुनि पाहसि काय तमासा ॥ २ ॥
पालय पालय सत्सुखसारा; दे तुझिया चरणीं दृढ थारा ॥ राम कृष्ण गुरुराज उदासा, पांडुरंगा सुख दे दासा ॥ धांव० ॥ ३ ॥

## पद ॥ १९८ ॥

[ राग—खमाज.ताल—त्रिवट.)

सवलय हस्तें विवाह समयीं प्रियेचा मी जो कर धरिला ॥ ध्रु० ॥
अमृत मधुरसम सहज स्पर्शे वाटतसे मज तोच कि पहिला ॥ १ ॥
निश्चित हा कर प्राणसखीचा ॥ मज लागे अनुभवें समजला ॥२॥दैवें अवचित पुनरुपिं झाला मृदु सुखकर हा प्राप्त मजला॥३॥

## *पद ॥ १९९ ॥

( शैवालें युक्त जैसें० या चा० ॥ )

उठती कां आसनाला गडबडीनें सोडुनी ॥ सत्कारा पात्र नाहीं

। जन हें जाणुनी ॥ वश आहे तव कृपेच्या दृष्टी तें घे मनीं ॥ ाजवीशी व्यर्थ कां गे आदर तूं दावुनी ॥ १ ॥

*पद ॥ २०० ॥

( उद्धवा शांतवन करजा त्या गो० या चा० )

" माझे सुंदर सगुणे ॥ पुरवी तूं हेतु मनाचे ॥ ध्रु० ॥ बोलून भेला प्रेमें ॥ उचलून मंचकीं नेई ॥ बैसवून अंकावरती ॥ मग ामालिंगन देई॥कीं तो त्या पुष्पलतेसी ॥ भुजंग हा वेष्टुनघेई ॥ ाळ ॥ पद्मीण पहातां भ्रमला ॥ मकरंद सेवनीं रमला ॥ कीं भ्रमर जेवीं हा गमला ॥ वाटलें कृत्य जयाचें ॥ १ ॥

* पद ॥ २०१ ॥

(व्यर्थ आह्मि अबला ख० ॥ या चा० )

व्यर्थचि मी फसलें ॥ खरि ग बाई व्यर्थचि मी फसलें ॥ ध्रु०॥ ।च्छित पति मज मिळुनि परी मी ॥त्यां नच आवडलें ॥ ख०॥ ॥ १ ॥ आलिंगिल मज प्रीतीनें पती ॥ कोड हि नच पुरलें ॥ ख० ॥ २ ॥ नाटक बघण्या रचण्यांत सदा ॥ मन तरि किति पजलें ॥ ख० ॥ ३ ॥ ह्मणति जनीं मज सुखी खरी परी ॥ सौख्यांतुनि ढळलें॥ खरि ग०॥

*पद ॥ २०२ ॥

( नच सुंदरि करुं कोपा या चा० )

ाध भ्रूभंगा करिशी ॥ मुग्ध सखे कां बसशी ॥ स्फुंदसि गे तव दृष्टि मनोहर जिंचि ऐशी ॥ ध्रु० ॥ स्फुरण नसे अधराला ॥ रोडिशि गे श्वासाला ॥ धरिशी तूं मौनाला ॥ नतवदना ध्या- ाला ॥ करिशी गुत रोषाला ॥ तो पीडी बहु मजला ॥ १ ॥

पद ॥ २०३ ॥

( राग-जंगलाजिल्हा. जाऊं नकोरे विषयाटविचीं या चा० )

प्रेयसखिच्या सौंदर्या पाहुनी कोठें तरि लपला ॥ हतुक्या दिन

ोतास स्थलीं तूं कवण्या वद मजला ॥ लाजुनि माझ्या सखि- ुखदर्शनीं तीच्या शिरिं वसला ॥ भुजंगमय वेणीच्या कंदरीं ढुनियां बसला ॥ १ ॥

पद ॥ २०४ ॥ ✓

( ताल–दादरा सुंदर मुख तुंदिल तनु. या चा० ॥

कमलवदन कमलनयन कमलजावरा ॥ कमलाधर कमलाकर कमक्सुखकरा ॥ ध्रु० ॥ भक्तजना रक्षिसि तूं दैत्यमर्दना ॥ त तव पदिं होति त्यास देसि दर्शना ॥ अघनग मग करिसि ाग्र पतितपावना ॥ गातों, ध्यातों, नमितो, पितवसना; करिं भवना; निरंजना, पद्मदरधरा ॥ १ ॥ झालें विषशमननाम ार्वतीवरा ॥ विनति विभो ऐकुनियां करिं अती त्वरा ॥ पायां, याया, माया, बलकृष्णा, अघहरणा, नतचरणा, द्यावी ीवरा ॥ कमलवदन० ॥ २ ॥

पद ॥ २०५ ॥

( चाल–राम राहीना काय करूं आतां ताल–त्रिवट )

ां मजला टाकुनि जातां ॥ काय करावें आतां ॥ ध्रु० ॥ होऊं ाहते सवत दुजी मजवरि आली मम कांता ॥ कां० ॥ १ ॥ जला कळवा एकपत्नी हें ॥व्रत कां सोडुनि देतां ॥ कां० ॥२॥ क्रीरमेवर धरितां आवड॥स्त्री गृहीं सती असतां ॥ कां० ॥३॥ म्हीं तिजशीं रत झालीया॥मोक्षदासे मज नाथा ॥ कां० ॥४॥ ियोग दुस्तर सहन कसा तरी॥आपुला होईल आतां ॥ कां०॥५॥ िवेकनंदन हृदयी ठसेना ॥होय बरें जिव जातां ॥ कां० ॥ ६॥

पद ॥ २०६ ॥

( झंगा लावोनी–या चा० )

त्युलोकभुवनीं • ॥ गेलों करिता भ्रमणा मी ॥ तेथें भक्त तुझे ाणी जोडुनि ॥ आणि रुप ध्यानीं ॥ गावुनि० ॥ पुरवा मे·

टूनि ॥ इच्छित आशा अशि धरुनि ॥ ध्यातो इ० ॥ चाल ॥ विश्रांती त्वद्भक्ता देऊं ॥ आलों तव चरणीं ॥ जलदी या मी क्षिरसदनीं ॥ १ ॥

### *पद ॥ २०७॥

(परिणलें—मुनि. या० चा०)

पूर्वीच वृत्त हें मला ॥ आले कळुन त्या समयाला ॥ प्रिय सखे तूं दुःखा न करी मनीं ॥ आलों सोय योग्य लावोनी ॥ प्रिय०॥ ॥ १ ॥ नेऊन कार्य सिद्धीला ॥ मग कळवावें हें तुजला ॥ प्रिय०॥२॥ हें होतें मम मानसीं ॥ या योगें होशिल खुषी३॥॥ ॥ या साठीं गे तुजशी ॥ बोलले नाहीं वार्तेशी ॥ प्रिय० ॥ ४ ॥

### पद ॥ २०८ ॥

( राघ—पिलु. ताल—धुमाळी. )

जिव घाबरतो चैन नसे मज कांहीं ॥ सुख आशा किमपी नाहीं ॥ उरिं धडकी ही भरली माझ्या आतां नेवो सत्वर दीन त्राता ॥ चाल ॥ जगवियोग होईल मला, ही तुटेल कीं स्नेह-माला ॥ आजि शेवटची भेट अतां समजाही ॥ प्रभु नेवो कीं लवलाही ॥ १ ॥

### पद ॥ २०९ ॥

(चाल—गंगानदिती—सागर. सोडुनि—कूपास.)

नंदनवनसम उपवन सुंदर दिसतें कीं मजला ॥ बघ इकडे हा चंदनतरुवर देत सुगंधाला ॥ ध्रु० ॥ हंस मयूर शुक चातक करिती मंजुल शब्दाला ॥ मंद सुशीतल पवन वहातसे सुखवित हृदयाला ॥ कमलांतील मधु सेवाया बघ भ्रमर लुब्ध झाला ॥ बघुनी रमणिय ही वनशोभा तोष मना आला॥नंदन० ॥ १ ॥

### पद ॥ २१० ॥

( गडे—हो कृष्ण—गडी. आपुला. या०चा०। )

प्रमेगे दैव तुझें फिरलें ॥ पतिनें काय असें केलें ॥ ध्रु० ॥ येथुन

समरीं जाण्याला ॥ बिलंब पतिला बहु झाला ॥ कारण घडले क्रोधाला ॥ वाटे तुझिया श्वशुराला ॥ ह्मणुनी पित्यानें काय दंडियेलें ॥ पतिनें काय असें केलें ॥ १ ॥ लागुनि गुरुच्या बुद्धीला ॥ रायें त्याजिलें मोहाला ॥ घालुनि कढईमध्यें तैला ॥ खाली अग्नि लावियला ॥ प्रज्वलतैलीं सोडियलें ॥ पतिनें काय असें केलें ॥ २ ॥

पद ॥ २११ ॥

[राग–झंकरा भरण. ताल–धुमाळी. चाल–नाहिं सुभद्रा या वार्तेतें.]

दुर्वाक्यें त्या सतिचे हृदयीं क्रोधाग्नि पेटला ॥ कोपानें बहु लाल होउनी शाप देई त्याला ॥ ध्रु० ॥ मूढमती हे चांडाळा तव अंकिं बसायाला ॥ भीम गदाही सुंदर नवरी योजियली तुजला ॥ रणमंचकीं तूं निद्रा घेई घेउनियां सखिला ॥ न टळे हें मम वचन हि काळा ह्मणें द्रुपदबाळा ॥ दुर्वाक्यें० ॥ १ ॥

* पद ॥ २१२ ॥

( देति शिकारिस दोष० याचा० )

सेनापति मम विजयसेन हा जीच्यावर ती मुख्य असे ॥ अशी स्वपृतना जर्जर करुनी कालिंगास त्या टाकितसे ॥ बहिःस्थळाला आधि वेढुनी दुर्गि पिटाळुनी लावितसे ॥ अनाथ ज्याला तयाविणें हो रक्षायाला कोणि नसे ॥ १ ॥ वीरविमर्दन यापरि पाहुनि कालिंग भारी घाबरला ॥ नरकुंजरघोटकसंघातें मारि विदारी दुर्गाला ॥ मम सेना मग आंत शिरोनी करि विव्हळ मारि ज्याला ॥ भगवति परिसा आज उद्या वा मेला किंवा तो जगला ॥ २ ॥

पद ॥ २१३ ॥

( शशिकुल भूषण गुणवंता, याचा० )

रविकुलभूषण बलवंता ॥ एकुन घे या आकांता ॥ ध्रु० ॥ व्याघ्रादिक नगरासरिसे ॥ आले सिंहहि वृक तैसे ॥ वाटे त्यां

ग्रषतां परिसें ॥ नेत्रीं कृतांतची जैसे ॥ नगरवासि हे बघ कैसें ॥ दिसती म्लान मुखी शवसें ॥ चा० ॥ त्रस्त प्रजांचें दुःख हराया जन्म तुझां असतां॥ स्वस्थचि उपवनिं कां रमतां? ॥ १ ॥

पद ॥ २१४ ॥

[ चाल–माझारे कनवाळु भगवान. ]

दावा हो मजप्राण विसावा ॥ प्रिये मन मोहना ॥ ध्रु० ॥ कोठें पाहूं सत्वर सागां त्या सुंदरमदना ॥ १ ॥ जाऊं पाहती पंच प्राण ॥ हे वीरही धरवेना ॥ २ ॥ न पावला मजपासुन साधू॥ आजवरीं अपमाना ॥ ३ ॥ जन्मांतरीं मी काय हरियेलें ॥ दुर्बळप्राणधना ॥ ४ ॥ म्हणुनि प्रमेच्या आज कसा तरी कलंक येवदना ॥ ५ ॥

पद ॥ २१५ ॥

[ शृंगा ताजोनी- याचालीवर ]

रथ हा सजवूनीं येतों पशुहनना विपिनीं ॥ येतों० ॥ ध्रु० ॥ स्वस्थ मनें करूनी ॥ नांदा आपुल्या सदनीं ॥ नांदा० ॥ वधिल्या वांचोनी ॥ त्या नच येई परतोनी ॥ त्यां नच० ॥ चाल ॥ सेनेला त्या आज्ञा द्याया॥ पाठवितों सदनी दूत मी ॥ येतों हो विपिनीं ॥ जलदी० ॥ १ ॥

पद ॥ २१६ ॥

( राग–झीजांवटी, ताल–धुमाळी.चाल–ब्राह्मण कन्या नव्हे क्षत्रियां )

दुष्टवचन तें पडतां कानीं वृकोदराचे मनीं ॥ गेला कोपाग्नी भडकुनी ॥ ध्रु० ॥ रक्तवर्ण ते नेत्र करोनी भृकुटी चढवी वरी ॥ उठुनियां मेघगर्जना करि ॥ अधर रगडुनी दांत खाई गदा मुष्टिनें धरी॥चालला धांवत सभेवरी ॥ समाजनांतें कंप सुटे बहु तरक्षणिं अंगावरी ॥ म्हणती नेतो किं यमपुरीं ॥ दुष्ट वचन०॥१॥

* पद ॥२१७॥

( नाहीं सुभद्रा या चा० )

स्वामी अमुचे तुह्मा ऐशा संदेशा देती ॥ कृपें जाहली तुमच्या राया तन्मानस पुर्ती ॥ संकटकाळीं रक्षण केलें पुरुनी या स्फुर्ती ॥ या साठीं निज स्वामी त्यातें तुह्मां अर्पिती ॥ १ ॥

पद ॥ २१८ ॥

( राग–झिंझोटी. ताल–त्रिवट. )

शेला ह्या सज्जनाचा रमणिय हा किति असे ॥ ध्रु० ॥ जाईच्या सुमनांचा परिमळ ज्या येतसे ॥ उदासीनता खचित ह्यांच्या तारुण्यासिं नसे॥ भोगेच्छा ह्यांस आहे ह्यावरुनी कळतसे ॥ १ ॥

पद ॥ २१९ ॥

( वारियानें कुंडल हाले० या चा० )

प्राणपतिला कोठें पहावें ॥ नशिवाशीं दोष न द्यावे ॥ वदनातें पाहुनी घ्यावें ॥ मदनानें लज्जित व्हावें ॥ १ ॥ पतिभाषण मधुर स्वभावें ॥ कुठें आतां त्या परिसावें ॥ २ ॥ शूरप-णानें समरीं रिघावें ॥ देवदानव जिंकुनी यावें ॥ ३ ॥ काय पतिचे सद्गुण गावें ॥ किती सखये तें आठवावें ॥ ४ ॥

पद ॥ २२० ॥

( [illegible] कर ज्या० ॥ या चा० )

श्वापदें आपुली ह्मणुनी ॥ जरि हें कळते मजलागोनी नसतेंचि तयाला वधिलें ॥ मज वरती शिण हे आलें ॥ जरि तुमचें पद धरियेलें ॥ जनरक्षण असतें झालें ॥ चाल ॥ मी नमितों मुनि चरणाला ॥ अपराध न कळतां झाला ॥ तो क्षमा करुनिया याला ॥ रक्षा की दीन गणोनी ॥ श्वापदें० ॥ १ ॥

पद ॥ २२० ॥

( राग–खमाज त्रिवट पंजाबी ठेका दध,बेचन मैना मा[illegible]बच्यां, या; चा;)

आज मज सहज आला उल्हास॥ स्फुरण हृदयीं घडे कसें गाय-नास ॥ आज मज ० ॥ ध्रु ० ॥ ऋतु ग्रीष्म कसा उद्भवे बहु

री ॥ अधिं तपवि सुखवि खास ॥ आज ० ॥ १ ॥ फुलें शिर सांचि मधुपविचुंबित ॥ स्वशिरिं घालिति दाविति पतिस ॥ आज ० ॥ २ ॥ निशीं चांदण्यांत कामिनि करितात ॥ हसत खेळत सुखविलास ॥ आज मज ० ॥ ३ ॥

पद ॥ २२२ ॥

(उरला-भेदन, त्या-कांहीं या, चा,)

दिन हा नमितो तव पायीं ॥ ऋषिवर ताडूं नका कांहीं ॥ ध्रु० ॥ माता माझी ही अबळा ॥ तैसा पिता बहू श्रमला ॥ मारूं नका किंहो याला ॥ थांबा देतो दक्षणेला ॥ गळ्यांतील मुक्ताफल माळा ॥ देतों घ्या दान तुह्माला ॥ अथवा हस्तकंकणाला ॥ घेउनि सोडा पितयाला ॥ चाल ॥ मुनि हो त्यागुनि कोपाही ॥ शांत असे होई ॥ द्यावे हेंची मज पाहीं ॥ दि० ॥ १ ॥

पद ॥ २२३ ॥

[ राग-केदार. ताल-त्रिवट. ]

स्वामि दत्त निरंजन बनमो॥ कया झूल रहे निरगुनमो ॥ध्रु० ॥ जटा मुगुट शिरी लटा बिराजे ध्यान दिगंबर मुद्रा ॥भालचंद्र झलके मुखमंडल कुंडल जोत करनमो ॥ १ ॥ चार बेद कुत्तारूप ठाडे जोडकर निशी दिनवा स्वामी ॥ माया नंदके कामधेनु चोवीस नाम स्मरणमो॥२॥रंग रूप कुच नही ब्रह्मकूं सुरत बनवाट गेहेरी॥ दादुदास शिरी दत्तके चरण स्मरे महासनमो ॥ स्वामी॥३॥

समाप्त.

